# यूरोपच्या अंतरंगांत

लेखिका

सौ. सरोजिनी देशपांडे

सन १९५२

किंमत २ रुपये

# प्रस्तावना

प्रस्तुत पुस्तकाच्या लेखिका सौ. सरोजिनीबाई देशपांडे या नुसत्या नांवानेच नव्हे तर आपल्या लेखन-गुणाने महाराष्ट्रांतील वाचकांच्या चांगल्या परिचयाच्या झालेल्या आहेत. कारण गेल्या ५ वर्षांत त्यांचे प्रवासात्मक व सृष्टिसौंदर्य—वर्णनपर अनेक लेख केसरी वर्तमानपत्रातून प्रसिद्ध झाले आहेत व होत आहेत. पांच वर्षांपूर्वी त्यांना यूरोपांत प्रवास करण्याचा प्रसंग आला. तो त्यांनी मोठ्या हौसेने घेतला. त्यांचे पति बिहार प्रांतांत रेल्वेच्या नोकरीवर असतां त्यांनी लांब मुदतीची रजा घेतली. याच सुमारास यूरोपांतील यूगोस्लाव्हियामध्ये 'जागतिक स्त्री-परिषद' भरणार होती; तिच्या सभासदत्वाचें निमंत्रण सरोजिनीबाईंना मिळालें तें त्यांनीं मोठ्या हौसेने घेतले, व पुढे सर्व यूरोपभर दोघांनी प्रवास केला. बरोबर त्यांनी आपली मुलगीही नेली होती. बाईंचें शिक्षण इंग्रजी भाषेतून संभाषण करणें, व्याख्याने देणें येथपर्यंत झालेलें होतें. आणि त्याचा उपयोग त्यांनी तिकडे खाजगी मुलाखती, जाहीर सभा वगैरेंतून भरपूर केला. परंतु इंग्रजी शिकलेल्या सर्वच स्त्रिया प्रवासाच्या हौशी असतात असे नाहीं. ती हौस सरोजिनीबाई यांना अंगची होती. आणि या प्रवासाच्या बाबतींत त्यांच्या पतीच्या सूचनेपेक्षा त्यांच्या स्वतःच्या मनाची स्फूर्ति हीच अधिक कारणीभूत झाली. मात्र या स्त्री-पुरुषांच्या स्वभावांत एक गोष्ट थोडी उलटी दिसून येते हें मी त्यांच्याच लेखावरून म्हणतों. प्रवासाला निघाल्यानंतर मोठमोठ्या शहरांतून हिंडतांना चित्ताकर्षक वस्तु खरेदी करण्याची हौस स्वाभाविकपणें स्त्रियांना असावयाची ती सरोजिनीबाईंना नव्हती. तर त्यांच्या पतींना होती. आणि जाहीर सभांतून व्याख्यानें वगैरे देण्याची हौस पुरुषांना असावयाची ती सरोजिनीबाईंना होती.

या पुस्तकांतील प्रवासाचीं वर्णनें चटकदार असून ती वाचणाऱ्या महाराष्ट्रीय मुली व प्रौढ स्त्रिया यांचे यूरोपच्या प्रवासाचें कार्य बरेंचसें घरच्या घरीं परस्पर होईल असें म्हणण्यास हरकत नाहीं. कोणी यात्रेकरू यात्रेहून परत आला म्हणजे त्याच्या पाया पडल्यानें त्याच्या पुण्याईचा कांहीं

अश लाभतो अशी भाविक समजूत आहे. ती खरी खोटी पाहण्याचें साधन नसते. परतु प्रस्तुत प्रवास-लेख वाचणाऱ्या स्त्रियाना यूरोपच्या प्रवासात मिळणारा प्रत्यक्ष प्रवासाचा आनंद नसेना का, पण त्यान मिळणाऱ्या ज्ञानाचा आनद मात्र खचित लाभेल यात शका नाही.

सरोजिनीबाई या विदुषी असल्या तरी त्यांची मते सामाजिक व धार्मिक बाबतीत सर्वस्वी नव्या वळणाची दिसत नाहीत. जुन्या नव्याचा मेळ घालण्याचा त्यांचा स्वभाव दिसतो. इग्लडात स्वतत्रपणे प्रवास करण्याकरिता त्यांनी मोटार विकत घेतली. बाई लिहितात : 'निघण्यापूर्वी मी आधी मोटारीची पूजा केली ' (भाग पहिला, पान १२.) हे शब्द थट्टेचे किवा खरे आहेत समजत नाही. ते कसेही असो. विलायतेस जाणाऱ्या तरुण हिंदी मुलाच्या वागणुकीवर त्यानी प्रतिकूल टीका केली व काही विधायक सूचना केल्या. हा त्याचा लेख केसरीत १९३६ च्या ऑगस्टात प्रसिद्ध झाला; त्याला पुढील सप्टेंबरांत डॉ. गो. पा. काणे यानी लडनहून दिलेले उत्तर केसरीत छापलेले आहे. त्यावरून या वादातील मुद्दे लक्षात येतात, व लेखिकेची जुन्या वळणाची आवड गेलेली नाही हे उघड दिसते. तथापि यूरोपातून वधू आणलेल्या एका तरुणाचा ससार तिच्या सुस्वभावामुळे चागला चालल्याची साक्ष त्यांनीच पुढील एका लेखांत दिलेली आहे यावरून त्या अगदीं कट्टर जुन्या वळणाच्या नसून विवेकी, म्हणजे बऱ्यावाइटातील तारतम्य ओळखणाऱ्या, आहेत असें दिसते. वरील सर्व दृष्टीनी हे लेख नव्या पिढीच्या महाराष्ट्रीय मुलीच्या हाती पडण्याला सर्वस्वी योग्यच आहेत, व ते वाचले असता त्यांना यूरोपच्या प्रवासाचा लाभ परोक्ष पण विनामूल्य बराच मिळेल सुदैवानें सौ. सरोजिनीबाईच्या पतींना बऱ्याच मोठ्या पगाराची नोकरी आहे व उभयतांनाही प्रवासाची आवड आहे. यामुळें असाच आणखी पुष्कळ प्रवास करण्याची संधि बाईंना लाभणारी आहे. तिचा लाभ घेऊन त्यांनीं आपल्या महाराष्ट्रीय भगिनीवर्गाला सृष्टिनिरीक्षणाच्या ज्ञानाचा लाभ द्यावा असें मी इच्छितो.

पुणे,<br>
२० फेब्रुवारी, १९४२.

**न. चिं. केळकर**

# लेखिकेचे दोन शब्द



यूरोपच्या प्रवासास निघाल्यापासून म्हणजे, जहाजावर पाय ठेवल्यापासून माझ्या मनाला ज्या बऱ्या वाईट गोष्टी दिसल्या, त्याचें वर्णन मी वेळोवेळीं केसरीत दिलेच आहे. त्याशिवाय मी फुरसतीच्या वेळी रोजनिशी लिहीत असे. माझे केसरीतले लेख पुष्कळाना आवडले. त्याबद्दल मजकडे पत्रेही आली, व मी हिंदुस्थानात परत आल्यावर मला वाचणारांनी समक्ष म्हटलेही, की पुस्तकरूपाने मी माझे लेख प्रसिद्ध करावेत, त्याचप्रमाणे ज्यानी रोजनिशी वाचली त्यानीही तशीच इच्छा प्रदर्शित केली.

यूरोपमधून आल्यानतर केसरी कचेरीतही श्री ज स. करंदीकर व श्री. तात्यासाहेब केळकर ह्यानी मला भेटावयास बोलाविले होते, व पुस्तक छापावें अशी सूचना केली होती.

यूरोपमध्ये ससाराची कामे नसल्यामुळे रोजनिशी लिहावयास शात वेळ मिळे पण हिंदुस्थानात आल्यावर, सामाजिक वा घरकामामुळे वेळ आतापर्यंत कसा तो झालाच नाही. तरी पण एकदा मनावर घेतले व सर्व लिखाणाची जमवाजमव करून फार वेळाने का होईना पण पुस्तक प्रसिद्ध होण्याची सुचिन्हे दिसू लागली

ह्या कामी पुण्याचे रहिवासी व आमचे आप्त, पंडित पा. शा. बावळे ह्याची मला फारच मदत झाली. त्यानी माझी रोजनिशी नीट तपासून मला सूचना दिल्या त्याना कार्यबाहुल्यामुळे स्वत.लाच वेळ नसतो. तरी पण आपुलकीने त्यांनी मला मदत केली, त्याबद्दल त्यांची मी फार आभारी आहे. त्याचप्रमाणें पुण्याच्या एंजिनियरिग कॉलेजमधील विद्वान् प्राध्यापक श्री आर. एस्. देशपाडे, B.E., A.M.I E. यांनी मुद्रिते तपासून व योग्य त्या सुधारणा सुचवून बहुमोल अशी मदत केली आहे, तेव्हां त्याचे आभार मानल्याशिवाय पुस्तकाचे काम पूर्ण कसें होईल ?

केसरीसारख्या उज्ज्वल मराठी पत्रात माझ्या मोडक्या तोडक्या लिखाणाला जें वरचेवर स्थान मिळत गेलें त्याबद्दल श्री. ज. स. करंदीकर व त्यांचा संपादक वर्ग ह्यांचीही मी अत्यंत आभारी आहे

माझ्या पुस्तकाला, विद्वत्श्रेष्ठ मराठी भाषाभूषण श्री. तात्यासाहेब केळकर ह्यानी प्रस्तावना लिहिण्याचे मी यूरोपहून डिसेंबर १९३६ मध्ये परत आल्यावर, त्याना भेटण्यास गेले तेव्हा, मला आश्वासन दिले होते त्यानंतर नुकताच कांही दिवसांपूर्वी त्यांचा सार्वजनिक कामाचा सन्यास वाचला व आतां प्रस्तावना मिळेल की नाही म्हणून शका आली, परतु माझे भाग्य म्हणून, त्यांची प्रस्तावना माझ्या पुस्तकाला मिळाली.

यूरोपच्या प्रवासाची आजपर्यंत पुष्कळ पुस्तकें छापली आहेत; असे असून सुद्धा मी माझे अनुभव छापण्याचे योजीत आहे. कारण माझे काही लेख पुण्यातील न्यू इंग्लिश स्कूलसारख्या मुलांच्या शाळातून, शिक्षकांनी बोर्डावर लावून शिकविले. घरगुती जुन्या नव्या बायकानीही लक्ष देऊन वाचले. तेव्हा ह्या लेखाना कायमचे स्वरूप यावे म्हणून पुस्तकात एकत्र गोवीत आहे. पुस्तकाचें उत्पन्न पुणें अनाथ विद्यार्थी गृहास जावयाचे आहे. तेव्हा ह्यांत स्वार्थ असा काहीच नाही. लोकसंग्रह छापखान्याचे व्यवस्थापक रा. केतकर व रा. गागल ह्यांनी पुस्तकाच्या छपाईचे व प्रकाशनाचे काम आपुलकीने केले त्याबद्दल मी त्याची ऋणी आहें

२०, मेयो गार्डन, लाहोर.
तारीख ११ मार्च, १९४१.

सौ. **सरोजिनी देशपांडे**

ता. क.

माझे पुस्तक छापून होईतो यूरोपचा नकाशा अजिबात बदलला गेला, व रोज बदलत आहे. सर्व जग क्षणभगर आहे असे ह्या घटकेस झाले आहे. तेव्हां यूरोपच्या प्रवासाचे पुस्तक छापून काय फायदा, असे सहज कोणाच्याही मनांत येईल. लढाया झाल्या, होताहेत, व होतीलही, पण चांगल्या शिकावयाच्या गोष्टी अमर राहणाऱ्या आहेत. म्हणूनच हे पुस्तक मूर्त स्वरूपात आणण्याचें साहस मी ह्या परिस्थितीत सुद्धां करीत आहे.

श्रीनगर—काश्मीर
तारीख ६ नोव्हेंबर, १९४१.

सौ. **स. दे.**

# अर्पण

केवळ ज्यांच्याच स्फूर्तीनें व उत्तेजनानें आयुष्यांतील
बहुतेक सर्व गोष्टी शक्य झाल्या त्या

‘ ह्यांना ’

*आमच्या लग्नाच्या २० व्या वाढदिवशीं*
**सादर सप्रेम अर्पण**

कलकत्ता,
ता. २४-५-१९४१

सौ. सरोजिनी

# अनुक्रमणिका

# प्रकरण पहिलें

## यूरोपला जाण्यापूर्वी

### [सन १९३६ मे, जमालपूर जिल्हा मोंगीर येथें]

ह्या वर्षी आम्हाला ८ महिने सुट्टी घेऊन कोठें तरी जायचेंच होतें. आम्ही नोकरीनिमित्त महाराष्ट्राबाहेर राहात असू, तेव्हां सुट्टी मिळाली, की साहजिकच स्वजनांना जाऊन भेटण्याची इच्छा व्हायची, व त्यामुळें प्रवास फुकटचा असतांना देखील, इतर प्रात बघण्याचें नेहमीं तसेच राही. मला मात्र दर खेपेस नवीन कांहीच बघणें होत नाहीं म्हणून वाईट वाटे. शिवाय आमचा सहवास जवळजवळ, सर्व यूरोपला जाऊन आलेल्या माणसांशी व्हायचा. हल्ली नवीन पिढींतील ऑफिसर पाहिले, की दोनतीन वर्षांच्या नोकऱ्या झाल्या, की चालले यूरोपला, कांहीना तर थोडी देखील सुट्टी घेऊन हिदुस्थानांत राहण्याची इच्छा नाही. तेव्हां अशी जादू यूरोपमध्यें काय आहे हें पाहण्याची उत्सुकता मला लागून राहिली. तेव्हां यंदा सुट्टीवर जायचें तें यूरोपलाच जायचें असा ह्यांच्यामागे मी तगादा सुरू केला, व त्याप्रमाणें ह्या खेपेस यश आलें.

ह्यांचें हिदुस्थानातील इंजिनिअरिंगचें शिक्षण पुरें झाल्यानंतर जास्त शिक्षणासाठी यूरोपमध्यें जाण्यास एका कपनीकडून शिष्यवृत्ति मिळत होती. त्या वेळेस सहजासहजींच सर्व बघणें झालें असतें, पण माझ्या श्वशुरांनीं 'आपण म्हातारा झालों आहें, तेव्हां जाऊं नये, न जाणों शिक्षण होऊन परत येईपर्यंत भेट देखील एकादे वेळेस व्हावयाची नाही.' अशी इच्छा दर्शविल्यामुळें तो बेत तसाच नाइलाजानें राहिला. (अर्थात् केलें तें चांगलें की वाईट हें सांगतांना नवीजुनी पिढी, जमीनअस्मानाचें अतर दाखवील.)

असो. शिक्षणानंतर देवाच्या दयेनें ह्यांना नोकरीचाकरी चांगली मिळाली, पण स्वभाव पडला पक्का हिदुस्थानी, विश्वकुटुंबी. त्यामुळें त्यांना स्वतःचें करण्यास कधींच वाव मिळेना. अर्थात् तें म्हणजे वाईट

असा माझा म्हणण्याचा हेतु नव्हे. पण कोणत्याही एकाद्या गोष्टीचा अतिरेक व्हायला लागला, म्हणजे पुष्कळ वेळां स्वतःच्या किती तरी महत्त्वाच्या गोष्टी करावयाच्या राहतात, व त्यामुळें पुष्कळच फायदा व्हायचा असतो; तेव्हां दूरच्या प्रवासास जाण्याची चालना माझीच मिळाली व आम्ही त्या दिशेनें प्रयत्न करूं लागलों व ता. २३ मे च्या कैसर-ई-हिंद या बोटीनें जाण्याचें आम्ही ठरविलें.

१९३६ साली जानेवारीअखेर कलकत्ता येथें आंतरराष्ट्रीय स्त्री-संघाची परिषद (International Council of Women) भरली होती. ह्या वर्षी यूगोस्लाव्हियामध्यें आणखी एक अधिवेशन व्हावयाचें होतें. ह्या परिषदेस मी हिंदुस्थानची प्रतिनिधि म्हणून जावें असें हिंदुस्थानातील कलकत्त्याच्या शाखेकडून मला सागण्यात आलें. ती एक चांगलीच संधि मिळाली. अशा तऱ्हेनें आम्ही दोघेही जाण्याच्या तयारीस लागलों.

आम्हाला एकच मुलगी आहे (पुस्तकांत तिचा **चबी** असा उल्लेख केला आहे.). तिला सोडून गेल्यास चैन पडावयाचें नाही म्हणून, व तिची शाळा बुडत असताना देखील आम्ही तिला न्यायचें ठरविलें. प्रवास हे देखील दांडगेच शिक्षण आहे. तिलाही बरेंच झालें. एक तर बरा शाळेचा लकडा सुटला !

आम्ही जमालपूरला पांचसहा वर्षे राहिल्यामुळे, आमच्या पुष्कळ ओळखी झाल्या होत्या. तेव्हां सारख्या एकमेकांकडे जेवण-पार्ट्या वगैरे रोज होत. परक्या प्रांतांत मैत्री जास्तच होते. हिंदुस्थानांतील पुष्कळशा प्रांतांतील लोक, तेथें कसे एका घरांतील माणसाप्रमाणें राहात होतों अगदीं. आणि जसजशी प्रवासास निघण्याची वेळ भरत आली, तसतसें ह्या प्रेमळ मित्रसमुहाला सोडून जाऊं नगे असें वाटे.

## निरोप

आम्हाला निरोप देण्याकरितां एका संध्याकाळीं ऑफिसच्या सर्व लोकांनीं पार्टी दिली. आणि खरेंच सत्तेच्या जोरावर स्वाभिमानांत, गुर्मीत, मनुष्य राहिला, तर अंतःकरणानें अत्यंत सज्जन अशा ह्या जन-

समुहाच्या प्रीतीस मनुष्य मुकतो. सत्ता, हुद्दा, हा किती पावसाळ्यांतील उन्हाप्रमाणें क्षणभंगूर आहे! पण ऑफिसमधील सर्व लोकांशीं आपले-पणानें वागल्यास जो सर्वांच्या अंतःकरणाचा ठेवा मिळतो, त्याची मजा कांहीं अवर्णनीयच आहे. असो. आमची मनें निरोप देतांना सद्गदित झालीं. खिन्न मनानें आम्ही एकमेकांचा तात्पुरता निरोप घेतला.

## जमालपूरहून प्रयाण

ता. १६ मे ला संध्याकाळी ५।। वाजतां आम्ही आमचें जमालपूर सोडणार होतों. आज शनिवार, सुट्टी असल्यामुळे बहुतेक सर्व ऑफिसर्स व कारखान्याची मंडळी स्टेशनवर आली. गार्डाची हिरवीं निशाणें फडफडण्याच्या वेळेपर्यंत सारखीं बोलणीं चाललीं होती. झाले. आगगाडीनें आम्हाला आमच्या सुहृदांपासून विभक्त केलें.

## नाशिक

गाडी विद्युद्वेगानें मार्ग आक्रमीत होती. आमची मनेंही प्रवासाच्या विचारांत गर्क होती ता.१७ ला संध्याकाळीं ह्याना ताप भरला. दगदगीचा असेल असें वाटलें, पण नंतर तो ता. २२ पर्यंत निघाला नाही. ता. १८ ला सकाळीच आम्ही नाशिकला पोहोंचलों. कारण येथें माझे माहेर आहे. येथें पुष्कळ मंडळी आम्हास भेटण्यास आली होती. सारखी माणसांची रहदारी चालू होती, व सगळ्यांच्या सहवासांत वेळ केव्हां गेला हें समजलें देखील नाहीं. मात्र ह्यांच्या आजारपणामुळें विरस झाला अगदीं. डॉक्टरांच्या मेहनतीनें ता. २३ ला आराम पडून आम्हाला निघतां येईलसें वाटलें.

ता. १९ ला संध्याकाळीं गोदातटाकीं पटांगणावर मी यूगोस्लाव्हियास हिंदुस्थानातर्फे प्रतिनिधि म्हणून जाणार, म्हणून नाशिककरांची मोठी सभा भरली होती. अध्यक्षस्थानीं कै. रामचंद्र गणेश प्रधान हे होते (त्यांना मी काकाच मानीत असें.). आणि खरेंच, माझ्या काकांविषयीं बोलायचें म्हणजे अंतःकरण कसें भरून येतें. ह्या परिषदेस जाण्याचें श्रेय त्यांनाच आहे. व्याख्यानें देण्याची, सार्वजनिक कार्यांत पडण्याची, फार काय, पण थोडेंबहुत जें शिक्षण मिळालें तें त्यांच्याच प्रयत्नांचें फळ होय. असो. माझें

लहानपण सर्व नाशिकलाच गेल्यामुळें येथील लोकांना मजबद्दलची एक आपुलकीची भावना असे, व त्याच भावनेने मला सर्वांनी प्रेमानें निरोप दिला.

सभेत, मी परिषदेस जाऊन काय करणार; यूरोपमध्ये काय शिकणार; वगैरे गोष्टीचें दिग्दर्शन केले होतें. एक तर आधी करावें मग बोलावे असे मी ठरविलें होते.

## बोरीबंदर

ता. २२ मे ला नाशिक सोडले. घर, स्वजन, सोडून जायचें म्हणून हृदय कसे भरून आले. रात्रभर मनात हुरहूर वाटत होतीच. सकाळी बोरीबंदरवर 'थॉमस कुक' चे पोर्टर आले. त्याबरोबर पोटांत धस्स झालें. पुष्कळसे सामान त्याच्याजवळ दिलें, व आम्ही Retiring Rooms मध्ये गेलों. माझ्या सारसची पुष्कळशी मडळी पुण्याहून आम्हास भेटण्यास आली. सकाळी ११ च्या सुमारास सर्व जण बॅलर्ड पीयरवर गेलों.

## बोटीवर : ता. २३ मे १९३६

सर्वांचे पुन: निरोप घेतले. डॉक्टरी तपासणी झाली व बोटीच्या शिडीवर पाय ठेवला. किती दाबलें तरी डोळ्यातून टिपें अचूक गालावर पडलीच. आपण हिंदुस्थानी माणसे किती हळव्या मनाची! मुलगी मात्र आनंदांत, लहानपण, आईबाप बरोबर, आणि त्यांत नवीन गांवें पहायचीं! मग काय विचारतां, नाचत होती अगदीं!

बरोबर एक वाजतां भोगा झाला. काळजाचें कसें पाणी करीत होता तो आवाज. असो. जहाजानें आपल्या माणसांपासून विभक्त केलें आम्हाला. मुंबईचा किनारा दिसेपर्यंत बघत होतों आम्ही सारखें. चारपांच दिवस जमीन दिसणार नाही म्हणून, व माणसें सुटली म्हणून, जीव धाबरत होता सारखा.

## यूरोपच्या वाटेवर

एडनला पोहोंचेपर्यंत एकदोन दिवस बोट खूप लागली. प्रकृति चांगली असली म्हणजे बोटीवरच्या जीवनाची एक प्रकारची खूप मजाच असते. खेळावें, खावें, प्यावें असा कार्यक्रम असे.

## एडन–सुएझ–जिब्राल्टर

एडनला बोट रात्रीच पोहोंचली. येथें कोळसा घेण्याचें काम होतें. तेव्हां सारखी गडबड होती. पहाटे थोडे गांवांत जाऊन आलों. दोन दिवसांनी सुएझचा कालवा लागला, रस्ता अगदी अरुद—एक जहाज जाण्यापुरताच होता. दोन्ही बाजूनी घरे व रस्ते दिसत. ह्यानतर पोर्टसैद लागलें. सकाळीच गावांत पायी जाऊन दुकानें वगैरे पाहून आलों. येथें सिंधी लोकांची पुष्कळ दुकाने आहेत. दोन दिवसांनीं जिब्राल्टर लागलें. येथे लहान जहाजाने आम्ही व काही मित्रमडळी मिळून किनाऱ्यावर आलों. मोटारीने गावांत फिरून आलो. हे मिलिटरी लोकाचें ठाणें आहे.

## टँजिअर—(आफ्रिका)

नंतर टॅजिअर लागले. मित्रमंडळीसह पायीच गांवात गेलों. येथील पुष्कळशी वस्ती मुसलमानांची आहे. त्याचा त्या दिवशी मोठा सण होता. त्यामुळें रस्त्यात खूप गर्दी होती. गोऱ्या बायका बुरखा घेऊन आपल्या मुलासह खिडकीतून मजा बघत होत्या. नतर आम्ही बाजारांत हिंडून आलो. तेथे घोसाळी, वांगी वगैरे आपल्या भाज्या दिसल्या. लोकांच्या अंगावर कांही उठलेले दिसले म्हणून कोणताही पदार्थ घ्यावासा व खावासा वाटला नाही. हळद, मसाला, मिरची इत्यादीची आपल्याप्रमाणे दुकाने पण दिसलीं.

## मार्सेलीस

ह्यानंतर मार्से बंदर लागले. आमच्याबरोबरच्या Mrs. Datta च्या Trip च्या मुली व इतर स्नेही मंडळी येथेच उतरली. येथे बोटीवरचा गहूं, दाणे, वगैरे माल उतरवला गेला. Lunch नंतर आम्ही गांव पाहण्यास निघालों. येथील भाषा फरेंच, तेव्हां मोठीच पंचाईत आली. येथील लोक परकीयांकडे न्याहाळून बघत. ह्या बाबतींत इंग्लिश फारच सज्जन. कोणी या, कोणी जा, ते कधीं staring करायचे नाहीत. येथें कॉफी व दारु पिण्याचें बंड फार. आणि आमच्यासारख्यांना तर उठल्याबसल्या पाणी हवें. Notre Dame व कांहीं चर्चेस बघून आम्ही संध्याकाळीं बोटीवर परत आलों.

## प्लीमथ

ह्यानंतर प्लीमथला थोडा वेळ बोट थांबते. तेथन संध्याकाळीं ४–५ च्या सुमारास आमची बोट लंडनच्या Tilbury Docks जवळ येऊन धडकली. येथें सामान वगैरे स्वतःच उचलून Customs मध्यें दाखवून भराभर गाडी गांठली. ता. १२ जून १९३६ रोजी २१ दिवसांनी आम्हीं आमचें समुद्रावरील फिरतें घर सोडले.

## लंडन

स्टेशनवर चहूंकडे किती शात! आम्हाला पाहून विनोदाने एक इंग्रज आपल्या पत्नीस म्हणाले, 'Joan, No गरम चहा, पान, विडी, माचीस् Here.' आपलें स्टेशन आले म्हणजे बहिऱ्याला देखील ऐकूं येईल. काय तो कलकलाट व गोंधळ! घंटा वाजणें, एंजिननें भोंगा वाजविणें, गार्डानें शिटी फुंकणें, व एवढा गाजावाजा करून देखील गाडी सुटल्यावर कित्येक जण धावपळ, गोधळ करीतच असतात. असो. हा सर्व शिस्त (Discipline) व शिक्षण याचा परिणाम आहे, असे वरचेवर प्रत्ययास येई. २–३ तासांतच आम्ही St. Pancras स्टेशनवर पोहोंचलों. चहूंकडे किती बुजल्यासारखे होई, सामान स्वतःच उचलणें—सगळाच नवीन प्रकार! असो. स्टेशनवर आमची कांही आप्तमंडळी आली. त्यांना पाहून जरा हायसें वाटलें.

## लंडन, ता. १२ जून

बोटीवरच आमची एक पंजाबी डॉक्टर व त्यांच्या पत्नींची फारच दोस्ती झाली होती. डॉक्टरमहाशय वरचेवर यूरोपच्या वाऱ्या करीत. ते व त्यांच्या पत्नी १५–१६ वर्षे यूरोपमध्यें राहिलेले होते. एवढें असून देखील ते अगदीं स्वतःच्या देशावर निःस्सीम प्रेम करणारे व फारच सज्जन होते. त्यांच्या बरोबरच आम्ही लंडनमध्यें हाईडपार्कजवळ Fellowship Club, 51, Lancaster Gate येथें गेलों. येथें आपलें, व इंग्लिश जेवण मिळत असे. आम्ही शाकाहारीच राहिलों. एक तर आपलेंच जेवून सर्वांची अतिशय सुंदर प्रकृति राहिली, व कधींच मांस

न खाल्ल्यामुळें त्याची जरूरी पण वाटली नाही, व मांस खाल्ल्यानेंच England retruned असा शिक्का लागतो अशी पण भावना नव्हती. ह्या हॉटेलमध्यें आपली मोठमोठी मंडळी उतरण्यास येत. त्यामुळें परकेपणा कधींच वाटला नाही.

२–४ दिवस येऊन झाले न झाले तोंच ह्यांना पुनः ताप येऊं लागला. त्यात पडसे-खोकलाही होता. ता. १ जुलैपर्यंत हे घरांतच निजून होते. हिंदुस्थानांत डॉक्टर वाटेल तितके वेळां घरी येतात, नोकर-चाकर औषध आणायला, मदतीला. मोठीच काळजी येऊन पडली. सर्व मी व मुलगीच करीत असू. तरी पण आमचे पजाबी डॉक्टर व लाहोरचे सुप्रसिद्ध डॉक्टर धर्मवीर ह्याच्या मेहनतीने ह्याना बरें वाटलें, व मग आम्ही आनदाने राहू लागलो.

ह्यानंतर आमच्या ओळखीचे झालेले एक महाराष्ट्रीय गृहस्थ व आम्ही तिघे, सर्व जागी एकत्रच जात असू. सकाळी छोटा हजेरी (Break-fast) नंतर बाहेर पडायचे व ठिकाणे बघून यावयाची, असा कार्यक्रम असे. एक दिवस पार्लमेंटमध्ये वादविवाद ऐकायला गेलों. लंडनमधील Slum Area, St. Andrews Hospital पाहिले. तें पाहण्यास फारशी परवानगी, वशिला वगैरे कांहीच लागत नसे. चटकन् व हौसेनें लोक दाखवीत. एक दिवस महात्मा गांधी Round Table Conference ला आले असतांना त्यांचें वसतिस्थान म्हणजे Kingsley Hall पाहण्यांत आला.

## हेन्डन

Hendon येथें Air Display पाहिला. अशा तऱ्हेनें प्रसिद्ध ऐतिहासिक इमारती, बागा, राजवाडे वगैरे पाहिले. पाहण्याच्या किती सुखसोयी. पहिल्या दिवशी वाटलें खाणार कोठें ? पण यूरोपमध्यें खिशांत पैसाच हवा फक्त, म्हणजे कमी कोठेंच नाहीं.

रात्रीं कधी कधी थिएटरला जात असूं. किती मजा वाटे प्रेक्षक-समुदाय पाहून ! बत्त्या स्टेजवरच असायच्या, प्रेक्षकांच्या बाजचे दिवे मंद केलेले असायचे, पाठ फिरवून आजूबाजूंनीं पाहिल्यास तीं गुलाबी मुसमुसलेलीं तोंडें किती नयनमनोहर दिसत. मुलांचा गोंगाट, कीं गडबड

कीं कलकलाट कोठें नाही. स्त्रियांचे सुदर पोषाख, गौरतनुलता, व सशक्त शरीरें व चालण्याबोलण्याची हुषारी पाहून कसें समाधान वाटे. थिएटर सुटून जनसमूह निघून जाऊं लागला तरी कोठे तरी उभें राहून त्याच्याकडे पाहात राहावेंसें वाटे. एका रात्री आम्ही दोघे Victoria Embankment जवळ Electrical Engineers च्या Conversazione ला G.E.C. च्या इजिनिअरबरोबर गेलों. समारभ फारच गोड झाला. आम्ही हिदुस्थानी ७–८ जण होतो. जगातील सर्व भागातील इजिनिअर्स येथें जमले होते. सर्वाशी पुष्कळ गप्पा मारायला मिळाल्या. अध्यक्षानी थोडा वेळ इंग्लंडमध्यें विजेची प्रगति कशी होत गेली हें सागितले. नंतर आलेल्या लोकांची ओळख वगैरे झाली रात्री ११॥ ला अल्पोपाहार होऊन हा गोड समारंभ सपला.

लंडनमध्ये मोठमोठी दुकानें बघण्याची फारच मजा असे. आम्ही वरचेवर ऑक्सफर्ड स्ट्रीटवरील Self-ridges मध्ये जात असू कारण तें वाटेवरच होते. व ती एक करमणूकच असे.

## सेल्फ-रिजेस्-आर्कसफर्ड-स्ट्रीट्

हें किती तरी मोठे दुकान आहे. ह्यांत संसारोपयोगी सर्व वस्तू मिळतात. पुरुषाना लागणाऱ्या वस्तूचा प्रचड भाग अगदी स्वतत्र, तर स्त्रियांचा निराळा, तर मुलामुलीचा आणखी निराळा. प्रत्येक भागावर वस्तूंच्या नांवांच्या मोठमोठ्या पाट्या, दर वगैरे लिहिलेले, इतकें असे. एकाद्या भागांत नुसते दिवाणखान्याचे सामान अगदीं सुदर पद्धतीने सजवून ठेवलेलें असे. तमेंच निजायच्या खोल्या पलंग घालून त्यावर सुदर बिछाने, उशा, खाली रंगीबेरंगी गालिचे इतके आकर्षक असत, कीं सारखें पाहावेसें वाटे. किती मोठ्या प्रमाणावर माल निघतो ! व लोकांची पण घेण्याची प्रवृत्ति दाडगी. सजविलेली दुकानें पाहून आपण सिनेमा पाहतों, की गौरीची आरास पाहतों असा भास होई. इतकें दुकान मोठे, कीं बघत असताना वाट सहज चुकली जायची. अगदीं वरच्या गच्चीवर, कृत्रिम सुंदरसा बगीचा आहे. तेथें उपाहारगृह पण आहे. अगदी तळमजल्यावरही खाण्यापिण्याचें दुकान आहे. माल घेतां घेतां वेळ झालाच

तर जेवणासाठीं घरी जायची घाई नको व्हायला. मधून मधून रेडिओचें मधुर गायन, किवा वाद्याचा सुस्वर ताफाच्या ताफा असतो. अशा तऱ्हेनें गिऱ्हाइकाना आपलेसे करून मोहून टाकण्याची कला इंग्रजांना उत्तम साधलेली आहे. एका विभागात, कपडे यत्राच्या साहाय्याने भराभर धुवायचे-पिळायचे-वाळवायचे कसे हे दाखविलेले आहे.

लिफ्ट चालविणाऱ्या, माल विकणाऱ्या सर्व मुलीच मुली चोहीकडे! लिफ्टच्या मुली तर फारच देखण्या, तरतरीत, छानसे कपडे केलेल्या असायच्या. त्यांना पाहण्याकरिताच केवळ काम नसताना देखील लिफ्टमधून जावें-यावेंसें वाटे. त्याचे ते रगविलेले ओठ, गुलाबी गाल वरचेवर दृष्टीस मोहिनी घालीत अगदी. देखणेपणा वशीकरणास कारणीभूत होतो म्हणतात तो असा!

आपल्यासारखी नवखी माणसे गेल्यास एकादी सुदरी चटकन् येऊन Can I help you म्हणून विचारी. कधी म्हणून कोठे तिष्ठत बसायला लागायचें नाही मुळी.

एका भागात आधुनिक स्वयपाकघर, व तेथील अगदी नव्या तऱ्हेची साधने दाखविली आहेत. जायफळ, वेलदोडयाची पूड करणे, बटाटयाचे काप काढणे, फळाचा रस काढणें, भाजी चिरणे, Vacuum Cleaner ने कसे चटकन् घर झाडता येते, Electric oven मध्ये तऱ्हतऱ्हेचे पदार्थ कसे चटकन् व थोडया खर्चांत होतात. इंग्रजाना कोणत्याही कामाला वेळ चालत नाही. सर्व कामें चुटकीसरशी झाली पाहिजेत त्याची अगदी.

उत्तम फर्निचर, रंगीबेरंगी पडदे, सुदर शय्यागृह, बिछाने, रजया, सर्व दुकानभर पसरलेले, गालिचे वर विजेचा प्रकाश, चुणचुणीत सुदर युवतीची माल घेण्याची गर्दी, त्यांच्या तो बुटाचा ठकठक आवाज, विक्रेत्या अभिनव बालिकांची हसरी गुलाबी तोंडें वगैरे सेल्फ–रिजेसकडे लोहचुंबकाप्रमाणें आम्हाला खेचून नेत अगदी. खाली वर जाण्याकरितां Escalator म्हणजे सरपटणारा जिना असे. तो एकसारखा फिरत राहायचा. तो चबीला फार आवडे. सर्व मुले त्यावर खेळत राहायची. त्यांना ती एक गंमतच वाटायची. खालीं Show windows मध्ये तऱ्हत-ऱ्हेचे फ्रॉक पाळीपाळीनें येऊन अंगविक्षेप करून, सर्व बाजू दाखवून जात. असे सारखे किती तरी यायचे व जायचे. अशा दुकानांत बघायला जाण्यास कोणासही मज्जाव नसतो.

---

# प्रकरण दुसरें

## रोजनिशी

### तारीख १० ऑगस्ट १९३६

आज सकाळी १०॥ वाजता टयूबने* प्रवासास निघालों. लंडनच्या जवळपासच्या गांवी जाण्यायेण्यास फार लवकर व सोयिस्कर व स्वस्त अशी ही सोय आहे. मला ही प्रथम आवडेना. कारण खाली आगगाडीच्या प्लॅट्फार्मवर जाण्यास Escalator लागे. मला त्यावरून जाण्याची फार भीति वाटे. ह्यावर प्रथम पाय ठेवतांना नीट पायरीच्या मधोमध ठेवला तर ठीक, चार पायऱ्यापर्यंत जर कडेवर ठेवला तर एकदम पडून मनुष्य शेवटल्या पायरीवर सरपटत जातो. आमच्या बरोबरच्या पंजाबी डॉक्टरनें मला ओढून त्यावर नेलें व पाय नीट न ठेवल्यामुळे एकदम खालच्या पायरीवर मी गेलें. ती जी भीति बसली ती पुष्कळ दिवस जाईना. नेहमी मी कोणाला निदान मुलीला तरी धरून जाई. पुढें जेव्हां मला एकटीला कामानिमित्त जावें लागे तेव्हां झाली सवय.

आम्ही सर्व होबर्नला हेन्ले (Henley) मोटार कंपनीत मोटार घेण्याचें नक्की करण्याकरितां गेलों. स्टुड्बेकर सलून घेण्याचें ठरविलें. नंतर जी० ई०सी० विजेच्या कंपनीत व झेनिथ घड्याळाच्या कंपनीत पायीच गेलों.

### १३ ऑगस्ट

या दिवशी सकाळीं १० वाजतां आमच्या नव्या गाडीतून आम्ही तिघे, ह्यांचे एक मित्र व मुलीची मैत्रीण असे मिळून आम्ही ऑक्सफर्डला जाण्यास निघालों. इंग्लिश ड्रायव्हर थोड्यापुरता नेमला होता. नव्या गाडीची मी पूजा केली प्रथम आणि मग निघालों.

---

* टयूब = जमिनीच्या पृष्ठभागाखालून ये-जा करणारी ही एक विजेनें चालणारी आगगाडी आहे.

## १५ ऑगस्ट १९३६ : ऑक्सफर्ड

रस्त्यांतील वनश्री फारच सुदर होती. चोहों बाजूनी हिरवींचार मैदाने. उंच उंच वृक्ष शोभिवंत दिसत होते. रस्ता खेडेगावांतून होता. आमच्या लखनौ, लाहोर इतपत ह्याचे खेडें. आमच्या दृष्टीला खेडें म्हणजे शेणाच्या गोवऱ्या, झोपड्या, दारिद्र्य असें माहीत. ते म्हणाले म्हणून आम्ही त्यांना खेडे म्हणू. आसपासचे टुमदार बंगले हे शेतकऱ्यांचे समजूं एवढेच. रस्त्यानी Automobile Association चे लोक असत. आमची A. A. चिन्हाची गाडी पाहून सलाम करीत. ऑक्सफर्डला आम्ही २॥ तासात पोहोंचलों. येथे आम्हीं ड्रायव्हर काढून टाकला. पुढील प्रवासात आम्ही दोघेच आळीपाळीने गाडी चालवीत असूं. लिकन कॉलेजमधील पुण्याचे रा. तावडे ह्यानी आम्हांस कांहीं कॉलेजें दाखविली व नंतर Fifth International Montessori Conference बघण्यास गेलों. सभासदाबरोबर हिरव्या कुरणावर चहा घेतला. संध्याकाळी करमणुकीचा कार्यक्रम होता. मॅडम माँटेसरी पण उपस्थित होत्या.

लहान मुलांनी, तरुण मुलीनी, व एका इटालियन बाईनीं नाच केला. किती बांधेसूद शरीरें त्यांची! हिरव्या कुरणावरील सुशोभित रंगीबेरंगी फुलांच्या सान्निध्यात त्या स्त्रियाचा नाच फारच रमणीय दिसला. सुदर कमावलेले आणि बांधेसूद शरीर असलें म्हणजे बाह्य नट्टापट्टाची काही फारशी जरूरी नसते. ‘किमिवहि मधुराणां मंडन नाकृतिनाम्’ ह्या कवि-उक्तीची साक्ष पटली अगदी त्या सुदरीना पाहून.

संध्याकाळी गांवांतून, नदीवरून वगैरे हिंडून आलों. ९॥ वाजतां Turl Road वर Exeter Hotel मध्ये वस्तीस आलों. हॉटेल अगदी स्वच्छ व शांत होतें. दुसऱ्या दिवशी सकाळीं मोटारमधून Abingdon येथें हिंदुस्थानच्या एका सेवानिवृत्त गव्हर्नरांच्या घरी गेलों. त्यांनीं तेथें बेताचाच छानसा बंगला बांधला आहे. ते व त्यांच्या पत्नी व कामाला एकच Maid (मोलकरीण) आहे. सर्व जण कामे करितात. लाटसाहेब शेती करून कालक्रमणा करितात. ७०–७५ वर्षांच्या गृहस्थांची कामाची तरतरी पाहून कौतुक वाटलें अगदी!

आमच्याकडील निरुद्योगी व ‘कशांत काय न् फाटक्यांत पाय’ अशा

मंडळींची कींव आली. पांचसहा रुपयांच्या एकेका खोलीत राहणाऱ्या लोकांकडे दोन भाडी व एक चहाचा कप धुण्यास एक रुपया महिन्याची मोलकरीण लागते. व मी कांही काम करीत नाही हें सांगण्यास डौल वाटतो आम्हांला ! स्वत.च्या घरचे काम करण्यास लाज व कमीपणा कोणता ? लाटसाहेबांच्या जागी आम्हीच असतो, तर पिढ्यान् पिढ्या लोळून, मजेने खाऊन काढल्या असत्या आम्ही. आणि खरेच, असेच आम्हो उद्योगी असतों तर अशी स्थिति कां येती आम्हांला ?

## १६ ऑगस्ट १९३६ : शेक्स्पीयरच्या जन्मभूमींत

नंतर पुन. प्रवास सुरू केला. येथून Strattford-on-Avon या आंग्लकवि शेक्स्पीयरच्या जन्मभूमीस गेलो. निसर्ग व मानवी सुखसोयी या दोन्हीचा सुदर मिलाफ रस्त्याने दिसला. शेक्स्पीयरचे घर, त्याची शाळा, लिहिण्याची जागा सर्व पाहिले. शेक्स्पीयर पुनः आपल्याला दिसावा, येथे तो खेळला असेल, बसला-उठला असेल, काय अप्रतिम डोके त्याचें, कीं ज्यांतून भराभर अशी अद्भुत काव्ये व नाटके निर्माण झाली. त्याचें सर्व पाहायला मिळाल्याने फारच मजा वाटली. दिवसभर गांवांतून पायीच हिंडलो. रात्री एका शेतकऱ्याच्या घरी राहिलो. एका तरुण जोडप्याचा बंगला होता तो. बाई किती तरतरीत व हुषार होती. सुदरसे फर्निचर व्यवस्थित रीतीने माडलेले होतें. सर्व गोष्टी बाई हुषारीनें व स्वच्छ अशा देई.

एका रात्रीं Shakespeare Memorial Theatre मध्यें 'Twelfth Night' हें नाटक पाहण्यास गेलों. दुसऱ्या दिवशीं सकाळीं बर्मिंगहॅमला गेलों. विट्न् येथे हे General Electric Company त कामावर गेले. आमचे मित्र व मुलीची मैत्रीण लंडनला निघून गेलीं. त्यांच्यावाचून आम्हांला अगदीं एकटे एकटे वाटलें. कोणीच आपलें नाहीं. लंडनला दोनतीन हजार तरी आपली माणसें असत. आमचे ते मित्र व आम्ही लंडनमध्ये सारखे बरोबर असू. त्यांचा स्वभाव फारच विनोदी व चांगला असे. कांहीही संकट आलें तरी आनंदानें कोठल्या कोठे काढून नेत असत. ही वृत्ति त्यांनीं कोठून पैदा केली तें देवच जाणे ! आनंदरस

घ्याले होते ते. मुलांबाळांना सगळ्यांनाच हवे असत ते. बर्मिंगहॅमला आम्ही Yenton येथें Mitchell & Butler Hotel मध्यें राहात असं. थाटाचें होतें अगदी.

## २० ऑगस्ट : बर्मिंगहॅम

हें गांव लंडनच्या मानानें अगदीच कमी प्रतीचें पण इंग्लंडमध्यें कारखान्याकरितां प्रसिद्ध व दुसऱ्या दर्जाचे आहे. संध्याकाळी पायींच येथील आपले मराठी सर्जन पारधी ह्याच्याकडे गेलो. हे येथे ३६ वर्षे Midland Hospital मध्ये Chief Surgeon आहेत. लंडनला Harley Street मध्यें दर मंगळवारीं जाऊन ते काम करतात. आपल्या कामांत ते इंग्रजांवर कुशल आहेत. कोणतेंही मोठे ऑपरेशन् त्यांच्या सल्ल्याशिवाय होत नाही. खूप पैसा मिळविला त्यांनी. त्यांच्या पत्नी इंग्लिश आहेत. एक मुलगा व एक मुलगी अशी मुले आहेत त्यांना. हल्लीं वय ६०. स्वभाव फारच चांगला दिसला त्यांचा. आम्हांला 'जेवायला राहा, आपल्या तऱ्हेचें जेवण मी स्वत. करीन' असें ते म्हणाले. येथेच औधच्या राजे-साहेबांच्या नात अक्कासाहेब ह्यांची पण ओळख झाली. त्या तेथें चित्रकलेचा अभ्यास करण्यासाठी राहिल्या होत्या.

दुसऱ्या दिवशी बर्मिंगहॅम सोडलें. जातां जातां बोर्नव्हिल्ला चॉकोलेट करण्याची कॅडबरीची फॅक्टरी पाहून आलों. केवढा प्रचंड पसारा तो. व किती पद्धतशीर मांडणी व व्यवस्था. लहान पगारापासून तो मोठ्या पगारा-पर्यंतच्या कामगारांच्या सुखसोयी पण पाहण्यासारख्या.

चॉकोलेट करण्याची शास्त्रीय पद्धति, मापें वगैरे पाहून मजा वाटली. कोणत्याही गोष्टीत अंदाज, भरमसाटपणा नाही. पोळी लाटली ती देखील ठराविक, मोठी, जाड, अशी. सर्व हिशेबी काम. त्यामुळें काम चोख होतें. कामकऱ्यांमध्ये बायकामुलीचे प्रमाण जास्त दिसलें.

## २१ ऑगस्ट : स्टॅफोर्ड

तें पाहून ३० मैलांवर Stafford ह्या गावीं गेलों. हे स्वत: जास्त अभ्यासाकरितां जागोजागी मोठमोठे विजेचे कारखाने पाहावयास जात. कामें व गांवें याची त्या निमित्तानेंच पहाणी व्हायची. ह्यांचा सारा

दिवस कारखान्यांत जायचा. एकाद्या गांवीं माझें सामाजिक काम निघे. नसल्यास मी व मुलगी गांवभर भटकत असू. इकडचीं गांवें सुरक्षित, भीति कोठेंच नसे.

Stafford येथें हे English Electric Company त गेले. दुपारीं कंपनीचे Export Manager ह्यांच्याकडे चहाला गेलों. बाईंनीं चहाचे पदार्थ वगैरे स्वतःच केले. चहा पण स्वतःच करून आणला. ह्यांच्याकडे मोलकरीणसुद्धां नव्हती. कसे सर्व व्यवस्थित होतें. पुनः सर्व करून झकास कपडे वगैरे घालून हसतमुखाने गप्पा मारायला बाई तयार!

दुसऱ्या दिवशी सकाळी Crewe ला जाण्यास निघालों. रस्त्याच्या बाजूची वनश्री फारच रमणीय होती. दोहों बाजूनी टुमदार बंगले होते. स्टेशनच्या बाजूला गाडी थांबवून हे कामावर गेले. कंपनीच्या मॅनेजरांनीं L. M. S. Railway Hotel मध्ये आम्हांला Lunch दिला. नंतर लागलीच Crewe सोडले, व ५॥ ला Manchester ला पोहोंचलों.

## २४ ऑगस्ट : मँचेस्टर

पुष्कळशी हॉटेल्स शोधलीं. जागा कांही कोठे मिळेना. शेवटी मिळाले एक. हे तितकेंसें स्वच्छ नाहीं वाटले. एक दिवस Manchester College of Technology पाहण्यास गेलो. रात्री आठची वेळ. पण संरक्षकानें सर्व दाखविलें. उपकारच म्हणायचे त्याचे. नाही तर भलत्या वेळीं कोण दाखवितो तें ?

## साऊथ पोर्ट—Sea Side Resort

दोनतीन दिवस येथें राहून आम्ही South Port ला गेलों. येथें आमच्या नात्याचा एक विद्यार्थी असे. साऊथ पोर्ट हें गांव फारच रमणीय वाटलें. त्या रात्री तेथील फळाफुलांचें प्रदर्शन पाहण्यास आम्ही गेलों. किती चित्ताकर्षक मांडणी होती सर्व! खूप माणसें पाहायला लोटलीं होतीं. ऑगस्ट हा महिना साधारण सुटटीवर लोक जाण्याचा असतो. तेव्हां समुद्रकांठच्या गांवी फारच मजा असते.

आज सर्व दिवसभर खूपच हिंडलों. रोज निदान ७–८ मैल चालणे व्हायचें. संध्याकाळीं L.M.S. Hotel मध्यें जाऊन कॉलिफ्लॉवर, बटाटे

वाटाणे, दूध व रोटी असे खाल्ले. भूक खूपच लागली होती. व आतांच्या आतां आपलें अन्न खायला हिदुस्थानातच जावें असे वाटलें. थोड्या पैशात व पुष्कळ खायला असे जर कोठे असेल तर ते आपल्या हिदुस्थानांतच. येथे सर्व बाहेर थाटमाट. खायचे करण्यात बायकाचा फारसा वेळ जात नाही. जेवणानतर समुद्रावर गेलो. तेथें एका चमत्कारिक गाडीत बसलों. यंत्र सुरू केल्यावर गाडी खटाखट वाटेल तशी जाऊं लागली. एक प्रकारची साहसाची मजा असते त्यात. मला खूप भीति वाटली. पण चारपाच मिनिटांतच ती नाहीशी झाली

## २८ ऑगस्ट

एक दिवस दुपारी मुलीला घेऊन मी समुद्रावर गेलें. सूर्यप्रकाशामुळें सर्व सुदर दिसत होते समुद्रावर बायकामुलांची गर्दी होती अगदी. वर्षाच्या मुलापासून सर्व पाण्याशी, रेतीशी खेळत होते. गोरीपान अगे, व चित्रविचित्र रगाचे पोहण्याचे पोषाख (swimming costumes) फारच रमणीय दिसत. इग्लिश लोक, मोकळ्या हवेचे व खेळाचे भयकर भोक्ते आहेत. त्यामुळेच त्याचे शरीर असे गुटगुटीत आहे. जवळच एक Day Nursery आहे. ज्या आईबापाना हिडाफिरावयाला, मजा करायला जायचे त्याना मुलें घेऊन जाणे त्रासाचें असतें. मुलें चोळवटली जातात व आपलीही मजा होत नाही अशानी येथे मुले ठेवून जावीत. तासाला दोन पेन्स दर पडतो. लहान मूल घरात असले, की आईला सिनेमा-नाटकाला कोठे जाता येत नाही. पण अशा सस्थामुळे ती गैरसोय दूर होते.

आज शनिवार, सुट्टी असल्यामुळे रस्त्याने माणसाची खप गर्दी होती. प्रत्येक जण मजा करीत होता. तान्ही मुलें, म्हातारी, तरुण, तरुणी, कोणी चाकाच्या ढकलगाड्यांतून स्वत.च चालवून, स्वतंत्र वृत्तीनें विहार करीत होते. बायकांना तरी स्वतत्रता किती! ना कोणाचा धाक ना बंधन. रस्त्यानें रात्री अपरात्री जाण्याची, एकटे हिडण्याची मुळीच भीति वाटत नाहीं. ह्याच्या विरुद्ध आमचें. सर्व परावलंबी. सतरा बंधने व अठरा धाक. तितकी स्वतंत्रता पण नाही. त्यामुळे साहजिकच प्रकृतीवर परिणाम होतो.

रात्रीं एका Cafe मध्यें खाऊन आम्ही व आमचे नातलग असे सर्व समुद्रकाठीं गेलों. आज तेथें दारुकाम होणार होते. समुद्रावर व्हेनिस येथील गोंडोलाप्रमाणें लहानमोठ्या Pleasure Boats रंगीबेरंगी रोषणाई करून तरुण-तरुणी वल्हवीत होत्या. सुंदर गोरी अंगें, वर तऱ्हेतऱ्हेचा विद्युत्प्रकाश इंद्रधनुष्याप्रमाणें पाण्यावर ललकारीत होता. सर्व देखावा नयनमनोहर होता. आम्ही हिंदुस्थानी आदमी, असल्या गमतीची थोडीच आम्हाला संवय आहे ! शिवाय मने तरी कोठे इतकी स्वस्थ ? हिंदुस्थानी मनाची रचना देखील निराळीच. मजा करायला तरी जन्मजात संवय लागते. मजा मात्र चबीला वाटायची. मला ह्यात बसायचें, तर तें मला द्या, तर मी बसणार बोटीत अशी सारखी तिची टकळी चालायची.

एका बाजूला बायकांचा नाच, तर कोठें रेडिओ; अशी अनेक तऱ्हेची करमणूक होती. पैशाचें मात्र खोबरे होई पैशाच्या करमणुकी हेच लोक करूं जाणे. आमच्या हिंदुस्थानात खायची मारामार मग दुसरें बोलायलाच नको. आज येथे स्पेशल आगगाड्या, मोटारी सारख्या भरभरून येत. एक तासभर दारुकाम झाले.

## ३० ऑगस्ट : लिव्हरपूल

आज आदितवार. सकाळपासून मुळीच सूर्यदर्शन नव्हतें. त्यामुळें चैन पडेना. १२ च्या सुमारास आम्ही लिव्हलरपूलला जाण्यास निघालों. २॥ वाजतां तेथें पोहोंचलों. रेस्टारॉंमध्यें भात-भाजी खाऊन गावांत पायीच हिंडलों. आपले अन्न खाल्ल्यानें जरा हायसे वाटले. गावातील रस्ते फार रुंद, टोलेजंग इमारती, एकदर मँचेस्टरपेक्षा स्वच्छ, कमी धुराचें, असे वाटले. जहाजाचें हें स्टेशन असल्यामुळे Dock वर खूप जहाजें दिसली. मुसलमान खलाशी हिंडतांना दिसले. मुसलमान पाहून देखील तो आपला आहे असें वाटलें. पुष्कळ दिवसांनी आपला मनुष्य पाहिला. किती जरी आम्ही एकमेकांशी भाडलों तरी अखेर ते व आम्ही एकच ना ?

संध्याकाळच्या वेळेस साऊथपोर्टला परत आलों. Lord Street वर बँड होता. बँडवाल्यांचा काळचा विजारी व तांबडा कोट असा मिलिटरी थाटाचा पोषाख होता. रस्त्यावरील दुतर्फा झाडांत हिरवे व तांबडे दिवे

लावले होते. सर्व वातावरण आनंदी गोष्टींनी दुमदुमून गेलें होतें. वरवर पाहणाराला तरी ह्या लोकाना कांही काळजी आहे की नाही असें वाटतें. पैसा तरी कोठून आणतात हे ?

## ३१ ऑगस्ट

आज पौर्णिमा होती. आकाशात चद्रराज प्रफुल्ल झाल्यानें रत्नाकराला प्रेमाचें भरते आलें होते. व त्यासरशी समुद्रावरील रेतीशी सागर लडिवाळपणाने खेळे व रेती आत्मसात् करी. आणि खरे म्हटले तर निसर्गाचा खेळ बघण्यातच सात्त्विक आनद नाही का ? दु खी मनाला देखील परमेश्वराच्या अगम्य लीलेनेच विरगुळा पडतो. त्यात पैचाही खर्च नाही. चद्ररायाची शीतल प्रभा पाहून आमचे हिदुस्थानी सात्त्विक मन उल्हसित झालें. हिदु सकृतीची मने निसर्गात चट्दिशी विलीन होतात. परमेश्वराजवळ एवढें मागणे आहे, की कृत्रिम गोष्टींत सुख मानायला आम्हांला लावू नकोस. आमचें तें नदनवन—घर, पति व मुले ह्याच्या निकट सान्निध्यातच गोड वाटते आम्हांला.

साऊथपोर्ट सोडण्याच्या आदल्या रात्री आम्ही आमच्या नातलगाच्या घरी गेलो. ते एका म्हाताऱ्या शेतकरीणबाईकडे राहात असत. ती त्याचें आईप्रमाणें करी. घर आधुनिक सामग्रीनें सुसज्ज होतें. बाईला वर्तमानपत्रातील आजूबाजूची खूप माहिती असे. आमचें पण ती खूप अगत्य करी. आम्ही जाणार म्हणून पुष्कळ खायला दिले तिनें.

आज सकाळी १० ला हें गांव सोडलें. Spring Bank नांवाचें आमचें घर Mirs Birk नांवाच्या मास्तरणीने चालविलें होतें. व्यवस्था छान होती. बाई सर्व स्वतःच करी. राहणाऱ्या बहुतेक सर्व वृद्ध कुमारिकाच असत. एकंदर येथें राहायला आम्हांला फार आवडलें.

## २ सप्टेंबर

ह्यानंतर इंग्लिश लेक डिस्ट्रिक्टमधून आम्ही आलों. एकसारखा झिमझिम पाऊस पडत होता. आजूबाजूस लहान लहान डोंगर होते. धुक्यामुळें गिरिराज आकाशाला स्पर्शच करीत आहे असा भास होत होता. मधूनच दिननाथ सृष्टीशीं लपडाव खेळे. घटकेंत दिसे तर घटकेंत मेघां-

आड लपून बसे. आम्ही मात्र आ करून त्याची एकसारखी वाट पाहात होतों अगदीं. आमचा रविराज जरा दिसला नाहीं कीं कसेंसेंच होई.

सृष्टिशोभा किती जरी सुदर असली तरी ती पाहण्यांत कधी आपलेपणा असा वाटलाच नाही तेंच दार्जिलिंगला जातांना हिमालयाचा कानाकोपरा जरी पाहिला तरी मनोभावना प्रेमानें उचंबळून येतात. मायदेशांचे सर्वंच चांगलें दिसतें. आणि खरेच त्याची खरी किमत स्वदेश सोडला म्हणजेच कळते.

रस्ता काळा भोर गुळगुळीत स्वच्छ असा होता. बाजूनी जिकडे पाहावे तिकडे हिरवी मखमल आच्छादली आहे असे दिसे. नागमोडी रस्त्यानें मोटार भराभर वळणे घेत होती. इतर मोटारीची पण खूप गर्दी होती. शिवाय मधून मधून सशक्त गोऱ्यापान, खेडवळ अशा आंग्ल तरुणी सायकलवरून आपला मार्ग आक्रमीत असताना दिसत; तर कांही जणी आपल्या लहान लहान मुलाना गाडींतून हिडवताना दिसत. अशा तऱ्हेनें वनश्री पहात पहात आम्ही Lake Windermere ला आलो. कसे शांत होतें चोहीकडे ! आसपास पुष्कळ हॉटेल्स होती. त्यांपैकीं एकांत जाऊन प्रथम खाऊन आलों. मग सरोवराजवळ हिडून गाडींत बसलों. व Keswick येथें जाण्यास निघालों. मधून मधून सरोवरें लागत. बाजूनीं दाट झाडी लागे. अधून मधून छानदार बंगले, प्रवाशाकरितां राहण्याची, चहाची वगैरे सोय जागोजागी होती. डोगराच्या उतरणीवरील हिरवा मखमली गालिचा डोळ्याना फारच आल्हादकारक वाटे. सर्व रस्ता डोंगराच्या मधून होता. ३,००० फूट उची आहे. इंग्लंडमधील हा लेक डिस्ट्रिक्ट फारच प्रसिद्ध आहे. मोटारीची सारखी रहदारी सुरू होती. आम्ही संध्याकाळीं ५॥ च्या सुमारास Keswick ला पोहोचलों. येथे बंगले फारच सुदर होते. Bed and Breakfast च्या पाटचा जागोजागीं होत्या. आम्हाला Chest Nut Hill वर एक छानसा बंगला मिळाला ६०-७० वर्षांच्या म्हाताऱ्या विधवा बाईचा होता तो. ती एका Sailor ची बायको होती. लढाईमध्यें त्याची बोट टॉरपेडो झाल्यापासून तो आठ वर्षं वेडा झाला होता. त्यांतच वारला मग. ह्या बाईनी घरांत जागोजागी नवऱ्याचे फोटो, जहाजांचे,

Life Saving Belts चे फोटो लावून ठेवले होते. बाई दुःखी वाटली. घर तिची भाचीच चालवी. ही बाई आमच्याशी फारच चांगली वागे अगदी.

एक दिवस संध्याकाळी Durwent Water सरोवरावर आम्ही पायीच फिरायला गेलो. रस्त्याच्या बाजूला हिरवेचार Golf Links होते. सरोवराकाठी लहान लहान बोटी सहल करण्यास होत्या. त्यातून प्रियमीलनाखातर नवयुवयुवती नौकाविहार करीत होती. हंसहसी मधूनंच पख फडफडवीत एकमेकाशीं गुजारव करीत. त्यांची ती चालण्याची डौलदार ढब चित्त हरून नेई. लहान मुलांची आपल्या आईबापांना आम्हाला बोटीतून जायचें म्हणून गर्दी चालली होती. आमची चबी पण लागली गडबड करायला. म्हणून एका बोटीतून आम्ही पण चक्कर मारून येण्याचे ठरविलें. आमच्याबरोबर एक सुदरसे दुष्यंत–शकुतला होते. दोघेही यौवनभाराने मुसमुसलेले होते. त्यांच्याकडे बघत राहावेसें वाटले. मधूनच किंचित् पर्जन्यवृष्टि झाली. वरुणराजाने जणूं ह्या दुष्यत–शकुतलेवर अक्षदाचा वर्षाव केला. आणि म्हणूनच ते जरा निवाऱ्याच्या जागी जाऊन बसले. आणि मला मात्र गडकऱ्यांच्या ‘ रंग गुलाबी संध्या पसरी पश्चिम दिग्भागी ’ ह्या गुलाबी कोडयाची साक्ष पटवून दिली त्यानी. एकमेकाच्या बाहुपाशांत सरोवराची सहल केव्हा झाली हे कळलें देखील नसेल त्याना ?

हसहसीचा विलास पाहणें ही जशी अनैसर्गिक गोष्ट वाटत नाहीं तशीच इंग्लिश तरुणतरुणींच्या चव्हाटयावर पसरलेल्या विलासांची आतां तीन महिन्यांच्या अनुभवानें चागली संवय झाली आहे. आम्ही बाकीचे मुलांबाळाचे लोक त्यांच्या प्रश्नाच्या भडिमारानें अगदी भंडावून गेलों होतों. मग काहो बाबा, हें चाक असें फिरविले तर जहाज कोठें जाईल ? तुम्हाला बोटींतून जायला आवडतें कीं नाहीं ? कशी मजा आहे नाहीं का ? वगैरे वगैरे मुलांच्या त्या सात्त्विक व निष्पाप चेहऱ्याकडे पाहून व त्यांचा गोडसा किलबिलाट ऐकून किती किती समाधान वाटतें ! मुलांबरोबर आईबापाना पुनः मूलच बनावें लागतें. त्यांच्याशी समरस होण्याची, बोबडे बोल बोलण्याची, चूल-बोळकीं खेळण्याची आईबापांची ही दुसरी शैशवावस्थाच नाहीं का ? ह्या दुसऱ्या अवस्थेत मात्र मुलांशीं खेळणें,

त्यांच्या प्रश्नांचीं न त्रासतां उत्तरें देणें हें मोठेंच काम असतें. आणि हें नीटपणें पार पडणें आईबापांच्या सांसारिक परिस्थितीवर अवलंबून असतें. संसाराच्या तीव्र आंचेनें एकादा जीव पोळला असल्यास, त्या आचेचा डाग जर आईबापांच्या हृत्पटलावर असला तर हे रम्य काम कठिण होऊन बसतें. मुलांना चापटचा व घसफस करून बोळवणी करावी लागते. असो. अशा ह्या रम्य मुलांच्या व त्या नववधूवरांच्या सहवासांत आम्ही खूप दूर जाऊन आलों.

सरोवराकांठी एका बाजूस गोऱ्यापान युवयुवती जलक्रीडा करीत होती, बाजूसच मोटारी व कॅरॅव्हानचा तांडा पडला होता. सर्व जण निसर्गाचा पूर्ण उपभोग घेत होते.

वरती झाडांमधून पायवाट होती, तेथे उंचवटयावर Ruskin चा पुतळा होता. त्यावर खालील कविता होती.

> The first thing which I remember as an
> event in life, was being taken by my nurse
> to the Brow of Friars Crajon, Durwent water.

बापाला बाप न मानणाऱ्या तरुण पिढीला Ruskin ची, यःकश्चित् नर्सबद्दल वाटणारी कृतज्ञताबुद्धि रुचेल का ?

## ३ सप्टेंबर

आज सकाळी १० वाजतां आम्ही Keswick सोडलें. पाऊस अधून मधून पडे. पुष्कळ वेळ सरोवर व डोंगर दिसतच होते. पुनः पुन्हां त्यांच्याकडे पाहात होतो. एकेक गोष्ट आयुष्यांत एकदांच होते. येथें आपण येऊं असें कधी तरी वाटलें होतें काय ? पुनः तरी कोण कशाला जातो ? गेला क्षण हा आपला. कालांतरानें आपण नसू, हे वृक्ष, हें सरोवर, हा गिरि सर्व येथेंच असतील. असेच हजारों लोक येतील. ह्यांना पाहून संतोष पावतील. असा नेहमीप्रमाणें वैराग्य वाटायला लावणारा विचार ह्यांच्या मनांत आला. मीं म्हटलें, थोडचा काळांतच आपण जाऊं; पण सरोवर, पर्वत हे देखील नाशवंतच नाहीत का ? ज्यानें पाळणा पाहिला आहे, त्याला तिरडी आहेच. कालाच्या फेऱ्यांत सर्व नाहींत का ? असो. आम्ही तिथे

व आमची मोटार एवढेंच येथें आपलें असे. आणि आम्ही तिघे जेथें असू तेथें नंदनवनच नाही का? शाळा चागली नसणाऱ्या अशा गांवी एकाद्या खेपेस बदली झाली तरच चबी, बोर्डिंगमध्यें आम्हाला सोडून जायची. बाकी सर्व जागी जायचे तेथे आम्ही सर्वच बरोबर जात असूं. एकमेकाना सोडून राहण्याची फारशी कोणालाच संवय नाही.

## ४ सप्टेंबर १९३६ : स्कॉटलंडमध्यें प्रवेश

अशा सुखदु:खमिश्रित विचारात आम्ही Keswick सोडले. वाटेत डफरी, कार्लाईल, कॅसल, डगलस् ही गावे लागलीं. आतां आम्ही स्कॉटलंडला आलों. रस्ता सुदर व निबिड अरण्यांतून होता. पाऊस झिमझिम पडत होता. कोठल्या कोठे आपण आलो. आपली सर्व माणसे किती दूर! बाकी सर्व गोरे आपण तेवढे परके; काळे, म्हणजे चटकन् सर्वांतून निवडून पडणारे, असें वाटले. ह्याचा अनुभव छान आला. एकदां आम्ही घटकाभर मोटार थाबविली. त्या वेळेस शाळेतून लहान लहान मुलें घरी चालली होती. त्या बालचमूचा गराडा मोटारभोवती पडला, व प्रत्येक जण कुतूहलानें आमच्याकडे Darkie म्हणून बघू लागला. I want to see that monkey म्हणून एकमेकात हमरीतुमरी सुरू झाली. आम्हाला कसेसेंच वाटले. पण पाठीमागून लगेच त्याच्या मास्तरणी आल्या व त्या चमूला पुढे हाकललें. व अशा वर्तणुकीबद्दल त्यांना त्या रागें भरल्या.

नंतर ३॥ ला आम्ही Kirkcudbright ह्या गावी आलो. Selkirk Arms Hotel मध्ये उतरलो. दुपारी २ वाजता Mrs. Elboune व तिची ९ वर्षाची मुलगी Barbara येथील English Electric Company तील Erector यांची बायको व मुलगी आमच्या हॉटेलमध्यें आम्हास भेटायला आल्या व आम्हाला आपल्याकडे चहाला घेऊन गेल्या. वरील गृहस्थांचा संबध हे त्यांचे पॉवर हाऊस बघायला गेले म्हणून आला. शिवाय मुबईला व भीरा येथें ते कामानिमित्त होते म्हणून हिंदुस्थानी लोकांचा ओढा होता त्यांना. किती चांगली होती ही मंडळी स्वभावानें. अशा लहान गांवी आम्हाला करमायचें नाहीं म्हणून सारखी काळजी घेत असत. असो. इंग्लिश लोक आम्हाला तरी चांगले वाटले. हॉटेलचे लोक

देखील पैशाकरितां कां होईना पण आमच्या सुखसोयी, आवडीनावडी वगैरे गोष्टीकडे काळजीपूर्वक बघतात. आम्हाला तरी वाईट अनुभव इतके दिवस कोठेच आला नाही. उलट थोडचा वेळात आमचें व पुष्कळाचें किती जमत असे. आपण चांगले वागल्यास दुसरा तरी वाईट कशाला वागणार आहे ?

## ५ सप्टेंबर १९३६ : स्कॉटलंडच्या किनाऱ्यावरून आयर्लंड

आज सकाळी १० वाजतां Kirkcudbright सोडलें. स्कॉटलंडची वनश्री फारच रमणीय आहे. गर्द झाडी, सुदर हिरवीचार डोंगरसपाटी, एका बाजूला अफाट सागर. आमचा रस्ता ह्या दोन्हीच्या मधून होता. पाऊस झिमझिम पडत होता. धुक्यामुळे आकाश व सागराची कड एक-मेकांना भिडली आहेशी वाटे. रस्त्याने मोटारीची गर्दी नव्हती. रस्ता नागमोडी, अरुंद, एका बाजूला डोंगराचे अक्राळविक्राळ कडे, तर एका बाजूला समुद्र. थोडचा अतरापुढील रस्ता धुक्यामुळें दिसावयाचाच नाही. जर का वरून एकादी मोटार आली आणि आदळली तर जलसमाधि मिळावयाची. अशी सारखी मला भीति वाटत होती. पण लवकरच दिसू लागलें व मग पुनः निसर्गाच्या शोभेचा अलोट लाभ आम्हाला मिळाला.

सागर जणू अत्यंत प्रेमानें धरणीमातेला सारखा अभिषेक करून भिजवीत होता. वरून पर्जन्यवृष्टि होत होती. एकीकडे डोंगरांचे कडे, धरणीमातेचे, छातीवर हात देऊन इतरापासून रक्षण करीत होते.

समुद्र, पर्जन्य व गिरि, आपापल्यापरीने, ऐटीने आपल्या स्वतत्र जन्मभूमीचे कौतुकच करीत होते. इग्लंड देशावर कोठेंही तुम्ही नजर टाका, प्रत्येक कोनाकोपऱ्यांतून आम्ही स्वतंत्र आहोत असाच ध्वनि निघत नाही का ? सागराच्या अपरिमित लाटा गगनभेदी आवाज करून सागतात, कीं आमच्या ह्या सागराला कोणाकोणाची देखील भीति नाही.

बाजूला जवळच आयर्लंडचा किनारा दिसला, तोही ऐटीनें स्वतंत्रते-चीच ग्वाही फिरवीत होता, आणि सर्व हिंदुस्थानी लोकांना शिकवीत होता कीं आयर्लंडप्रमाणें हिंदुस्थानला स्वतंत्र व्हायचें आहे. असो. अशा

विचारांत आम्ही मार्ग आक्रमीत होतों. वाटेंत Ballantrae, Girvan, Ayr अशीं गांवें लागली. Ballantrae येथे Lunch घेतला. फारच छान मिळाला. Waitress व मालकीण फारच चागल्या वाटल्या. अर्ध्या तासाच्या सहवासात तिनें आम्हांला चटका लावला अगदी! ती कोण, आम्ही कोठचे? पण म्हणतात ना, की सात पावले चालून गेलें कीं प्रेम जमतें. तसेच जागोजागी आमचे होई. ह्यापुढें Ayr लागले. येथें Robert Burns हा कवि जन्मला. त्याचा पुतळा पाहिला. तेथून ग्लासगोच्या रस्त्यास लागलो. रस्ते रुद, मोठे होते. सपाटी लागली आता. तितकी शोभा कमी झाली; एकदर आज १५० मैलाचा प्रवास केला. हे पण मोटार चालवून कटाळले होते अगदी. शिवाय हॉटेले शोधणे, गॅरेज शोधणे, याचा पण त्यानाच त्रास पडे.

## ८ सप्टेंबर १९३६ : ग्लासगो व स्कॉटलंडमधील लेक डिस्ट्रिक्ट

ग्लासगोला आम्ही Lynedock Hotel मध्ये उतरलो. किती चमचम करीत होते चोहीकडे. आघोळीच्या मोऱ्या, सडास किती स्वच्छ. ते उपयोगांत आणून त्याची शोभा जाईल असे वाटे. नुसते पाहात राहावे. कोणीकडे त्याचे संडास व मोऱ्या. आमच्या इकडच्या श्रीमताच्या सुद्धां घरांत इतकी स्वच्छता व थाट कोठेंच मिळायचा नाही. काय ते घाणीचे अवतार!!! मुबईसारख्या शहरीं मोठमोठ्या हिदुस्थानी लोकांनी चालविलेल्या हॉटेलांत देखील तीच स्थिति. त्या घाणीपायी तेथे पाय ठेवू नयेसे वाटतें. पृथ्वीवरचा तो एक खरोखरीचाच नरकवास आहे असे म्हटल्यास अतिशयोक्ति होणार नाही.

हॉटेलच्या चालकांनीं स्वच्छता ठेवणे हें योग्य. खरेच; तरी पण, तेथें येणाऱ्या जाणाऱ्या प्रत्येक व्यक्तीचें तें स्वच्छ राखणें हे कर्तव्य नव्हे काय? सार्वजनिक स्वच्छतेची आम्हाला शिकवण आहे कोठें? पाश्चात्यांची स्वच्छता निदान दिखाऊ तरी आहेच आहे ह्यांत मुळींच शंका नाहीं. आठ आठ दिवस आंघोळ नसतील करीत ते, पण आंघोळ करून मळकट घाणेरडे कपडे घालून हिडण्यापेक्षां ते निदान वरवरचे तरी बरे.

हॉटेलमध्यें सामानाची व्यवस्था लावन व कपडे वगैरे बदलन ट्रॅमनें

गांवांत गेलों. L. M. S. Tea Rooms मध्ये जाऊन खाल्लें. आणि पायीच फिरत फिरत Woolworth मध्यें गेलों. हे दुकान आपलें जेथें तेथे आहेच. येथे सर्व ससारोपयोगी जिन्नस ३ पेन्स व ६ पेन्स ह्या किमतीचे असतात. स्वस्त व उत्तम अशा वस्तू येथे असतात. किती तरी गर्दी येथे असायची. काही नाही घेतलें तरी माल पाहात राहावा. वेळ घालविण्याला बरे तें एक साधन असते. येथे खाण्याची व चहाची पण छान व्यवस्था असते. विकणाऱ्या सर्व बायका व मुलीच. आणि सर्व देखावा अगदी सिनेमा-नाटकाप्रमाणे वाटे. मुलींचे झगे पाढरे, डोक्याला छानशी झालरीची पाढरी टोपी, ओठाना रग लावलेला, हरिणीप्रमाणे चटपट चालण्याची लकब, गालाना गुलाबी रगाची छटा व ती हंसरी तोडे कशी सुरेख दिसत अगदी. विकत घेणाऱ्याचे भान हरून टाकीत. त्याना असा प्रश्न विचारावासा वाटे, की 'का ग सुदरीनो, अशा खडतर कामास परमेश्वराने तुम्हाला लावले'? काय करतील बिचाऱ्या. त्याच्या देशांत पुरुषाचे प्रमाण कमी. ह्याच्याशी लग्ने करणार कोण? तेव्हा स्वत.चे स्वत च कमवायला हवे ना?

येथे सगळीकडे बायकांचेच राज्य जवळजवळ एक दिवस आम्ही फोटो काढायला गेलों. प्रथम बाईच पुढें आली. मला वाटले आतां येईल फोटोग्राफर; पण कसचें. फोटोग्राफर पण स्त्रीच. धंद्याचें पुष्कळसे क्षेत्र स्त्रियांनी पटकावले आहे.

शनिवार असल्यामुळें, सर्व सिनेमागृहांपुढें अतोनात गर्दी होती. येथें Queue ची पद्धत असते. म्हणजे जोडीजोडीनें एकामागे एक प्रवेश मिळण्यासाठीं उभें राहायचें, कोठेही घाई करून धक्काबुक्की करीत पुढे जायचें नाहीं. ह्या पद्धतीने किती व्यवस्थित काम होतें. आगगाडीचीं तिकिटें काढण्याच्या जागीं, फार काय, कोठेंही गर्दीच्या जागीं ह्यांची अशीच व्यवस्था असते. त्यामुळे गोंधळ कोठेच होत नाही. आपल्याकडे गर्दीच्या जागीं जीव कोंडतो, घाबरा होतो व त्यामुळे गर्दींत जाऊं नयेसें वाटतें. तेव्हां अशा तऱ्हेची Queue ची पद्धत शाळेतून, व घरी आईबापांनीं व प्रत्येक मोठ्या माणसांनीं, शिकविल्यास व शिकल्यास आपल्यांत पण व्यवस्थितपणा तेव्हांच येईल. अशा तऱ्हेची शिस्त अंगीं बाणल्याशिवाय पुढील मोठीं कामें

करणार कशीं ? हा Queue सिनेमागृहापुढे दोन्ही बाजूस एकेक फर्लांग दिसे. Queue मध्ये लोक वर्तमानपत्र वाचीत असतात. कारण कित्येक वेळां तासन् तास माणसाला उभें राहावें लागते. येथील लोकांचा वर्तमानपत्र वाचण्याचा फार सुळसुळाट असतो. जेवतांना, खातांना देखील एकेक पान उलटायचें व तोंडात घांस घालायचा. प्रत्येकाचे सर्व काम अगदी गुपचुप.

## स्कॉट कवीनें वर्णिलेलें Loch Lomond

आज सकाळी १०॥ वाजता आम्ही सर्व Loch Lomond बघण्यास निघालों. सकाळपासून सूर्यदर्शन नव्हतेंच. Great Western Street वरून गेल्यानंतर, रस्त्याच्या डाव्या बाजस दोनतीन मैलानतर क्लाईड (Clyde) नदी लागते. तिच्या पलीकडे एका बाजूस हिरवीचार डोंगराचीं पठारें, आणि दुसऱ्या बाजूस काळाभोर असा डाबरी रस्ता, रस्त्याच्या दुसऱ्या बाजूस पुन उंच उंच डोंगर, नदीवर लहानमोठी जहाजे, नदीच्या बाजूने सायकलीवरून सशक्त तरुण मुले आणि मुली जात होती, तर बस्मधून लहानगी मुले व आईबाप असे जात होते अशी सर्व मजा पाहून मन आनदी झाले; नित्याचा कटाळवाणा क्रम सोडन नव्या नव्या गोष्टी पाहिल्या म्हणजे मन किती टवटवीत होते ? ग्लासगोपासून Loch Lomond ४० मैल आहे, पण इतक्या दूर व चढणावरून सुदर मुलेमुली जाताना पाहून कौतुक वाटले. सगळ्यांची शरीरे सुरेख. अशक्त, अकाली म्हातारे दिसणारे क्वचितच मिळायचे. उत्तम शरीरामुळे प्रत्येक जण किती तरुण वाटायचा. शरीर उत्तम ठेवण्याची कला हेच लोक जाणोत. त्याच्याकडे कृत्रिम सौदर्यसाधन आहे. पण नैसर्गिकपण तितकेंच आहे. आमच्याकडील तरुण पिढी कशी खंगलेली दिसते. त्यांचें फक्त कृत्रिम नटणेंच पाहून घ्यावें. आमच्याकडील जाणारी कॉलेजमधील मुलेमुली डोळ्यांना चष्मे, नाक वर आलेलें, दांत विगलित होणारे, बुटकीं, शरीराची मेहनत एकाला नको. नटणें तेवढें कोणाचे शिकले देव जाणे ! आमच्याकडील एकाचें तरी शरीर बांधेसूद आहे का ? आईबापांचें तर त्याकडे लक्ष नाहींच नाहीं, पण स्वतः विद्यार्थ्यांचें देखील

मुळीच नाही. देशाची गरिबी म्हटली तर क्रीम, पावडरी, नखे रंगविण्याचे रंग, अगदी चाळीतील टीचभर खोलीत देखील घुसले आहेत. आणि हे सर्व मी तर म्हणते प्रेतावरील शृंगाराप्रमाणेच दिसत नाही का? कृत्रिम सौंदर्याबरोबरच नैसर्गिक उपाय नकोत का करायला? नुसती फोल डिग्री घेतलेल्या व शुष्क शरीराच्या तरुणतरुणींची दया येते अगदी! हे पोषाखी तरुण कोणत्या कामाला उपयोगी पडणार! असो. अशा विचारात सरोवरे पाहिली. त्यांच्याभोंवती झाडीचें दाट वेष्टण होते. मधूनच पाऊस पडे, त्यामुळे तरुण मुलामुलींचा विरस होई. त्यांचा सरोवराकांठचा विलास पुरा व्हावा म्हणून मधूनच पाऊस अगदी थांबे. कित्येक जागी ही तरुण मंडळी स्टोव्ह पेटवून आपला लहानगा संसार मांडीत, मजेने दोघे जण एकमेकांना मदत करून पदार्थ तयार करीत. सरोवराकांठचा त्यांचा हा क्षणिक संसार डोळ्यांना किती रम्य दिसे आणि संसाराचा हा त्यांचा रम्य उषःकाल असाच सदैव राहील का? प्रेमाचा उगम व्हायला, सरोवर व दोघांची यौवनावस्था व सुंदर शरीरें, अगदी अनुरूप नाहीत का? हो, पण ह्या तरुणांना जास्त वेळ अशाच स्थितीत न सोडता, मेघाचें पटल विरल होई, व दिनमणि डोकावून बघे. असो. ह्या तरुणांना सोडून आपण दुसरीकडे जाऊं.

चबी अगदी आनंदात होती. म्हटले येथे आहे तों मोकळेपणाने खेळ व मजा कर. आणि ह्या मुलांमुलींसारखीच उंच, धिप्पाड व सशक्त हो. येथील टेकड्यांवर व झाडांमधून फुलपाखरासारखी बागड. लहानपण रम्य, त्यांत आईबाप असल्यावर बाळपणच्या सुखाला सीमाच नसते. पुढचें कोणी पाहिले? नुसती डिग्री मुलांनी मिळवावी ह्या मताची मी नाहीच. प्रवास हें देखील दांडगे शिक्षण आहे. शिवाय प्रकृति छान होईल, म्हणूनच तिला आम्ही अभ्यास बुडवून देखील नेले. बायका-मुलींना येथें स्वतंत्रता खूप. मोकळ्या हवेत खेळणें, पळणें ह्या गोष्टी मिळत. आमची सर्वच पद्धत निराळी; जरा मोठ्या मुली झाल्या, की मोठ्यानें हंसूं नको, एकटी जाऊं नको. चारचौघात धांवू, पळूं नकोस. अशामुळे बाहेरचे व्यायामही नाहींत, आणि नवीन व यांत्रिक पद्धतीमुळे घरकाम नाही. मग मुली शरीरानें सुंदर राहणार कशा? उगाच एकाद्यानें पाश्चात्यांच्या व

आमच्या मुलीची तुलना केली तर ते चुकीचें नाहीं का ठरणार? प्रत्येकाच्या रीति निराळया. तेव्हा जितके जमेल तेवढी सुधारणा मात्र करायला हवी एवढें खरे.

मोटार सुदर रस्त्यावरून कशी वेगाने चालली होती. पुनः Clyde नदी दिसली. आमच्या गंगा-गोदावरी दिसल्या, की दोन्ही हात सहजा-सहजी जोडले जातात. मनात भक्तिभाव उभा राहतो. पण इंग्रजाची नदी दिसली, की त्यांची ती जहाजे, त्यातून सर्व जगाशी अफाट व्यापार कर-ण्याची महत्त्वाकाक्षा, नदीच्या काठची लाकडें तोडून, प्रचड जहाजें बांधून, सर्व जगाच्या पेठातून पैसा लुटून, आपल्या देशात सुवर्णाचा ढीग करण्याची पद्धत पाहून कौतुक वाटतें. इग्रज व्यवहारी, आपले दर गोष्टीत हित कसें साधायचें हे त्याना माहीत त्याना देवभोळया गोष्टीत वेळ घाला-यला फुरसत आहे कोठे? नदीची प्रार्थना करून किवा 'अस्त्युत्तरस्या हिमा-लयो नाम नगाधिराजः' असे म्हणून जग नश्वर आहे असे मानण्यात त्यानी काळाचा अपव्यय केलेला नाही, तर नद्याकडून, निसर्गाकडून, आपल्या मुलांबाळांची छान तरतूद करून ठेविली आहे अगदी.

असो. अशा विचारात आम्ही घरी येऊन पोहोंचलों. नंतर कपडे वगैरे बदलून गावात पायीच गेलो. भटकत भटकत युनिव्हर्सिटीजवळ आलो. खूप मोठ्या दगडी इमारती आहेत ह्या. येथे आपले किती तरी लोक शिकून गेले असतील. एकादा ग्लासगोची डिग्री घेतलेला मनुष्य पाहिला तर कोण अहंमन्यता असते त्याला. इग्लडला ४–५ वर्षे राहून आपला मनुष्य आला, की डोकीं फिरून जातात त्याची.

नतर आम्ही Kelvin Hall पाहिला. येथे प्रदर्शन, मोठ्या सभा वगैरे होतात. Art gallery वगैरे दुरूनच पाहून ट्रॅमनें शहरांतून कॅथीड्रल-च्या बाजूला गेलों. येथे बाजूला मोठे हॉस्पिटल आहे. हें सर्व दुरूनच पाहून ट्रॅमने कॉर्पोरेशनच्या इमारतीवरून घरीं परत आलो. एकंदर ग्लासगो हें शहर पुष्कळ गोष्टीकरितां बघण्यासारखे आहे. एक तर हें व्यापारासाठी व कारखान्याकरितां प्रसिद्ध आहे.

## ९ सप्टेंबर

आज आर्ट गॅलरी बघण्यास गेलो. ग्लासगो जहाजे बाधण्याकरितां प्रसिद्ध आहे. तेव्हा आरभापासून कसकशी ती केली, नतर कशा सुधारणा त्यात होत गेल्या, हिदुस्थान, कॅनडा वगैरे देशांना ती कशी पुरविली वगैरे सर्व माहिती व नमुने तेथे आहेत. तसेच आगगाडीची इजिने वरील सर्व देशाना येथून कशी करून पाठविली जातात हेही पाहिले. इंग्रजानी सर्व तयार करावे व इतरानी ते आयते घ्यावें. छान न्याय आहे! कशा बाजारपेठा त्यानी आपल्याशा करून टाकल्या? त्याच्या पदार्थविज्ञानसंग्रहालयात अगदी ल्हान मुलाना शास्त्रीय ज्ञान, खेळता खेळता समजेल अशी सोय असते. आईबापांना, शाळा कॉलेजच्या अधिकाऱ्याना, मुलगा शास्त्रीय ज्ञानात भर घालून देशाचा व्यापार कसा वाढवील अशी जबर महत्त्वाकांक्षा असते. आणि आम्हाला मात्र मुलाने बी.ए., एम्.ए. होऊन कारकून व्हावेंसें वाटते. एकादा हुषार निघाल्यास आय. सी. एस्. व्हावासा वाटतो. खरें पाहिले तर नोकऱ्या करून कोणते तरी राष्ट्र मोठे झाले आहे का? तेव्हा इकडे येणाऱ्या माणसानी ह्यांचा पदार्थविज्ञानसंग्रह अवश्य पाहावा. असो. येथे आल्यावर एक गोष्ट प्रामुख्याने दिसली, ती ही, की लंडन, बर्मिंगहॅम्, मॅंचेस्टर, साऊथपोर्ट, व ग्लासगो ह्या गावी हिंदुस्थानी लोक डॉक्टरकीच्या धंद्यावर फावड्यानें पैसा ओढीत आहेत. व ही फारच अभिमानाची गोष्ट आहे. इंग्रज लोक काळे डॉक्टर पसंत करतात. शस्त्रक्रियेत तर आपल्या लोकांचा हातखंडा आहे अगदी, असें पुष्कळ ठिकाणी लोकाच्या तोंडून ऐकिले. दुःखाची गोष्ट एवढीच, की बहुतेक डॉक्टरांनी आंग्ल पत्नीच केल्या आहेत. घरेंदारे करून ते जवळजवळ इंग्लिशच बनले आहेत. एवढ्या नामांकित डॉक्टराची पत्नी होण्याचे भाग्य आपल्या बायकांना लाभतें, तर पुष्कळ कुमारिकांचे नशीब उघडले असतें; पण चार पांच वर्षे इंग्लडमध्ये राहून आपल्या मुली ह्यांना नीरस वाटू लागतात. येथे कुमारिकांना काय तोटा आहे? व सावज जाळ्यांत अडकविण्याची कला त्याना चांगलीच माहीत आहे. नशीब बिचाऱ्या हिंदकन्येचें! हल्लीच्या चढाओढीच्या काळांत तिचें मात्र कठिण होत चाललें आहे खरें.

## १० सप्टेंबर १९३६

दुपारी एक वाजता हे कामावरून परत आले. नंतर ट्रॅमनें आम्ही गावात गेलो. घाईघाईने चुकून मोठ्या हॉटेलमध्यें Lunch ला गेलो. खाल्लें थोंडेसेंच, पण बिल एकदम ८ शिलिंग पडलें. मोठमोठ्या हॉटेलचा थाट बघून घ्यावा तेवढा. पोट रिकामे असतांना देखील जबरदस्त बिल पाहून पोटदुखी लागायची एकादे वेळेस. खाणें झाल्यानतर कॉर्पोरेशन् बिल्डिंग-जवळ गेलों. तेथे सर्व गावातून हिंडून आणण्याची बस् मिळे. दर प्रत्येकी एक शिलिंग. मुलाना अर्धा पडे. दोन तासात पुष्कळच दाखवून आणलें. सर्व बस् गच्च भरली होती. माहिती Loud Speaker मधून सांगत. त्यामुळे सर्वांना नीट ऐकू येई. किती छान व्यवस्था चोंहीकडे; गोंधळ, गोंगाट कोठेच नाही. पुष्कळ गोष्टी जागोजागी लिहिलेल्या असायच्या. अर्थात् लोक शिकलेले म्हणूनच हे जुळतें. हिंदुस्थान आधी साक्षर झाला पाहिजे. त्याशिवाय धडगत नाही. येथे कोणी तरी अडाणी बावळे दिसतें का ? शिक्षणाचा प्रभाव केवढा आहे? विद्या नसलेली माणसें पशुकोटी-तच नाहीत काय ?

## ११ सप्टेंबर : स्कॉटलंडची राजधानी एडिंबरो

आज सकाळी १०॥ च्या सुमारास आम्ही ग्लासगो सोडलें, व एडिंबरोच्या रस्त्यास लागलो. रस्ता खूप रुंद होता. बाजूचा देखावा सुंदर होता. हल्ली सूर्यदर्शन बहुतेक नसेच. येथून एडिंबरो ५० मैल होतें. हें गांव प्रसिद्ध, शिवाय आपले पुष्कळ लोक येथे वैद्यकी शिकून गेलेले, म्हणून पाहण्याची फार उत्सुकता होती. Grosvenor Street वर Zetland Hotel पाशी १२॥ च्या सुमारास आम्ही सर्व आलों. ग्लासगो येथील Lynedock हॉटेल फारच स्वच्छ होतें. त्या मानानें हें घाणेरडे व जुनाट वाटलें. एक वाजतां जेवून आम्ही घराबाहेर पडलों. प्रिन्सेस स्ट्रीट हा येथील उत्तम रस्ता. सुंदर स्त्रियांची व माणसांची रस्त्यावर सारखी रहदारी होती. ५४, प्रिन्सेस स्ट्रीटवर थॉमस कुककडे, घरून कांही पत्रें आलीं का म्हणून पाहिलें. पण आमचें एक सुद्धां नव्हतें. परदेशांत घरच्या पत्रांची मनुष्य चातकाप्रमाणें वाट पाहतो. केव्हां एकदां सोमवार येतो

व मेल येते असें होई. संध्याकाळी ५ वाजता हे कारखान्यातून आल्यावर आम्ही Castle बघायला गेलों. येथे राजाचे मुकुट वगैरे आहेत. State Prison आहे. तेथेच जवळ War Memorial आहे. हेच जगांतील, युद्धाचें फार मोठें स्मारक आहे. ह्या इमारतीमध्यें ज्या वीरानी आपला देह समरांगणांत देशाकरितां वाहिला, त्याच्याबद्दल प्रशंसोद्‌गार आहेत. ह्या वीरांमध्ये आपले म्हैसूर, लखनौ, बगलोर, येथील लोक होते.

इंग्लंडमध्ये जागजागी लढाईची स्मारके आहेत. लढाईची स्मृति लोकाच्या मनात अगदी ताजी आहे. बायकाना तर लढाई नको वाटते अगदी. कारण त्यानी आपला नवरा किवा मुलगा देशाला देऊन अप्रत्यक्ष रीतीने स्वत.च प्राण दिलेला आहे. आणि म्हणूनच स्वजनाचा वियोग त्याच्या मनात अगदी ताजा आहे. असो. हे हृदयस्पर्शी दृश्य पाहून आम्ही खाली उतरलों. नंतर युनिव्हर्सिटी, ऑबझर्व्हेटरी वगैरे पाहिली. नतर L. M. S. Hotel मध्ये खाण्यास गेलो. तेथेच सिगापूर, मलायामध्यें राहणारा साहेब आमच्याजवळ येऊन बोलू लागला. तुम्ही तामीळ आहांत का? ब्राह्मण आहात का? हो, म्हटले आम्ही ब्राह्मण आहोत. इंग्लडमध्यें ब्राह्मण व हिंदु हे नुसते शब्द माहीत आहेत. व साधारण हे लोक दुसऱ्या जातीला छळणारे, वाईट असा समज आहे. आम्हाला कबूल आहे, की आम्ही दुसऱ्याना वाईट वागवतो. पण तसे नियम असायला कारणें व काळ निराळा होता. आज आम्ही बदलत आहोत. पण एकदम कसे बदलणार? हो ह्याचाच हा किल्ला. काय सागतो! मेरी क्वीन ऑफ् स्कॉटला इलिझाबेथ राणीने किती छळले? १८ वर्षे तर तिला कैदेंत ठेविले. प्रॉटेस्टंट् व कॅथॉलिक् ह्यांत किती भाडणे होती? धर्मछळाला किती लोक कंटाळले? प्रत्येक देशाच्या इतिहासांत काही ना कांही वैगुण्य हें आहेच. चक्रनेमिक्रमेण. प्रत्येकाला चांगले वाईट हे दिवस आहेतच. आज आमच्या देशाचे पडित दिवस आहेत. तेव्हां प्रत्येक जण ठेवतो नांवें एवढेंच.

## १२ सप्टेंबर १९३६

आज १०॥ ला आम्ही एडिबरो सोडले. हें गांव फारच सुंदर म्हणून ख्याति आहे ह्याची. डोंगर, हिरवीं मैदानें, व पुन्हां जवळ समुद्र

व शहराची उत्तम बाधणी, ह्यामुळे नैसर्गिक सौदर्यात कृत्रिम शोभेची भर पडून सुदर मिलाफ झाला आहे येथून आम्ही न्यूकॅसल-अपॉन-टाईनला गेलों. १०० मैलाचा प्रवास करायचा होता. रस्त्याचा कांही भाग अरुद व उचसखल होता त्यावरून मोटार ऐटीनें उडी घेई व वर येई. त्यामुळे फारच मजा वाटे. हवा थड, धुळीचा मुळीच त्रास नाही. म्हणून डोळ्याना कसे शात वाटे. नवनव्या गोष्टी पाहून मनाला हुरूप येई. रस्त्याच्या बाजूस गायी हिरव्या कुरणावर चरत होत्या. किती धष्टपुष्ट होत्या त्या! एकेकीचे स्तन दुग्धभाराने पुष्ट होते. स्वतत्र देशातील गायी आपल्या बाळांना सकस दूध देऊन किती गोडस करतात दूध हे राष्ट्राचें मुख्य अन्न आहे. म्हणून ह्या गोमाताची किती काळजी घेतात येथील घोडे तरी केवढाले! जनावरांना पाणी पिण्याची टाकी जागोजागी आहेत. स्वतत्र देशातील सर्वच निराळें. त्याची बरोबरी आम्ही करणें म्हणजे कुठें शामभटाची तट्टाणी आणि कोठें इद्राचा ऐरावत असेच नाही का?

मधूनच धुके इतके पडलें, की पुढचे काहीच दिसेना अगदी. रस्ता नागमोडी, एका बाजूनें दरी व डोगर. पाऊस पडल्यामुळें रस्ता ओला. समोरच्या विरुद्ध बाजूने मोटारी यायच्या मधून मधून. पुढें तर काहीच दिसेना. काही झालें तर पंचाईत. अगदी पांचावर धारण बसली. पण देवाच्या दयेने धुकें लवकरच विरळ होऊ लागले व माझा जीव खाली पडला. रस्त्याच्या बाजूस पांढऱ्या शुभ्र मेढया चरत होत्या. थड हवेतील प्राणी कसे तोडावरून धीर गभीर दिसतात आणि म्हणूनचं डोक्यांतून तऱ्हेतऱ्हेच्या कल्पना निघतात.

Otter Burn येथे Hotel मध्ये एक वाजतां आम्ही आलों. येथें खाल्लें. शेतामध्ये ओसाड जागेत हें होतें, पण शहरासारखी सर्व सोय होती. फ्लशचे संडास, सुशोभित खोल्या, टेलिफोन वगैरे सर्व व्यवस्था होती. जेवायला माणसे तरी किती जमली. एक खुर्ची कांही रिकामी नव्हती. दरवाजाजवळ मोटारीची नुसती गर्दी होती. बायकांची संख्या नेहमीच जास्त दिसे चोहीकडे. स्वतंत्र मोटारी घेऊन बायका वाटेल तिकडे जात. येथें बायका काय करीत नाहीत? वाटेल तें करायला त्यांना मोकळीक आहे. जागोजागी हॉटेल्स, रेस्टॉरंट असल्यानें घर

करण्याचा त्रासच कोणी करीत नाही. एक दोन मैलांवर Automobile Association च्या टेलिफोनवर हे टेलिफोन करण्यास थाबले. जवळच्या शेतातून एक बाई आली व न्यूकॅसलला जाणाऱ्या बसची चौकशी करू लागली. तेथून बस् रात्रीशिवाय मिळणार नव्हती असे कळल्यावर मी म्हटलें चला आमच्याच गाडीतून. येथून न्यूकॅसल २० मैल होतें. बाई शेतकरीणच पण तेथील चालू राजकीय परिस्थितीवर गप्पा मारीत होती. तिची आम्हाला छान करमणूक झाली व तिचे पण अनायासे काम झाले. तिकडील शेतकरीण राजकीय परिस्थिति जाणते आणि आमच्याकडे सगळाच अधार चागल्या चागल्याना देखील अगदी जिव्हाळ्याचे प्रश्न माहीत नसतात. गरीबाची भेसूर परिस्थिति व श्रीमताचे आळशी जीवन, म्हणून काय चोहीकडूनच नैराश्य. असो. न्यूकॅसल्-अपॉन्-टाईनला आम्ही दुपारी ३॥ ला पोहोचलो. हॉटेल मध्यमच होते.

## १३ सप्टेंबर

आज संध्याकाळी ६ वाजता ट्रॅमने गावात गेलो. तेथून Tyne नदीचा पूल पाहण्यास गेलो. खूप उच व भव्य आहे पूल. Cantilever म्हणजे लोखडाच्या भक्कम कमानीवर पुलाचा मधला भाग टांगला आहे. एक low level पूल आहे त्यावरून आगगाड्या जातात. त्याच्याखाली ट्रॅम, मोटारी वगैरे जाण्याची सोय आहे दुसऱ्या बाजूला वर माणसांनी जाण्याची पायवाट आहे. एकंदरीत नवीन तऱ्हा वाटली. पुलावरून वाहनाची फारच गर्दी दिसली. पूल पाहून लिफ्टने आम्ही खाली गेलों. नदीमध्ये विनाशी (Destroyer) जहाज लोकाना पाहण्याकरितां ठेविलें होतें. तें पाहण्यास लोकांची—स्त्रियामुलांची वगैरे—फारच गर्दी होती. सरकार देशाचें रक्षण कोणत्या उपायाने करतें हेंच जनाला दाखविण्याचा हेतु त्यांत आहे. ह्या जहाजांत लहान मुलांना वाटेल तसें खेळू देत, प्रश्न विचारू देत. जहाजाचे अधिकारी मुलांना मुळींच रागवायचे नाहीत किंवा धसफस करावयाचे नाहीत. कारण ह्याच मुलांतून पुढें एकादा मोठा Admiral व्हायचा, एकादा Nelson निर्माण व्हायचा. तेव्हां ह्या बालमनांना जर ओरडून धमकावलें तर शास्त्रीय ज्ञानाचा

फोंफावणारा अंकुर एकादे वेळेस उत्तेजनाच्या अभावी करपून जायचा! खलाशी, जहाजाचे अधिकारी, बायका–मुलाना किती हौसेने सर्व गोष्टी समजावून सागत. स्वतंत्र देश हे! त्यांची गोष्ट आपणांस कशाला? आपण आपले लोकाचे दुरून पाहावे एवढेच.

## १४ सप्टेंबर

आज सध्याकाळी पायीच Jesmond Dene ही बाग पाहण्यास गेलों. ही बाग एकाद्या रानाप्रमाणें अगदी नैसर्गिक तऱ्हेवर केली होती. निसर्गाचा सहज सुदरपणा शहरवासीयाच्या डोळ्यांना व मनाला नेहमीच आनंददायी असतो. शहरांतले जीवन म्हणजे गडबडीचे, दिव्याच्या लखलखाटाचे व चाकोरीत घातल्याप्रमाणे असते. आणि मनुष्य सहजच कटाळतो त्याला. मग मन शातशा निसर्गाकडे धावतें. येथें घटकाभर बसून Lyric Theatre मध्ये Shirley Temple चा Littlest Rebel हा बोलपट पाहण्यास गेलों. चबीला शर्ली म्हणजे जीव की प्राण असे अगदी. हिचा एकही बोलपट काहीं पाहिल्याशिवाय ती राहायची नाही. थिएटर सुदर होते. मुलाची खूपच गर्दी होती. शर्लीची, मुलाची चहापार्टी असते, खूप गमत होत आहे इतक्यात लढाई सुरू झाल्याची तार येते. तिचा बाप Captain असल्यामुळे ताबडतोब त्याला लढाईवर जावें लागतें. सर्व पार्टी फिसकटते, दुधात मीठ घालावे त्याप्रमाणें सर्वच गोष्टीचा विरस होतो अगदी. बाप लढाईवर असतो व पुढे तिची आई मरते. असो. संसाराचें दृश्य म्हणजेच सिनेमा असतो. असे विरस संसारांत घटकोघटकी असतात. त्यांनाच टक्कर देऊन धैर्यानें मनुष्यास मार्ग काढावा लागतो. सिनेमांत हृदयद्रावक प्रसंग पाहून माणसाच्या डोळ्यास चटकन् पाणी येतें. नुसत्या सिनेमांत देखील माणसाच्याने दुःख बघवत नाही. मग खराच असा प्रसग ज्याच्यावर येतो, तो कसा काय काढीत असेल तें एक देवच जाणे!

सिनेमा ९॥ ला संपला. तो पाहण्याच्या भरात आम्हाला खाण्याची देखील शुद्ध राहिली नाही. येथें तर सात ते आठ हीच जेवणाची वेळ. नियमितपणा म्हणजे कांही विचारायला नको. एकला lunch म्हणजे अगदीं

एक. दोनला गेलात तर सर्व सामसूम अगदीं. असो. तरी पण स्टेशनवर जाऊन मिळाली एका Restaurant मध्यें दूध–रोटी; आणि तीच खाऊन मिटक्या मारीत बसावें लागले. ह्या बाबतीत आमच्या हिंदुस्थानात मजा- २४ तास सगळीकडे अन्नछत्र उघडलेलें असतें अगदी. कोठेही न कळवतां पाहुणे म्हणून जावे. बिचारी बाई मनातून शिव्या देत कां होईना, पण छानसें जेवायला करून वाढतेच की नाही ! पण येथे तसें नाही. Maid हंसत हंसत Sorry म्हणून आपली बोळवण करील. आणि खरोखरीच मग मनांतले मांडे मनांतच खाण्याची पाळी येते.

नियमितपणा हवा हे खरें, पण येथे त्याचा अगदी अतिरेक होतो. आमचा सर्वच पेशवाई, मोगलाई गबाळेपणा, तर ह्यांचा अगदीं कांटे-तोलपणा. येथे अदितवारी पत्रे एकदां देखील मिळायची नाहीत. नोकरांना सुट्टी म्हणजे अदितवारी थडा फराळ.

## १५ सप्टेंबर १९३६ : इंग्लंडच्या पूर्वकिनाऱ्यावर

आज शनिवार. हे कारखान्यांतून परत आल्यावर येथून १२ मैलांवर असलेल्या Whitley Bay ह्या समुद्रकांठच्या गांवी गेलों. पाऊस झिमझिम पडत होताच. तरी पण सुट्टी म्हणून समुद्रकांठीं जाणाऱ्या लोकाची गर्दी होती अगदी. येथील लोकाना पाऊस, थंडी, ऊन कांही असो आळस व सुस्ती मुळीच माहीत नाही. सदा तरतरीत व चलाख. आमच्या इकडे थंडीत थंडी, उन्हांत ऊन व पावसांत पावसाची सबब. ज्याला काम करायचें त्याला कधींच व केव्हांही सबब सांगताच येत नाही. पाऊस पडला अंगावर तर काय मनुष्य साखरेप्रमाणें विरून का जाणार आहे ? पाश्चात्य देशांत तोंड वेंगाडून रेंगाळत बसलेले कोणी मिळायचें नाहीं. आम्ही आमच्या हवेला दोष देतों उष्ण आहे म्हणून. त्यांच्या तिकडच्या थंडींत व पावसांत आम्ही बिछान्यावर लोळून काढू अगदी. 'फक्त वडिलार्जित तुटपुंजें कां होईना पण खायला ठेवलेलें हवे'! असो. येथे समुद्रास Tyne नदी मिळते. समुद्राला सारख्या लाटा येत होत्या. दूरवरून मोठाल्या लाटा धाड्दिशीं येऊन किनाऱ्याजवळ येतांना विरून जात. विरतांना कापसाप्रमाणें त्या पांढऱ्या स्वच्छ दिसत. गोऱ्यापान अप्सरांचा हीं पांढरीं शुभ्र पातळें

परिधान करून चाललेला नाच डोळ्यांना फारच रमणीय वाटे. मधूनच पाऊस थांबे. हा नाच बघायला रविराज मधूनच मेघांचें आवरण दूर करी. रविकिरणांची व पर्जन्याच्या तुषारांची एकाकी भेट झाल्याने, आकाशांतील रंगीबेरंगी इद्रधनुष्य डोळ्याना किती आल्हादकारक वाटे. ईश्वराच्या राज्यात सारेच खेळ क्षणिक! सारखा पाऊस पडल्याने, रविराजाचा हा लपंडाव व त्यामुळे आकाशाचे वाढलेले वैभव बघत राहवेंसें वाटलें. अंधकारामागून उजेड व त्याची सुखे मग भोगण्यातच मजा असते. सारा वेळ अधार कोठेंच टिकत नाही! आणि तोच नियम देखील राज्याना लागू नाही काय? अशी कोणती राज्यसत्ता चिर होऊन बसली आहे? ईश्वराच्या सत्तेची जोरानें एकदां लाट आली, की त्यासरशी कोणाचें काही चालायचे नाही. एकावर एक आदळणाऱ्या सागराच्या लाटा आज मोठ्यानें जयघोष करून सांगत आहेत, की

Rule Britannia rules the waves
And Britain shall never be slaves.

असो. समुद्राकडे तासन् तास बघत राहण्यात गंमत वाटे व वेळ केव्हां निघून जाई, हें कळत देखील नसे. निसर्गाच्या निरीक्षणांत अगम्य असें ज्ञान होते. ईश्वराच्या अगाध लीला पाहून त्यामध्यें मन तन्मय होतें. समुद्रावरची शुद्ध हवा शरीरांत गेल्यानें शरीर व मन ताजे होतें. म्हणून मोकळ्या हवेंतील हे बिनखर्चाचे व्यायाम, व निसर्गाचे निरीक्षण करण्याची संवय माणसाने लावून घ्यावी. पण हल्ली कृत्रिम आनंदांतच मनुष्य रमूं लागला आहे. सिनेमा तर सगळ्याच्या आवडीचा होऊन बसला आहे. अधाऱ्या बंद जागेत पुष्कळशा माणसांनी बसावयाचे, हें वरचेवर अशा जागी गेल्यानें प्रकृतीस अपायकारक असतें. हल्लीं असें म्हटलेलें कोणास रुचायचें नाही. सिनेमा तर आजकाल लहान-मोठ्यांचा, गरीब-श्रीमंतांचा आवडीचा विषय होऊन बसला आहे.

समुद्रकांठावरील एका Cafe मध्यें छान चहा घेतला व खाल्लें. खिडकीजवळच बसल्यानें समुद्रही दिसत होता. किती तरी माणसें चहा घ्यायला जमलीं. अशा तऱ्हेनें Cafe मध्यें जाऊन चहा घेण्याची

मजा वाटे. दर जागी सुशोभित चित्ताकर्षक खोल्यांमधून सुंदर सुंदर मुली चहा द्यायला असत. सुदर रूप व कपडे लहान मुलांना देखील आवडतात. आई चांगलेसे कपडे घातलेली दिसली, की मुलाना आवडते व सोडू नकोस हे आई म्हणून हट्ट धरून बसतात.

नंतर पुष्कळ वेळ समुद्रावर फिरलों. किनाऱ्यावर लहान लहान Chalets म्हणजे लहानशी सुरेख लाकडी घरें होती. त्यांत विलासी लोक मजा करीत होते. कोणी ग्रामोफोन लावीत तर कोणी खेळत अशी गमत चालली होती एकेकाची. ह्या Chalets ना दिवसाचे चारपाच शिलिग जरी भाडें पडे तरी पण तेथे गर्दी होती. आम्हा गरीब हिदुस्थानी लोकांना जेथें खायची भ्रांत तेथे असल्या गोष्टींचा विचारच कशाला करा.

## १६ सप्टेंबर १९३६

आज रविवार. सकाळपासूनच सूर्य दिसत होता. आम्ही १० वाजतां Bradford ला जाण्यास निघालो. सूर्यप्रकाशामुळे वनश्री सोनेरी रंगाच्या मुलाम्याने खुलून दिसत होती. आज सुट्टी व त्यात छान दिवस म्हणूनच मोटारीतून हिडाफिरायला जाणाऱ्यांची गर्दी होती. रस्त्यांत Harrogate Spa हें हवेचे ठिकाण लागले. हें फॅशनेबल मंडळीचे मजा करण्याचें ठिकाण. येथील Hotels, Restaurants अगदी नवीन तऱ्हेची व पुष्कळ आहेत. जवळपास सुदर हिरवी मैदाने, व सर्व करमणुकीच्या सोयी होत्या. १०० मैलाचा प्रवास करून आम्ही Bradford ला ३ वाजता पोहोंचलों. संध्याकाळी पायीच एका बागेंत हिंडायला गेलों. वाटेत एक आपला 'काळा' मनुष्य दिसला. ह्यांनीं रंगसादृश्य पाहून बोलायला सुरुवात केली. परदेशात आपल्या माणसाचे प्रेम कांही विचारायला नको. काळा म्हणजें आपला. हा मुसलमान गृहस्थ. तीन महिन्यापूर्वीं येथें आला. Drapers च्या धंद्यांत आहे. खर्चवेंच वजा जातां ७५ पौंड नफा झाला असे म्हणाला. आम्ही भेटलों म्हणून त्यालाही आनंद झाला. उद्यां चहाला या म्हणून आग्रह करूं लागला. आम्हाला वेळही नव्हता, व कशाला बिचाऱ्याला खर्चांत घाला ?

## १७ सप्टेंबर

आज १० वाजता आम्ही Bradford सोडले. रस्त्याच्या दोन्ही बाजूंस कोळशाच्या खाणी होत्या. त्यामुळे सृष्टिशोभा काहीच नव्हती. रस्ता अरुंद होता. १२॥ च्या सुमारास Newark-on-Trent ह्या गावी पोहोचलों. जेवणानतर हे Worthington Simpson च्या कारखान्यात कामावर गेले. मी व चबी हॉटेलसमोरील एका बागेत जाऊन बसलो. एक म्हातारा गृहस्थ आमच्याशी गप्पा मारायला लागला. 'हिदुस्थानची सुधारणा करण्याकरितां, निष्कामबुद्धीने आम्ही काम करीत आहोत.' मी म्हटले सुधारणा झाली खरी थोडीबहुत; पण आम्ही अन्नाला मोताद झालो आहोत अगदी. आणखी पुष्कळ अशी बोलणी झालीं काही चागले लोक म्हणत, की खरें म्हटले तर Every Nation must rule herself !

असो. हिदुस्थान दुसऱ्या देशाप्रमाणे स्वतंत्र व्हावा असे पदोपदी वाटू लागलें आणि त्याला उपाय म्हणजे, स्वदेशी वापरणे, प्रजा साक्षर होणे, सुदृढ होणे, व एकी होणे, ह्या गोष्टी लवकर अमलात आल्या पाहिजेत. इकडचे लोक हुषार, सुदृढ, त्याच्या मानानें आम्ही जिवंत प्रेते आहोत. तरी पण वाईट असले तरी आपले हवे. इकडे येऊन एवढे जरी वाटले, तरी पुष्कळ काम झाले. असो. ह्या आमच्या प्रवासाने किती तरी गोष्टी आम्ही शिकलो, व स्वदेशावरचे आमचे प्रेम जास्तच वाढले.

दुपारी चार वाजतां आम्ही Loughbourough ला जाण्यास निघालों रस्ता ६ टेकड्यामधून होता. खेडेगावामधून जायचे होते. तरी पण टेलिफोन, पेट्रोलची दुकाने, Refreshment Rooms वगैरे सर्व उत्तम आधुनिक सोयी होत्या. The Great Central Hotel मध्ये उतरलो. फारच मोठें, स्वच्छ आणि उत्तम होते अगदी. जिकडे तिकडे सुदर गालिचे, रगीबेरंगी पडदे, नवेंकोरे फर्निचर, मोठ्या Lounge Rooms तेथें पियानो, निजण्याच्या खोल्या पण सुदर सामानानी शृंगारलेल्या व अगदी मोकळ्या हवेशीर होत्या. आतापर्यंत आम्ही १५०० मैलांचा प्रवास केला. पण काडीचा त्रास झाला नाही. हॉटेलचें अन्न रोज, पण तें किती स्वच्छ, उत्तम, ताजें असें मिळे. कोठेंही पैसे घेऊन फसवेगिरीचा धंदा नाही. न मागतां, न ओरडतां सर्व गोष्टी वेळच्या वेळी मिळत. बाहेरचें अन्न कधीच बाधलें नाहीं

कोणाला. ह्यांची हॉटेले इतक्या व्यवस्थितपणाने चालतात कशी ह्याचें आश्चर्य वाटते. हॉटेलचे चालक ते नीट ठेवतात; पण जनता देखील तितकेंच स्वच्छ ठेवण्याचा प्रयत्न करिते. आम्ही आतापर्यंत १४–१५ हॉटेले पाहिली पण कधी कोठें नोकरांची भाडणे, आरडाओरड, गोधळ असा दिसला नाही, की कोठें गैरव्यवस्था दिसली नाही. कधी एक पैसा की वस्तु चोरीस गेली नाही. कुलुपाकिल्ल्याची जरुरीच नाही भासली कधी. हिंदुस्थानात कोठेही प्रवास करायचा विचार आला, की उतरायचे कोठें असा प्रश्न पडतो. कोणाकडे पाहुणे गेल्यास मनुष्य लोकाचा मिधा व बाधलेला पडतो. हॉटेले म्हटली तर घाणीची कल्पना, दिरंगाई, गोधळ पाहून प्रवासाचा विचार सोडण्याचीच वेळ येते. हल्ली तर काय क्षयरोग्यासारखे सार्सगिक रोगी वाटेल त्या हॉटेलमध्ये उतरतात, चोरून लपून का होईना ! स्वच्छता तशापैकीच. कोणत्या रोगाला मनुष्य बळी पडेल ह्याचा भरवसा नाही. ह्याच्याकडे पैसे जास्त पडतात हें खरें, पण आमच्याकडे तितकेच पैसे घेऊन अशी व्यवस्था होईल का ? एकाद्याने केलीच तर येणारे जाणारे तितकेच व्यवस्थित असतील का ? स्वच्छतेचे शिक्षण, सामुदायिक राहणीचे शिक्षण लहान मुलांपासूनच सर्वांस देण्यास हवें. सार्वजनिक शिस्त व स्वच्छतेची देशास अत्यत जरुरी आहे. आगगाडीचे डबे, शहरातील रस्ते, मोऱ्या, मुताऱ्या, ह्या घाणेरड्या असतात म्हणून त्यांच्या चालकाना नावे ठेवण्यापेक्षा जनतेलाच जास्त दोष द्यायला हवा. कारण वरील गोष्टी रोज स्वच्छ केल्या जातात. पण मनुष्य रस्ता झाडझाडी तोच जर लोक येऊन घाण करतात तर दोष जनतेचाच नव्हे का ? ती घाण आहे असें जरी वाटलें तरी पुष्कळ काम होईल. पण थर्डक्लासमधील घाणीत कांही काही लोक अगदी मजेने आनंदांत असतात. कारण ती घाण आहे अशी कल्पना देखील नसते कोणाला. हा सर्व अज्ञानाचा परिणाम. आपण प्रयत्न करण्याऐवजी आपल्या देशाच्या दारिद्र्याला व असहाय परिस्थितीलाच नावें ठेवीत बसतों. आपली सुधारणा दुसरा तिसरा कोणी करणार नसून आपल्यालाच ह्या स्थितीत सुधारणा लवकर केली पाहिजे.

असो. Loughbourough हें गांव लहान व करमणूक फारशी नसल्यानें आम्ही लवकरच सोडलें. एक दिवस गांवांत आम्ही पायींच

हिडत होतो. जातां जाता काही मुलें सहज कुतूहलानें आमच्याबरोबर पाहात पाहात चालली. पुढें तर हें बालसैन्य एकाला एक मिळून खूपच जमलें आमच्याबरोबर. निराळी माणसें दिसल्यामुळे गंमत वाटली असेल त्याना. बरी आम्हांला हंसायला चागली करमणूक झाली. म्हटलें आतां हीं कुठवर आमच्याबरोबर येणार !

## १७ सप्टेंबर १९३६ : परत लंडन

आज आम्ही लडनला आमचा इग्लड-स्कॉटलंडचा प्रवास संपवून परत आलो. लडनला आमच्या फेलोशिप क्लबात घराप्रमाणेच वाटे. एक तर आपले लोक येथे भेटत, त्यामुळे परकेपणा कसा तो मुळीच वाटायचा नाही. आज हिदुस्थानची खूप पत्रे बरेच दिवसांनी आम्हाला मिळाली.

## St. Barnardo's Homes

दुसऱ्या दिवशी आम्ही व आमचे कांही मित्र Barking Side येथील Dr. Barnardo 's Orphanage बघण्यास गेलों. येथे २,००० निराश्रित मुली, ७०० मुलगे ह्याची वेगवेगळी खूपच मोठी वसाहत होती. लोकांच्या उदार आश्रयाखालीच ही सस्था चालते. अगदी जन्मलेल्या घटकेपासून देखील मुले येथे घेतली जातात. आईबाप नसलेल्या निराश्रित मुलाचें निःस्वार्थबुद्धीने काम करीत असलेल्या बायकाचे मोठे कौतुक वाटतें. सर्व गोष्टी व्यवस्थित होत्या. शास्त्रीय पद्धतीनें सर्व काम होई. संस्थेमध्यें कपडे धुणें, पाव करणे, शिवणें, विणणे वगैरे सर्व कामें मोठ्या मुलांमुलींकडून करवून घेतात. एकंदर सर्व व्यवस्था बघण्यासारखी आहे. संघटितपणानें यंत्रासारखें सुरळीत काम हे लोक कसे करतात हें कांही समजत नाही. प्रत्येक जण कोणाच्या भानगडीत न पडता काम करतो म्हणूनच सर्व ठीक चालतें. असो. येथील चालकांनी दुपारचें जेवण व चहा दिला. आम्हींही कांहीं जिनसा विकत घेतल्या.

## १८ सप्टेंबर : यूगोस्लाव्हियास जाण्याची तयारी

मला यूगोस्लाव्हियास जायचें असल्यामुळें स्वतंत्र पासपोर्ट घेण्याकरितां आम्ही पासपोर्ट ऑफिसमध्यें टयूबनें गेलों. Cockspur Street

वर जाऊन British Delegation बरोबर माझें जाण्याचें नक्की करून आलों. नंतर पायीच दोन वाजतां Lyon च्या Corner House मध्यें गेलों. येथे Music असते म्हणून मजा वाटे. एवढे मोठे अचाट दुकान पण तिन्ही—चारी मजले गच्च भरले होते. Waitresses लवकर लवकर पदार्थ आणून देत होत्या. कितीही गोष्टी सांगा आणायला, पण न चुकता कशा चटकन् द्यायच्या आणून. कोणतीही गोष्ट चटकन् मिळण्यातच गंमत वाटते. चहा, चहा, करीत कठशोष करायला लागला तर काय मजा ? शिवाय वेळानें येऊन थडगार. म्हणजे छानच जुपते देणाऱ्याची व पिणाऱ्याची.

सिमल्यास असताना एक दिवस मी आपल्या हॉटेलमध्ये गेले. एक दीडची वेळ होती चागल्यापैकीच होते हॉटेल. जेवायला आण म्हणून नोकरास सागितले. किती वेळ लागेल विचारता 'अबी हो जायगा पाच मिनिट मे' म्हणून Bearer म्हणाला. आमची स्वारी नुकतीच इग्लडची हवा खाऊन आलेली. ही मोगलाई पाच मिनिटे आहेत असें आम्हाला तासाभराने कळलें. फुकट देखील जेवण नको तुझे म्हणून सागण्याची वेळ आली. व इंग्लडच्या सुखसोयीची आठवणच फक्त करून आम्ही रागारागानें तेथून कूच केलें. असो. J. Lyons; A. B. C.; Express Dairy ही Restaurants देखील सगळयांना परवडतील म्हणजे कमी पैसे पडणारी आहेत. याचे वैशिष्टय म्हणजे येथे 'टिपिग' (बक्षीस) द्यावें लागत नाही. हीं इंग्लंडमध्ये चोहीकडे आहेत. दोनचार घरे सोडली, की मुख्य मुख्य रस्त्यांमधून हीं दिसतात. येथें नेहमी गर्दी असते अगदी. कारण बहुतेक कामावरची मडळी जेवण बाहेरच घेतात. एक वाजता प्रत्येक जण कांही घरी जाऊं शकत नाही. चहा, दूध, खाण्याचे पदार्थ फारच छान, स्वस्त व उत्तम मिळतात ह्यांमधून. गिऱ्हाइकांना नीट चटकन् मिळाले की नाही, म्हणून बघण्यास बायकाच असतात, त्या येऊन विचारपूस करतात. किती तरी माणसें जेवीत असतात. पण कोणी कोणाकडे टक लावून बघायचा नाहीं, की तर्कवितर्क काढीत बसायचा नाही. गडबड, धांदल नाही; यंत्रासारखें सर्व. फारच झालें तर हळूच कांटयाचमच्यांचा आवाज येईल. हें सर्व पाहण्यांत गंमत वाटायची. सर्व कारभार यंत्राचा, लिफ्टचा, म्हणून भराभर होई. सर्व खावयाचे पदार्थ भराभर लिफ्टनें यायचे, खाल्लेल्या बशा लिफ्टनेंच

जायच्या. सकाळच्या कामाच्या मुलीची जागा दुपारच्या मुली घ्यायच्या, ती पण अगदी मिलिटरी शिस्तीनें. शिस्त-शिस्त-चोहीकडे शिस्त. जशी काही त्याच्या हाडीमासी भिनली आहे अगदी. किती सुरेख दिसे सर्व ! असो.

त्या Corner House मध्ये दुपारच्या वेळी सर्व रमणीय देखावा दिसत होता. सर्व जसे आनंदी आहेत असे वाटे. हिंदुस्थानात जर ही अशी बाहेर खाण्याची पद्धत सरसहा सुरू झाली (झालीच आहे म्हणा.) तर चागले का वाईट ? झाल्यास गृहसौख्य बुडेल, व प्रत्येक जण बाहेरच राहील. मला तरी असे होणे अनिष्ट वाटतें. एकादे वेळेस गमतीखातर सर्वांनी बाहेर खावें; पण स्वतत्रपणे एक हया हॉटेलांत तर दुसरा तिसरी-कडेच असे झाले तर मात्र वाईट होईल, एवढे खरे.

## १९ सप्टेंबर

आज शनिवार, दुपारी हाइड पार्कमध्ये बसलो. दुपारी कामानंतर तरुण मुले-मुली झुडीच्या झुडी हिडायच्या येथे. किती तरी गमती पाहायला मिळतात येथे. Miss मेयोप्रमाणेच पुस्तक लिहायचे असल्यास छान कथानकें मिळाली असती. पण लोकाची उणी काढण्यात आपले हित काय साधावयाचे आहे ? म्हणून दुर्लक्षच केलेले बरे. बाकावरती नटून थटून किती तरी मुली असायच्या. एकादा यायचा व मोटारीत एकादीला घेऊन मजा करायला जायचा. येथे हा अगदी सौदाच आहे, आमच्यासारखी अगदी विशिष्ट पेठ किवा रस्ते नाहीत. पण असे प्रकार येथें दिसतात. असो, मनुष्यस्वभाव येथून तेथून सारखाच.

## २० सप्टेंबर

आज रविवार, हवाही बरी होती, म्हणून सकाळीच हिडत हिडत हाइड पार्कमध्ये गेलो. बाकावर बसून येणाऱ्या-जाणाऱ्यांची मजा पाहात होतों. हातांत ४००–५०० रुपयांचा कॅमेरा होता. बोलण्याच्या नादांत तो तेथेंच राहिला व आम्ही चालू लागलों. अर्ध्या वाटेंत गेल्यावर लक्षांत आलें. पुनः परत जाऊन सर्व शोधलें, तो तेथें नव्हता. वाटलें गेलाच तो, आतां कसचा मिळणार. जवळच्याच ठाण्यावर जाऊन पोलिसला वर्दी दिली, व

घरी गेलों. लगेच पोलिसकडून एक कॅमेरा ठाण्यावर आला आहे म्हणून फोन आला, तुम्ही घेऊन जा. संध्याकाळी जाऊन आमचा आम्ही घेऊन आलों. 'Yours is a wonderful Country' असें त्याला म्हटले आम्ही. आमच्या देशात असा परत मिळाला असता का? किती भराभर गोष्टी झाल्या व कॅमेरा मिळाला!

एक दिवस आम्ही Hendon ला Air Display बघायला गेलों. तेथें अफाट गर्दी होती. गर्दीत ३–४ वर्षाचें मूल हरवले. लागलीच पोलिसनें Wireless Loud Speakers ने सर्वांना कळविले. मूल पोलिसजवळ अमुक जागी आहे वगैरे.

एक दिवस Public Telephone Kiosk मध्यें असेंच तान्हें मूल मिळाले. त्याचा वर्तमानपत्रांत फोटो वगैरे देऊन बातमी पसरविली. देश सुरक्षित असल्यामुळे मूल जरी चुकलें तरी फारशी त्याच्या सुरक्षितपणाची काळजी वाटायची नाही.

येथील पोलिस तर फारच अदबीचे, व सर्वांना मदत करण्यास अगदी तत्पर असतात. रस्ता ओलाडायला, मोटारी थाबवून मदत करतात, पत्ता सागतात. स्त्रिया व मुले ह्यांना प्रथम मदत करतात; जनतेचे ते सेवक आहेत अशी त्यांच्यात जाणीव असते. पोलिस म्हणजे कोणी गुरकावणारा, दडुकेशाही करणारा, असा दैत्य भासत नाही तिकडे. त्यांना माहिती पण चागली असते. किती चटकन् रस्त्याची माहिती सागतात! "First to the left, second to the right" अशा रीतीनें.

## २१ सप्टेंबर

आज ह्यांचे मित्र पुण्याच्या ट्रेनिग कॉलेजचे प्रिन्सिपॉल श्री. तावडे हे कांही ऑपरेशन् करण्याकरिता, Paddington येथील St. Mary's Hospital मध्यें दाखल झाले, हें कळल्याबरोबर आम्ही लागलीच त्यांना भेटण्यास गेलो. भेटण्याची वेळ नव्हती म्हणून पोर्टर जाऊं देईना. म्हटलें परक्या देशात आहोंत आम्ही. तेव्हां अशा स्थितींत दोन मिनिटें तरी त्यांना पाहूं दे आम्हांला. तेव्हां खास परवानगी काढून आम्हांला भेटू दिलें. Ward मध्यें त्यांना पाहून गहिंवरून आलें आम्हांला.

कारण आपल्याकडे स्वतंत्र खोलीत अशा हुद्याचा मनुष्य असायचा. येथें स्वतंत्र खोल्या क्वचितच घेतात. ते किती विचारी व शात होते. अशा परिस्थितीतही न डगमगतां परमेश्वरावर भरंवसा ठेवून ते होते. कौतुक वाटलें त्यांच्या शांतपणाचे. आम्हीं कितीदां तरी धीर दिला. त्यांना जवळच आहो येथे, घाबरूं नका वगैरे वगैरे, सागून दुःखी मनाने निघालों.

आम्ही व ते एकाच हॉटेलमध्यें असू. चबीला देखील त्याचा लळा लागला होता. ‘आई, तावडेकाका लवकर बरे होवोत अशी देवाला प्रार्थना करूं आपण.’ असें निजते वेळी ती म्हणाली.

दुसऱ्या दिवशी ४ ते ६॥ पर्यंत त्यांचें ऑपरेशन् झाले, व तें सुरळीत पार पडलें हें समजल्यावर बरे वाटले. हे व आणखी दोघे चौघे दवाखान्यात बसून होते सर्व होईतों. मुलांबाळांचा व बायकोचा धनी उठला म्हणून खरोखर बरे वाटले. आमची प्रार्थना देवानें ऐकली.

## २२ सप्टेंबर

हे व मी Continent वर जाणार असल्यामुळें चबीला आम्ही लंडनलाच ठेवून जाणार होतों. एका इंग्लिश फॅमिलीमध्यें तिला ठेवलें. त्या बाईना हिंदुस्थानी जेवण जेवण्यास आज आम्ही बोलावले होतें. हिंदुस्थानांत त्या कांही वर्षे होत्या म्हणून आपले जेवण त्यांना आवडे. जेवणानंतर त्या चबीस घेऊन गेल्या. चबी गेली म्हणून मला सुचेना अगदीं. इतके दिवस सर्व जागी ती सारखी बरोबर असे; पण मला कॉन्फरन्सला जायचें व हे गांवोगांवी कारखाने बघायला जायचे. म्हणूनच तिला दूर ठेवावें लागले.

# प्रकरण तिसरें

## यूगोस्लाव्हियाच्या आंतरराष्ट्रीय स्त्री-संघ परिषदेस हिंदुस्थानची एक प्रतिनिधि म्हणून प्रयाण

### २३ सप्टेंबर १९३६

हचांना व मुलीला सोडून जायचे म्हणून जिवावर आलें माझ्या. वाटलें उगाच घेतले अंगावर. पुन. विचार आला, इतर सुधारलेल्या राष्ट्रातील स्त्रियाबरोबर विचारविनिमय करण्यास, अनाथ हिदुस्थानातील स्त्री, बरोबरीच्या नात्याने, जात आहे ही चागलीच गोष्ट नाहीं का ? हिदुस्थान कोणत्याही गोष्टीत माघार घ्यायचा नाही. उलट सर्व जगाला हिद महिला आदर्श होणार आहेत, तेव्हा मन दुःखी करून काय फायदा ? जाणे हेंच चागलें.

लडनहून ९० इंग्लिश बायका निघाल्या. Victoria स्टेशनवर आम्ही दोघे दीड वाजता पोहोचलों. आगगाडीवर I. C. W. ची Labels फडकत होती.

बायकाची सामान ठेवण्याची गडबड चालली होती. आमची ही टूर Hickie Tourist Office for Yugoslavia, Cockspur Street, London W. I. ह्या कपनीनें काढली होती. ह्यात हॉटेलची, बोटीची व आगगाडीची व्यवस्था, सप्टेबर २३ ते ऑक्टोबर ११ पर्यंत होती. व त्याबद्दल लागणारे ३० पौड आगाऊच भरले होते. प्लॅटफॉर्म बायकांनीं व त्यांना पोहोचवायला आलेल्या मंडळीनीं गजबजून गेला होता. फोटोग्राफर ह्या देशकार्य करणाऱ्या महिलाचे फोटो घेण्यात गर्क होते अगदीं. अशा गडबडींत दोन वाजले. हचांनी माझ्याजवळ बसणाऱ्या बाईस माझी विचारपूस करण्यास विनंति केली. गाडी सुटली, हे दिसेपर्यंत मी बघत होतें. एकटीच कोठल्या कोठें जाणार म्हणून मनांत खळबळ उडाली होती, डोळ्यांवाटे पाणी निघाल्यास कोणी हंसेल, नांवें ठेवील असें वाटलें, व अत्यंत परिश्रमानें सर्व दाबून ठेवावें लागलें. कशाला जायचें अंगावर

घेतलें असें सारखे वाटू लागले. इग्लिश बायकाशी पुढें ओळख झाल्यावर विचारले, तेव्हा त्या म्हणू लागल्या, आम्ही सकाळीच आमच्या नवऱ्यांचा निरोप घेतला. प्रत्येकाला असेच घर व माणसे सोडताना वाईट वाटतें. मनुष्यस्वभाव येथून तेथून सारखाच.

असो गाडी भराभर अतर तोडीत होती. डोव्हरची खाडी लागली. तेथून बोटीने कॅले, व नतर रात्री नऊला पॅरिसला पोहोंचलों. दहाला पॅरिस सोडले. पॅरिसपर्यत आगगाडीतील Waiters व इतर प्रवासी जरा दांडगे वाटले. इंग्लिशाची सर कोठेंच येईना. स्वच्छता पण कमी झाली. पुरुषाच्या डोक्याचा स्वच्छ गोटा. रोटी कॉफीत बुडवून खाणें. अशी गबाळी पद्धत दिसली. टक लावून पाहणे. हे कदाचित् कुतूहलाने असेल म्हणा, तरी जरा अयोग्य दिसलें इंग्रज लोक संवयीमुळे आपल्याला परके वाटत नाहीत. त्याच्या प्राताला सोडले तरी देखील सगळीकडे परके परकें वाटू लागले. परकी भाषेमुळे प्रवासाचा सुरक्षितपणा देखील कमी वाटू लागला. कोणी फसवील, काही चोरील अशी धास्ती वाटू लागली. रात्री पॅरिसला Coupe मध्ये Budapest ला जाणारी २७ वर्षांची हगेरियन बाई माझ्या शेजारी होती. तिची व माझी खूप गट्टी जमली. स्वभावानें किती चांगली होती. चहाला, जेवायला जातेवेळी मला बरोबर घेऊन जाई. तिच्या व माझ्या नाना विषयावर गप्पा झाल्या. स्वतःचे लग्न होऊन दोन वर्षे झाली. नवरा आवडत नाही. म्हणून लवकरच काडीमोड घेणार आहे असे म्हणाली. किती देखणी व चलाख होती ती ! हिंदुस्थानविषयक किती तरी गोष्टीबद्दल तिनें माझ्याशी चर्चा केली. माझे वैवाहिक जीवन कसें आहे, लग्न केव्हां झाले वगैरे तिनें चौकशी केली. माझें वैवाहिक जीवन फारच सुखी आहे. एकमेकांमुळें आम्ही दोघेंही आयुष्य सुखानें घालवितों. काडीमोडाची कल्पनाच मला सहन होत नाही, हे ऐकून तिला बरें वाटलें.

## २४ सप्टेंबर १९३६

पॅरिसनंतर सकाळी स्वित्सरलंड दिसूं लागलें. दोन्ही बाजूनी मोठमोठे डोंगर, त्यांमधून वाहणारी ऱ्होन (Rhone)नदी. डोंगरांच्या उतरणींवरील रमणीय वनश्री, त्यामध्यें काम करणारे शेतकरी, त्यांच्या सहचरी व गोंडस

बाळे पाहून मजा वाटली. तरी पण दार्जिलिग किवा निलगिरि पाहून जो एक आपलेपणा वाटतो तो कोठेही वाटेना. मायदेशाचे ऐश्वर्य पाहून किती कौतुक करावेसें वाटतें त्याचें. आपलेपणा म्हणजे कांही और असतो. हिमालय पाहिला, की प्रेमाचें भरते येते. गगा पाहिली, की भक्तिभाव मनात उभा राहून, आईप्रमाणें पूज्यभाव उत्पन्न होतो.

नंतर १२–४० ला मिलान लागले. इटलीची नैर्सगिक शोभा–फारच चांगली दिसली. जागजागी द्राक्षाचे वेल, सुदर फळझाडें, भाजीपाला, हिरवीचार मैदानें, नीटनेटकी नागरून ठेविलेली जमीन, आणि प्रत्येक कोनाकोपऱ्यातून मुसोलिनीचें भव्य चित्र डोळयांसमोर दिसे. मुसोलिनी-सारखा देशाचे प्रतिपालन करणारा असतांना लोकाना अन्नपाण्याची काळजी आहे का ! शेतीची काळजी करणारा तोच. आणि शेतीसारखें देशाच्या कल्याणास काय पाहिजे ? इटली किती समृद्ध दिसला! असो. साडेचारला व्हेनिसला पोहोंचलो. जागोजागी पासपोर्ट दाखवायला लागत. व्हेनिसला बोटीत बसून दुसऱ्या किनाऱ्याला गेलो. Adriatic Ocean मध्यें जागोजागीं Gondola मधून पाण्यांतून जावें लागे. भाजीवाले वगैरे बोटीतून भाजी घेऊन विकत. घराचे पाये पाण्यांत बुडालेले दिसत. आजूबाजूची झाडी सुदर दिसे. पूर्वकालीन मोठमोठी घरे, चर्च, जुना राजवाडा वगैरे जुन्या राज्याचे अवशेष दिसले. दुसऱ्या किनाऱ्यावर जहाज लागल्यावर, मोटारीतून Hotel Des Bains मध्ये गलो. फारच भव्य, मोठें व स्वच्छ होतें हें. केवढालें एकेक दालन, जिने व खोल्या होत्या. सर्व जागी रंगीत गालिचे, पुष्पपात्रें, पाम्स ह्यानी सुशोभित केले होते. खोल्यां-मधून भिंतीला सुदर फुलाचे व पतंगाची चित्रें ज्यावर काढलेली आहेत असे कागद लावून आकर्षकपणा आणला होता. जिकडे नजर फेंकावी तिकडे रमणीय दृश्य होतें. खिडकींतून बाहेर नजर फेंकल्यास अफाट सागर दिसे.

जेवणाच्या खोलीत तर अगदी चकचकाट होता. हंसतमुखानें तरतरीत Waiters वाढीत होते. बायका गप्पा मारण्यांत अगदी रमल्या होत्या. आयुष्यांत अशा गोष्टी क्वचितच मिळतात आणि अशा गोष्टी मिळणें म्हणजे मोठें भाग्यच हवें. सर्व सभासद स्त्रिया वयानें माझ्यापेक्षां फारच मोठ्या होत्या. शिवाय पुष्कळ जणी विधवा, लढाईंत प्रत्येकीनें देशाकरितां आपले

पति किंवा मुलगे बलिदान दिलेले होते आणि त्या भयंकर दुःखानंतर व्यथित मनाला रंजविण्यास त्यानीं देशसेवेचे पवित्र काम स्वीकारलेलें होतें. इतक्या भयंकर दुःखानंतर देखील त्यांच्या आनदी स्वभावाचें व उत्साहाचें कौतुक वाटतें. ससारांतील दुःखे विसरण्यास सामाजिक कामासारखें दुसरें औषध नाही. ह्या सर्वच बायका माझ्याशी फारच चागल्या वागत. Lady Emmot व त्यांची मुलगी Hon. Mrs. Peel ह्या एवढ्या मोठ्यांच्या; पण आपल्या टेबलावर मला जेवायला घेत. माझी विचारपूस करीत.

## २५ सप्टेंबर : व्हेनीस (इटली)

व्हेनिस येथे St. Marks चर्च व एक जुना रोमन राजवाडा पाहिला. येथें पुष्कळ Paintings आहेत. बाराव्या शतकांतला हा राजवाडा आहे. दुपारीं जेवणानंतर तीन वाजता हॉटेल सोडलें, व आड्रियाटिक महासागरावर S. S. Karl Alexander ह्या बोटीवर चढले. सामान वगैरे नीट पाहून, बोटीवर खिन्नपणानें उभे होतें ! एकलेपणाची व्यथा मनाला छेडीत होती. ह्यांना व मुलीला सोडल्यामुळें किती उदास वाटत होतें! आजची रात्र व उद्यांचा दिवस गेला, की डॉ. काशीबाई नवरंगे ह्या (हिदुस्थानच्या दुसऱ्या प्रतिनिधि) भेटतील आणि मग आपलें कोणी तरी माणूस मिळेल व बरें वाटेल, अशी आशा होती. अशा विचारांत मी होतें, इतक्यांत माझ्या पाठीवर कोणीं हात ठेविला. मागे वळून पाहतें तों काशीबाई दिसल्या. किती आनंद झाला आम्हां दोघींना, स्वदेशांत माणसाची किमत नसते, किती हायसें वाटलें मला. काशीबाई पण महिनाभर एकट्या दुकट्या हिंडत होत्या. मला पाहिल्यावर त्यांनाही बरें वाटलें. मला तर त्यांना कडकडून भेटावें असें वाटलें. ह्यानंतर त्या जेथें तेथें मी असें आमचें चाललें होतें. माझ्या इंग्लिश बहिणी पण माझा आनंद पाहून म्हणाल्या, आतां काय तुमचें मनुष्य तुम्हांला मिळालें; बरें झालें ना ? मीं म्हटलें तुम्ही नाहीं का माझ्या, किती प्रेमानें मला वागविलेंत !

असो. आमची बोट फारच सुंदर होती. माझी First Class Cabin Single Berth छान होती. जागोजागच्या बायका भेटल्या. एकमेकांशीं गप्पा मारतांना मजा वाटे. आम्हांला त्या हिंदुस्थानविषयक माहिती विचारीत. महात्मा गांधींबद्दल त्यांना फार आदर वाटे. आमच्या येशू

ख्रिस्ताप्रमाणेच महात्मा गांधी आहेत असें त्या म्हणत. हिंदुस्थानी बायका फारच हुषार झाल्या, अशी आमची कीर्ति ऐकून मला सात्त्विक अभिमान वाटे. बोटीवर, जेवणाच्या भव्य खोलीत तर जेवण्याच्या वेळीं खूप गमत वाटे. आमच्या बोटीवरच Lady Aberdeen (वय, ८०) ह्या होत्या. ५० वर्षे International Council of Women ह्या सस्थेच्या त्या अध्यक्ष होत्या. Canada व Ireland च्या व्हाइसरॉयच्या त्या पत्नी; Scotland मधील अॅबरडीन हें त्यांचेंच मालकीचें गाव. एवढ्या म्हातारपणी इतक्या दूर परिषदेस जाणें म्हणजे कमालच आहे की नाही ? त्याच्याप्रमाणेच Dame Elizabeth Cadbury, ह्या बर्मिंगहॅमच्या Cadbury's Chocolate Factory च्या मालकांच्या पत्नी. ७० वर्षांच्या असतील. पण सर्व परिषदेंत त्या पुढें. आळस केव्हांच नाही. त्यांच्या तरतरीतपणाचे कौतुक करावे तेवढें थोडेच.

## २६ सप्टेंबर १९३६

आज दुपारी ११–१२ वाजतां Split ह्या गावी बोट थांबली. तेथें गांवांत पायीच हिडून आलों. जुनी देवळे वगैरे पाहिली. लोक Sleeping Suit घालून रस्त्यावरून हिंडत. सर्व चमत्कारिक व घाणेरडें वाटले; बायका आम्हांला पाहून बोलण्याची धडपड करीत. पण भाषा येत नसल्यामुळें खुणेनेंच बोलावे. तरी पण त्या आपला आनंद व्यक्त करीत. आम्ही दोघी साडी नेसलेल्या, माझ्या कपाळी कुंकू होते, त्यांना तें सर्व चमत्कारिक वाटे. म्हणून मुलें, बायका निरखून पाहात. कोणी इंडियानो, कोणी चायना म्हणत आम्हाला.

## Dubrovnick ला आमचें स्वागत

संध्याकाळीं जेवणानंतर ८॥ ला Dubrovnick ला बोट थडकली. आम्हांला घेण्याकरितां, स्वागतार्थ, यूगोस्लाव्हियाच्या मुली त्यांच्या रंगीबेरंगी राष्ट्रीय पोषाखांत आल्या होत्या. सभेच्या अध्यक्ष लेडी अॅबरडीन ह्यांच्याभोंवती घोळका करून त्यांना भंडावून सोडलें सर्वांनीं. त्यांना फुलें, माळा देऊन मोटारींतून घेऊन गेल्या. आम्ही

सर्व जण आपापल्या नियोजित हॉटेलमध्यें गेलों. काशीबाई Hotel Belvedere मध्ये व मी Hotel Kupari मध्ये गेलें. आमची अशी ताटातूट झाल्यामुळें मला बरें वाटेना, पण इलाजच नव्हता. आमचें हॉटेल कोठल्या कोठें दूर, दरीखोऱ्यांत होतें जसें. रात्रीची वेळ, अंधार, मधूनच पाऊस पडे. रस्त्याच्या एका बाजूनें समुद्र, काळेकुट्ट डोंगर, त्यामुळें सर्व भयाण व अपरिचित वाटू लागलें. एकटी तर मी जातेच ना. इंग्लिश बायका माहितीच्या होत्या म्हणून त्याच्याबरोबर गेले. इंग्लंडमध्ये खाण्या-पिण्याचें कोठेच भय नसे. येथे तितका सुरक्षितपणा वाटेना. लोक सुशिक्षित असले, आरोग्यशास्त्राचे नियम जाणणारे असले, म्हणजे हॉटेलमध्यें खाणें धोक्याचें नसतें. आमच्या हिंदुस्थानांत, बाहेरचे लोक आले, की त्यांना पण ॲंटि-टायफॉईडचें इंजेक्शन घ्यावें, की देवीचें घ्यावे असे सारखें वाटत असतें. हिंदुस्थानांत वाटेल तिथलें पाणी पिण्यास किंवा खाण्यास, परकीयांना भय वाटतें, तसेंच येथें मला वाटले. पाण्याच्या बदली सोडाच घेत असू. चहा बिनदुधाचा, असे चाललें होतें. दुसऱ्या दिवशीच्या वर्तमानपत्रात, स्त्री परिषदेच्या बातम्या, प्रतिनिधींचे, अध्यक्षांचे फोटो, इत्यादि दिसू लागलें.

## २७ सप्टेंबर १९३६

आज आदितवार, सकाळीं आम्ही बसमधून गांवांतून हिंडून आलों. हॉटेलजवळील Beach वर माझ्या मैत्रिणी Mrs. Finch व Mrs. Skinner ह्यांनीं मला चहा दिला. ह्या दोघी इंग्लिश बायांबरोबरच मी चोहीकडे जाई येई. मला सोडून त्या कोठेंच जायच्या नाहींत. ह्या दोघींनीं माझी आज पुष्कळच करमणूक केली. सभेला सुरुवात उद्यांपासून होणार होती; पण आज मला मुळीच करमलें नाही. सारखी हुरहूर वाटत होती. केव्हां परिषद संपते व मी मुलीला व ह्यांना भेटते असें झालें होतें.

## २८ सप्टेंबर १९३६ : परिषदेस सुरुवात

(Conference of International Council of Women)

आज सोमवार, सकाळी नऊ वाजतां परिषदेस सुरुवात झाली. Preparendija हॉलमध्ये सभेस जागा दिली होती. Peace, Finance,

Suffrage, ह्या विषयांवर लहान लहान कमिटी एकेका खोलींत भरवून तेथें जागजागच्या कौन्सिलचे अहवाल वाचले गेले. मी Peace कमिटीत बसलें होतें. Dame Elizabeth Cadbury ह्या अध्यक्ष होत्या. इंग्लिश व फरेंचमध्यें चर्चा होई. इंग्लिशमध्यें भाषणें झाल्यानंतर एक दुभाषी बाई फरेंचमध्यें अर्थ सांगे, एक यूगोस्लाव्ह भाषेंत सांगे. इतक्या भानगडी होत्या तरी सर्व काम किती चटकन् होई. १॥ वाजेपर्यंत काम चालले. दुपारीं कांहीच काम नव्हतें. दुपारचें जेवण ३ वाजतां उरकले. माझ्या बाकीच्या मैत्रिणी व इतर सर्व बायका कामानिमित्त बाहेर गेल्या. मी घरांत पडून राहिलें. कांही केल्या करमेना अगदी. हवा पावसामुळें खराब, दुपारीच अंधार झाला. खूप रडावेसें वाटलें, व तसें झालेंही!

दुसऱ्या दिवशी सभेच्या दरवाजातच प्रेस फोटो-ग्राफरांनी फोटो घेतला. दर साडीगणिक फोटो घेत. इतका त्यांना हिंदुस्थानी पेहेराव आवडे. साडी हात लावून पाहात. भाषा येत नसली तरी खुणेनें साड्या सुंदर आहेत. म्हणून म्हणत. हिंदुस्थानी पोषाखांत स्त्रियांचें मार्दव आहे, रम्यपणा आहे; केंस, कुंकू सर्व त्यांना आवडे. त्यांच्यांतील कापलेलें केंस, तो पुरुषी पोषाख ह्यापेक्षां आमचा विनयशील असा पेहेराव त्यांना पसंत पडे. पुष्कळ वेळां कोट काढून टाका म्हणून म्हणायच्या व साडी नीट पाहूं दे म्हणून आग्रह करायच्या.

## २९ सप्टेंबर १९३६

आजही जिना चढत असतांना प्रेस-फोटोग्राफरांनी माझा फोटो घेतला. Child Welfare, Public Hygiene ह्या विषयांवर Italian बाईंच्या अध्यक्षतेखालीं, स्वीडन, स्वित्झर्लंड, पोलंड येथील डॉक्टरणींची चर्चा झाली. नंतर १॥ वाजतां आम्ही सर्व जणी एका मोठ्या Cafe मध्यें खाण्यास गेलों. नंतर दुकानें बघत बघत ३ वाजतां घरीं आलों. आज सारखा पाऊस पडत होता. ह्यांचें व चबीचें पत्र आल्यानें मला फार आनंद झाला.

## ३० सप्टेंबर

आज इटॅलिअन् प्रेसिडेंट मॅडम रुबिलां ह्यांच्या अध्यक्षतेखालीं 'बे-कायदेशीर मुलांची व कुमारिका आयांची व्यवस्था' ह्या गोष्टीवर चर्चा झाली

स्वीडनमध्यें मुलाला व आईला सरकार ७५ क्राऊन्स देतें, ग्रेट ब्रिटनमध्यें बापाचा पत्ता लावून त्याच्याकडून पैसे घेतें, व धर्मादाय संस्था त्या मुलांचें पालनपोषण करतात. ह्याच संस्था अशा पतित कुमारिकांचीं बाळंतपणें करतात. ग्रेट ब्रिटनमध्ये कुमारी आयांचें वय मात्र १६–१८ पासून ११–१५ हें झालें आहे. इटॅलिअन् अध्यक्ष म्हणाल्या, आज ४५ वर्षे मी ह्या कुमारिकांत काम करीत आहें. किती तरी भ्रष्ट अशा कुमारिका आहेत. ह्यांच्या वर्तनाला आळा कसा घालावा हेंच कळत नाही.

मी म्हणतें, की हें मुलीना दिलेल्या फाजील स्वातंत्र्याचे परिणाम. दुसरें सबळ कारण म्हणजे मुलांपेक्षां मुली जास्त. बिकट प्रश्न आहे खराच त्यांच्या समाजकार्यकर्त्यांपुढें. कसा सोडविणार तो खरा!

दुसरा ठराव Mrs. Finch, Sheffield ह्यांनी माडला. ग्रेट ब्रिटनमध्ये १,९५,००० मुले लुळीपांगळी आहेत; १०० मुले दर आठवड्यास मोटारखाली चेंगरतात. अशाकरितां Bath Wessex येथें हॉस्पिटल आहे. तेथें यत्रामध्यें निजवून ठेवलेल्या मुलांकडून शिवण्याचीं कामें, विणण्याची कामें, कलाकुसरीची कामे करून घेतात, व अशा तऱ्हेनें त्यांना स्वावलंबी बनवून, त्याचें जीवन सुखावह करतात.

दुपारी १॥ वाजतां एका मोठ्या Cafe मध्ये मी माझ्या इंग्लिश सोबतिणीबरोबर जेवायला गेले. येथेही एकानें माझा फोटो घेतला. (फोटोचा वरचेवर उल्लेख करण्याचें कारण म्हणजे हिंदुस्थानी स्त्रीबद्दल वाटणारें कौतुक. खरे म्हटले तर त्यांना जिव्हाळा, प्रेम वाटे. गुलाम देशाचे जरी आम्ही असलों तरी एका अत्यंत हुषार, नांवाजलेल्या सर्व गुणांची खाण असलेल्या देशांतून आलेली बाई ह्याबद्दल त्यांना आदर व कुतूहल वाटे.) रस्त्यानें कांही यूगोस्लाव्ह बायका भेटल्या, त्यांनी माझ्या गालांना हात लावून माझें कौतुक केलें व आपलें प्रेम व्यक्त केलें.

## २ ऑक्टोबर १९३६

आज कांहीं रिपोर्टवाचन, थोडेसें शुभ-संदेशवाचन असें काम झालें. १॥ ला घरीं आलों. रात्रीं एका प्रमुख थिएटरमध्यें Housing वर Mr. Aber Combie ह्यांचें व्याख्यान झालें.

## ३ ऑक्टोबर

आज कार्यकारी मडळाची निवडणूक झाली. सभेंत फारच गोंधळ माजला. कांही बायका सभागृह सोडून जाण्याच्या बेतात होत्या. पण कायसें बिनसलें होते तें निभावलें लवकरच. दुपारी एका श्रीमान् व्यापाऱ्याकडे चहाला गेलों होतों. हवा पाऊस पडल्यानें फारच गार होती.

## ४ ऑक्टोबर

आज आदितवार होता. सकाळी ७ वाजता आम्ही सर्व मोटारनें बोटीच्या धक्क्यावर गेलों. तेथून २००–३०० बायका मिळून यूगोस्लाव्हिया-च्या राणीकडे चहापार्टीस जायचे होतें. Karl Alexander ह्या बोटीनें गेलों. बोटीवर खूपच मजा आली. मला पुष्कळ जणींनीं हिंदुस्थाना-बद्दल माहिती विचारली. जवाहरलाल नेहरूंची सर्व माहिती एका बाईंना हवी होती. इतक्या ऐश्वर्यांत, लाडांत, वाढलेल्या आईबापांच्या लाडक्या मुलानें सोसलेले कष्ट ऐकून तिच्या डोळ्यांना पाणी येऊं लागले. अशा देव-माणसांची बायको कालानें हरण करावी हें ऐकून तर तिला जास्तच वाईट वाटले. महात्म्यांना अशी दु.खे नसली तर मग ते मोठे कसले! दुःखानेंच त्यांची किंमत जगाला जास्त पटते. कविवर्य टागोर, महात्मा गाधी, ताजमहाल, आणि जवाहर ह्या गोष्टीबद्दल सगळ्यांना थोडीबहुत माहिती, कुतूहल व अत्यंत आदर असे. हिंदुस्थान एका काळी जगाला सर्व गोष्टींनी ललामभूत होता. त्या आदर्श राष्ट्रातील, हिंदुस्थानी स्त्री ह्याच दृष्टीनें लोक मजकडे पाहात. दुर्दैवाचे फेरे सगळ्यांनाच असतात, म्हणून कोणी तुच्छतेनें हिंदुस्थानी स्त्रीकडे हिणवून पाहिलें नाहीं. त्याबद्दल किती तरी सात्त्विक अभिमान वाटत होता मला.

दुपारी Kotor हें यूगोस्लाव्हियांतील सैन्याचें ठाणें वाटेत लागलें. येथील जुनीं देवळे वगैरे पायीच पाहून आलों. ह्यापुढील राजवाड्या-पर्यंतचा प्रवास मोटारनें करायचा होता. खूप मोटारीच्या रांगा लागल्या. आम्हांला पाहायला आजूबाजूला पुष्कळ गर्दी झाली. सर्वांच्या चेहऱ्यांवर विस्मय व आनंद दिसत होता. मोटारचे भोंगे, बोलणीं, गडबड कांहीं कोणाचें कोणाला ऐकूं येईना अगदीं. अशा तऱ्हेनें एकामागून एक मोटारी

निघाल्या. रस्ता डोंगराच्या वळणातून व समुद्राच्या लगतहून असा होता. बऱ्याच दिवसांनी सूर्यप्रकाश दिसल्यामुळे, सृष्टिदेवी न्हाऊन माखून लख्ख झालेली व रमणीय दिसत होती. सृष्टिदेवीच्या हिरव्यागार पाचूसारख्या शालूवरील सोनेरी मुलामा नयनमनोहर दिसला. रस्त्याच्या बाजूनी काळसर डोंगराच्या उतरणीवरील जाभळ्या टपोऱ्या द्राक्षाचे घोस खाली उतरून अगदी तोडून आणावेत असा मोह घालीत होते. राणीचा राजवाडा येथून २० मैल दूर होता. आम्हाला मार्ग दाखविण्यास जागोजागी पोलिस उभे होते. अशा तऱ्हेनें वनश्रीचा मनमुराद आनद लुटीत आम्ही केव्हां राजवाड्याजवळ आलों हे आम्हांला कळले देखील नाही. राजवाड्याजवळ मोटारीच्या रांगा लागल्या. राजवाडा नवा, बगलेवजा होता. जवळच निळसर समुद्र आपली तऱ्हतऱ्हेची रूपे दाखवून, राणीच्या दुःखी जीवाचें सांत्वन करीत होता. एका बाजूस गिरिराज ह्या अनाथ राणीचें रक्षण करण्यास सज्ज होता. दुसऱ्या बाजूस डोंगराच्या उतरणीवर कृत्रिम बगीचा केला होता; तर हिरवीगार मैदाने डोळ्याना आनंदवीत होती. निष्पाप, मनोहर फुलें आपापल्या परीनें राणीची सेवा करण्यास नटली होती. ईश्वराच्या सर्व अगाध लीलाचें राजवाड्याभोंवती प्रदर्शन होतेंच. शिवाय ऐहिक सुखाची पण पराकाष्टा झालेली होती. आमच्याकरिता खलाशांच्या सुस्वर बँडचा कार्यक्रम होता. समुद्रकांठी त्याला शोभणारेच निळे कपडे घालून गौरवर्ण असे खलाशी छानच दिसले. बँडचे सूर अंतःकरणाला हलवून सोडीत होते. अशा थाटांत राणीला भेटण्यासाठी आम्ही सर्व जणी प्रत्येक देशाच्या अशा जमावानें उभ्या राहिलों. फोटो काढणाऱ्यांची गडबड चाललेली होती. इतक्यांत पांढऱ्या शुभ्र पोषाखांत यूगोस्लाव्हियाची राणी, व जांभळ्या पोषाखांत तिची आई रुमानियाची राणी, प्रवेशद्वारांतून आल्याबरोबर, यूगोस्लाव्हियाच्या बायकांनी त्यांचा जयजयकार केला. नंतर दोघी राण्यांनीं सर्वांशी हस्तादोलन व चार शब्द बोलून विचारपूस केली.

राणीच्या भेटीनंतर सर्वांनी गप्पा मारीत चहा वगैरे घेतला. राणी-बद्दल फार वाईट वाटे. राजा प्रवासास जात असतांना मासमध्यें कोणा अत्याचाऱ्यानें त्याला ठार मारलें. राणी जरी असली तरी दुःख कांहीं कोणाला सुटलेलें नाहीं. राणी असली तरी विधवा! आणि ती अशा आकस्मिक

तऱ्हेनें झालेली! आमच्या हिंदुस्थानी स्त्री-मनाला दुसऱ्याचें देखील वैधव्य पाहवत नाहीं. मी कुंकू लावी ह्याचा अर्थ काय, तें सौंदर्याचें चिन्ह आहे की काय असें मला विचारीत. हिंदुस्थानी आर्य स्त्रीच्या पतिदेवाच्या वास्तव्याचें तें शुभचिन्ह आहे असें मी त्यांना सांगे, आणि ह्या तांबड्या चिन्हाची आम्हां लग्न झालेल्या बायकांना फार किंमत वाटते. त्याच्याशिवाय सहसा कपाळ आम्ही कोणाला दाखवीत नाही. (विधवांनी कुंकू वाटल्यास लावावें किंवा लावूं नाही अशा विचारांच्या स्त्रियांना हें कदाचित् रुचणार नाहीं.) असो. अशा सुखदु:खमिश्र विचारांत आम्ही राजवाडा व ती प्रेमळ राणी सोडली. आमच्या मनाला तिनें चटका लावला होता.

परत जाण्याच्या बोटीपाशीच माझी भेट घेण्यास, विद्यार्थ्यांची झुंड उभी होतीच. 'तुमचा हिंदुस्थान यूगोस्लाव्हियाप्रमाणेंच लवकर स्वतंत्र होवो' असें ते मोठ्या कळकळीनें म्हणाले. नतर तेथील वर्तमानपत्रासाठीं हिंदुस्थानसंबंधी बरीचशी माहिती लिहून आम्हाकडे आपल्या फोटोसह पाठवा असे म्हणाले. अस्पृश्य, हिंदु-मुसलमान, आम्हां बायकाचें शिक्षण, लग्नें, आमचे पुरुष आम्हाला छळतात कीं काय ? वगैरे माहिती त्यांना हवी होती. ती मी लवकरच पाठवून देईन असें त्यांना आश्वासन दिले. नंतर बोटीवर चढलें. बोटीजवळ पण मला भेटण्यास, माहिती विचारण्यास लोकाची गर्दी जमली. वेळ झाल्यामुळे बोटीचा भोंगा झाला व हा तात्पुरता मित्रसमूह कष्टानेच सोडावा लागला.

बोटीत मला Mrs. M. R. Jennings ही ३८ वर्षांची अमेरिकन बाई भेटली. इकडच्या तिकडच्या खूपच गप्पा झाल्या. तिलाही हिंदुस्थानबद्दल फारच आदर होता. अमेरिका आधिभौतिक सुखांत दंग झाल्यामुळें गृहसौख्य पार नष्ट झालेलें आहे. मनाची शांति, सुख हें कांहीं काडीमोडांत, मोटारी उडविण्यांत, किंवा अठरा सिनेमा पाहण्यांत नाहीं. देव, प्रार्थना, स्वार्थत्याग व उच्च विचार ह्यांतच आहे. आणि तें शिकायला मी हिंदुस्थानांत येणार. माझ्या मनाला शांति तेथें मिळेल. बाईनीं लग्न झाल्यावर ८ वर्षांनीं नवऱ्याचा स्वभाव जुळत नाहीं (Incompatibility Divorce) म्हणून काडीमोड घेतला. माझा नवरा—नवरा ह्या नात्यानें चांगला नाहीं वाटत मला. पण ओळखीचा मित्र म्हणून कांहीं वाईट नाहीं, मीं म्हटलें. ८ वर्षें

राहिलेला नोकर देखील काढतांना आम्हांला विचार करावा लागतो, व वाईट वाटतें, आणि तुम्हांला नवरा कसा सोडवितो ?

## ६ ऑक्टोबर

आज रात्री सभासदांकरिता Concert होतें. तें होत असतांना किती शांत व चूपचाप होते चोहोंकडे ! टाचणी पडलेली देखील कळली असती. त्यांचा तो सामुदायिक शांतपणा पाहिला म्हणजे आमच्या-कडील नाटकाच्या वेळी होणाऱ्या हुल्लडी–गडबडीचें वाईट वाटते. चूप बसा म्हणून ओरडणें, भांडणें, कधी कधी मारामारीचे प्रसंग सार्वजनिक जागीं होणें लांच्छनच नव्हे का ? ह्या गोष्टी आम्ही कधी शिकणार ? प्रत्येकानेंच सामुदायिक शिस्त अंमलात आणली तर कितीसा वेळ लागणार आहे !

## ७ ऑक्टोबर

आज संध्याकाळीं माझे 'Rural Women of India' ह्या विषयावर व्याख्यान झाले. हिंदुस्थानी बाई बोलणार होती, ह्या कुतूहलानें खूप गर्दी झाली होती. व्याख्यान फारच छान झालें. Most charming असें Miss Christich, Secretary Great Britain ह्या म्हणाल्या. आणखी कांही जणी excellent म्हणून म्हणाल्या.

## ८ ऑक्टोबर

आज सकाळीं सभा होतीच, पण माझ्याभोंवतीं वृत्तपत्रकारांची, व मुलींची गर्दी झाली. सगळ्यांना माझें शिक्षण, सामाजिक कामगिरी, हिंदुस्थानी स्त्रीचें जीवन, हिंदु-मुसलमान, अस्पृश्य, सती वगैरे माहिती हवी होती. कोणाला Autograph (सही,) तर कोणाला पत्ता, तर कोणाला फोटो हवेत, अशी सारखी गडबड चालली होती.

नंतर एक अमेरिकन वृत्तपत्रकार माझ्या मुलाखतीस आली. माझें कालचें भाषण व वरील सर्व माहिती ती Boston येथील वर्तमानपत्रांत छापणार होती. ही मुलगी व आणखी दोन यूगोस्लाव्हच्या (बहिणी) मुली सारख्या माझ्याबरोबर असत. तेथें असेपर्यंत त्यांची व माझी फारच मैत्री

होती अगदीं. ह्या मुलीनी माझ्याबरोबर स्वतःचा फोटो काढून घेतला. फोटोनंतर त्या तिघीना मी एका मोठ्या Cafe मध्ये घेऊन गेलें. आम्ही सर्वांनी मिळून तेथें कॉफी घेतली. नतर त्या सर्वांना मी प्रेमाचा निरोप दिला. प्रेम सहवासाचें, त्या कोण, मी कुठली राहणारी; पण एकमेकींना फारच लळा लागला. ११ ला दुपारी घरी आल्यावर आम्ही कुपारी हॉटेलमध्यें राहणाऱ्या सर्व ग्रेट ब्रिटनच्या लोकांचा फोटो काढला. फोटोग्राफरला हिंदुस्थानी साडी इतकी आवडली, की त्याने माझे त्या साडींत आठ Posesचे फोटो घेतले. एक झेकोस्लोव्हाक् मनुष्य आला व म्हणाला, " If you do not mind may I please see your pretty costume "? मी म्हटलें पहा त्यात काय हरकत आहे. Oh, how pretty! हिंदुस्थानांतच ही बनते का म्हणून त्याने विचारलें.

आज रात्री Imperial Hotel मध्ये Yugoslav Government चें आम्हांस मोठे Reception होते. प्रत्येक जण सुदर पोषाख, तऱ्हतऱ्हेचे अलंकार, उत्तमोत्तम शृगार करून आली होती. काळा, पारवा, हिरवा, जांभळा, एकूण एक रंग दिसत होता तेथें. आणि देशदेशच्या कलाकुसरीच्या, कारागिरीच्या कामाचें तें एक प्रदर्शनच होतें म्हणायचें. एककीची सुदर केशरचना, गुलाबी गाल, रेखीव भुवया, गालांवरील मंजुळ स्मित, फारच रमणीय दिसत होते सर्व. जिकडे तिकडे आनदाचे वातावरण होतें.

गोरीपान उघडी अंगे, त्यांवरील रगीबेरगी पोषाख, विद्युत्प्रकाशांत सर्व खुलून दिसत होते. भिंतीला जागोजागी आरसे, त्यामध्ये पडलेलें रमणीय प्रतिबिंब, आपलें रूप पुनःपुन्हां मुरडून पाहण्याची युवतीची लकब, न जाणो कदाचित् कोठे नक्षी बिघडली की काय असे भासवीत होते.

नतर एका प्रशस्त, सुशोभित अशा हॉलमध्यें आम्ही उभ्या राहिलों. दुतर्फा, एकामागून एक यूगोस्लाव्ह मुली व बायका त्यांच्या चित्रविचित्र रंगांच्या राष्ट्रीय पोषाखांत आल्या. त्यांच्याबरोबर नाचण्यांत भाग घेण्यासाठी ५–६ पुरुष पण आले. हा नाचाचा देखावा कांहीसा आमच्याकडील, गोपगोपींच्या रासक्रीडेप्रमाणें वाटला. नाचाकरितां Orchestra सुरू झाला. आनंदाचें साम्राज्य चोहींकडे पसरलें. हृदयामधील आनंदोर्मी उचंबळून यावयास लागल्या. आणि त्या वाद्यांच्या झंकारावर व आनंदाच्या साथीवर,

ह्या यौवनभरानें ओथंबलेल्या तरुणीचा नाच सुरू झाला. त्यांची हंसरीं तोंडें, मोहक रूपे, आम्हांला डोलवीत होती. किती आनंदात होतो ह्या क्षणास आम्ही ! गाण्याची लकेर, चित्त थरारून सोडणारा वाद्यांचा नाद आणि त्या सुदर युवतीचें नृत्य—इंद्रसभेचीच साक्ष पटवीत होते. लहान मोठ्या सर्वच घटकाभर ह्या बालिकात समरस झाल्या. आणि खरेंच अशा सर्व जणी मिळून असा प्रसंग पुन: कधी येणार होता काय? मला तरी आजचें हे Reception अतिशय आवडले. असेच किती तरी वेळ चालावें असे वाटले, संपू नये अगदी. नतर स्त्री-पुरुषांचा पुन: इंग्लिश पद्धतीचा Ball Room Dance झाला. ह्यानंतर मदिरापान व अल्पोपाहार झाला. गप्पा मारायला, मनमुराद बोलायला सर्वांना भरतें आलें होतें जसें. येथेंच यूगोस्लाव्हियाची Minister of Foreign Affairs ही भेटली. तिला हिंदुस्थानी साडी इतकी आवडली, की येथल्या येथे मी ती घटकाभर नेसते व फोटो काढून घेते असा आग्रह करूं लागली. तिला दुसऱ्या दिवशीं सकाळीच यायला सागून रवानगी केली तिची एकदाची. थोड्याच अवधीत तिची व माझी गट्टी जमली. 'पैसे जमले की मी हिंदुस्थान पाहायला येणार' इतकी मला तुमचा देश पाहण्याची उत्सुकता आहे असे ती म्हणे. असो. रात्री ११ वाजता हा रमणीय समारभ संपला. एकमेकांचे निरोप घेतले; आणि घरी जाण्यास निघालो आम्ही. सुख म्हटलें, की त्याच्या पाठोपाठ दु:ख असायचेच. माणसे जोडताना नेहमीच बरें वाटते, पण तोडणे कठिण असतें. Parting is always very sad असें त्या म्हणत.

## ९ ऑक्टोबर १९३६ : यूगोस्लाव्हियास रामराम

आज सकाळी डुबरव्हनिक सोडावयाचें होतें. भराभर सर्व तयारी केली जाण्याची. जाईपर्यंत लोक हिंदुस्थानी बाईचे फोटो घेतच होते. ११ ला बोटीजवळ आलों. डेकवर त्या कालच्या समारभाच्या Minister of Foreign Affairs ह्या बाईबरोबर (ती साडी नेसलेली असा) फोटो काढला. मैत्रिणींना निरोप दिले. ह्यांच्याच प्रेमळपणांत माझे १०–१२ दिवस चांगले गेले. त्यांनी मला एकटें ठेवलें नाही. मी गुलाम राष्ट्रांतील म्हणून माझी अवहेलना केली नाही. उलटे कांकणभर जास्तच कौतुक हिंदुस्थानी

स्त्रीचें झालें. ह्याही दैन्यावस्थेंत हिंदुस्थानची कीर्ति, मान, परदेशांत आहे हें पाहून माझ्या मायदेशाचा मला जास्तच सात्त्विक अभिमान वाटला. ‘ काप गेले तरी भोंक आहे ना ’ काप मिळतील पुन:. मनुष्य परिस्थितीच्या फेऱ्यांत असतो एवढेंच.

पोहोंचवायला आलेली मंडळी हातानें प्रेम व्यक्त करीत होती. आमची प्रेमरज्ज, बोट तोडीत होती. तेव्हां ‘यथा काष्ठं च काष्ठं च समेयातां महौदधौ’ ह्या वाक्याची मला खात्री पटली. आतां पुन: कधी तरी हीं माणसें भेटतील काय, येथे कशाला कोण पुन: जाणार !

डॉक्टर काशीबाई नवरंगे ह्या पण माझ्याच बरोबर होत्या. त्या व मी सारख्या गप्पा मारीत होतो. जेथे त्या तेथे मी असें व्हायचें आमचें. संध्याकाळी सूर्यास्ताच्या सुमारास डेकवर आम्ही उभ्या होतों. इंग्लिश बायका ह्या सृष्टिसौदर्यास पारख्या. सूर्य उगवणें-मावळणें व त्याची रमणीय शोभा त्याना क्वचितच दिसायची. आणि म्हणूनच हें पाहण्यास त्याचा जमाव लुटला तेथे. आम्हांला ही दोन्ही दृश्ये, रोजचीच दिसतात. तरी पण हीं रूपें पाहण्यांत रोजचीच नवी गोडी असते. सागराचें नीलवर्ण पाणी, स्वच्छंदानें खेळणाऱ्या चंचल लाटा, त्यावर सोनेरी अल्लड किरण पडल्यामुळें अतिशय मोहक दिसत होते. आकाशांतील, गुलाबी लालसर रंग, पतिमीलनाखातर, सृष्टिसुदरीचा मुग्ध आनंद दर्शवीत होता. दिवसभराच्या कामानंतर दमून भागून आलेल्या पतिदेवाची हिंदुस्थानी स्त्री असेंच मुग्धपणानें स्वागत करते. तिचें ते प्रेम दृष्टीत, गालांवर आणि वागण्यांत दिसतें. केवळ बोलूनच दाखवावें लागत नाही. हिंदुस्थानी प्रेम पाश्चात्य प्रेमपद्धतीच्या कसावर घांसून पाहावयाचें नसतें ! त्याला हिंदुस्थानीच चष्मा लावावा लागतो. होय आणि म्हणूनच आमची उज्ज्वल बाजू दिननाथ ह्या गौरयुवतींना दाखवीत होता. ह्या बायकांच्या गोऱ्या तोंडांवर सूर्यप्रकाश पडल्यामुळें तीं फारच सुरेख दिसत होती. खालीं धीरगंभीर सागर, पलीकडे तटस्थ बसलेले काळेभोर गिरिराज, पश्चिमेकडील दिननाथाचें गृहगमन पाहून, मानवी मन आनंदीत होई; आणि स्वत:च्या स्त्रीवर पतिराजाचें सात्त्विक प्रेम असलें, म्हणजे काम संपल्याबरोबर कधीं एकदां आपल्या जोडीदारणीला प्रेमभरानें पाहतो असें दिननाथाच्या झपाट्यानें खालीं खालीं

जाणाऱ्या गतीवरून नाही का वाटत ? आणि हें श्रमानंतरचें स्वतःच्या घरांतील बसणें-बोलणें, जगांतील इतर करमणुकीपेक्षां किती तरी पट उत्तम आहे. सर्व दुःखें, शीण ह्या प्रेमळ स्वागतानें दूर होतील असे नाही का? हो आणि म्हणूनच तो तेजःपुंज गोल आमच्या दृष्टिआड झाला.

रात्रीं ९ वाजता आम्ही ब्रिटिश Delegates, Split येथेच उतरणार होतों. काशीबाई उतरणार नव्हत्या. त्यांना सोडायचें म्हणून मला फार वाईट वाटले. काशीबाईंची व माझी दोस्ती येथेंच फार जमली. हिंदुस्थानांत फारशी नव्हती; पण परदेशांतच प्रेम फार जुळतें. गांवचेच कशाला हवें. दुरून जरी काळ्या रंगाचें कोणी दिसलें तरी रंगसादृश्यानें आपलेपणा वाटतो. 'आपण गेलात की काशीबाई माझे कसे होईल' असें मी त्यांना म्हणें. अखेरीस आमचें Split आले, आणि त्याना सोडावेच लागलें मला. बोट दृष्टिआड होईपर्यंत मी त्यांना पाहात होतें अगदीं. Lady Emmot ह्या व त्याची मुलगी Hon. Mrs. Peel ह्या फारच चागल्या असत. काशीबाईची जागा त्यांनी घेतली. माझा हात धरून Lady Emmot मला सगळीकडे नेत. पायीच आम्ही Hotel Belveue मध्यें गेलों. किती भव्य, स्वच्छ व सुदर होतें हे. भितीतून व जमिनींतून प्रतिबिंब दिसे अगदी, इतकें स्वच्छ होतें चोहीकडे. यूगोस्लाव्हियांत सूर्यप्रकाश असल्यामुळें इंग्रज येथें हवेसाठी व प्रकाशासाठी येत.

## १० ऑक्टोबर

सकाळी चहानंतर आम्ही येथील शेतकरी बायका गालिचे, विणकाम वगैरे करतात त्याचे कारखाने बघण्यास गेलों. हें सर्व दाखविण्यास गांवच्या प्रमुख बायका आल्या होत्या. पाऊस सारखा पडतच होता. कारखान्यांत गेल्यावर, तेथील बायका कुतूहलानें, मला कोट काढून टाका म्हणून म्हणू लागल्या, पोषाख पाहायचा होता त्यांना माझा. मगळसूत्र, कुंकू वगैरेंची माहिती विचारली त्यांनी मला. हिंदुस्थान कलाकुसरीच्या कामाबद्दल प्रख्यात आहे तेव्हां येथील काम काय त्याच्यापुढें, असें त्या म्हणाल्या. होय. कलाकुसरीचें काम हिंदुस्थानसारखें जगांत कोठेंच होत

नाहीं. ज्याची परिस्थिति चांगली नसते तेथेंच हुषारी जास्त असते. आम्ही हल्लीं दैवाच्या फेऱ्यांत आहोंत तेव्हा सगळें व्यर्थच आहे.

असो. नतर आम्ही येथील वस्तुसंग्रहालय पाहण्यास गेलों. मग जुनी देवळें पाहिली. तेथेही पुनः भर थडीत, कोट काढून दोन फोटो काढले. नंतर मोटारीत बसून आम्ही सर्व जणी, गांवाबाहेरील रोमन राज्याचे जुने अवशेष व कोरीव काम बघण्यास गेलों. रोमन लोकांना आपली बायकापोरे घेऊन कसे इंग्रजांना भिऊन पळून जावे लागत आहे ह्याची चित्रें होती. दुसऱ्याच्या घरांत काही झाले तरी कायमचे थोडेंच राहतां येतें ? केव्हा ना केव्हां तरी यांना असेच पळून जावें लागणार ह्यांत शंका थोडीच आहे ! असो. परराज्याच्या चक्रांत सांपडलेलें आपल्यासारखें कोणी तरी आहे हें पाहून हायसें वाटलें. ह्याच्यांतून कोणी सुटलेलें नाही. जगांत प्रत्येकाला चक्रनेमिक्रमेण सुखदुःखें आहेतच. कोणी कोणाला नावें ठेवायला नकोत. खरे पाहिलें तर हिंदुस्थानची सर्व लोक स्तुतीच करीत होते. प्रत्येकाला हिंदुस्थानासबधी अभिमान व आदर होता. महात्मा गाधी, कविवर्य टागोर हे तर सर्वांच्या परिचयाचे. ताजमहाल पाहण्याची सर्वांची तीव्र उत्कठा. माझ्या हिंदुस्थानला कोणी कोणी देखील नावे ठेविली नाहीत. यूगोस्लाव्हियाच्या बायकांनीं तर माझें फारच कौतुक केलें. झेकोस्लोव्हाकिया, अमेरिका येथील लोकाची पण अत्यंत सहानुभूति होती. मला मात्र आमच्या गुलामगिरीचे पदोपदीं दुःख वाटे. सर्व बायका स्वतत्र, मीच गुलाम आहें. गुलामगिरीसारखें दुसरें दुर्भाग्य नाही. खूप मेहनत करून देश सुधारल्याशिवाय कांही चांगले दिवस दिसायचे नाहीत असें मी पक्कें मनाशी ठरविलें.

असो. नंतर आम्ही घरी आलों. जेवण झाल्यानंतर बाकीच्या बायका पुनः गांव बघण्यास गेल्या. मी घरीच राहिलें. येथील काही प्रमुख बायकांची व माझी थोड्याच अवधीत मैत्री जमली होती. ह्या चौघी जणीना साड्या नेसून आपले दागिने, बांगड्या घालून, कुंकू लावून फोटो काढायचा होता. त्या २॥ वाजतां माझ्याकडे आल्या. आपल्या पातळांमध्यें त्या किती सुदर दिसल्या, फिरत होत्या सारख्या नेसून. नवी मुलगी साडी नेसायला लागली म्हणजे कशी ती सारखी साडीच्याच नादांत असते. तसेंच त्यांचें होई.

पदर टिकायचा नाही, तर मधूनच सुटून जाण्याचें भय. असो. फोटोनंतर Cafe मध्यें त्यांनी मला चहाला नेले. नक्षीच्या कामाची एक पावडरीची डबी सगळ्यांचीं नांवें घालून मला दिली. आज आम्हाला Split सोडायचें होतें. म्हणून माझ्याबरोबर त्या माझ्या चौघी मैत्रिणी आल्या व म्हणाल्या, 'तुमच्यांत मुके घेतात का?' काय म्हणावें हेच मला कळेना. माझे मात्र त्यांनी भराभर मुके घेतले. देशदेशचे प्रेम व्यक्त करण्याचे नमुने; कशाला आडकाठी करा त्याना. आम्हाला एकमेकीना सोडवेना अगदी, पण बोटीची वेळ झाल्यावर थोडीच ती राहणार आहे.

## ११ ऑक्टोबर

आम्ही सकाळीं ५ वाजतां Susak (हे यूगोस्लाव्हियाचे सरहद्दीवरचें अखेरचें ठिकाण आहे.) येथे आलो. पाऊस पडतच होता. ८ वाजतां Continental Hotel मध्यें गेलों. Lady Emmot, Hon. Mrs. Peel ह्यांच्याबरोबर मी आदितवार असल्यामुळें चर्चला गेले. ह्यांची देवळें कशीं असतात तेंही दिसेल व घरी तरी एकटे बसून काय करावयाचें होतें. सुशाक हें माणसानें गजबजलेले, गरीब असें दिसलें. सर्व देखावा हिंदुस्थानप्रमाणें दिसला. रोडके घोडे, बावळे लोक वगैरे. समुद्रकाठी पायींच फिरत फिरत हॉटेलमध्ये आलों. १२ ला जेवून एक लहानसा पूल ओलांडला. तेथूनच इटलीची हद्द सुरू झाली. मोठ्या तांबड्या मोटारीत बसून आम्ही Trieste ला जाण्यास निघालो. हवा बरी होती. ड्रायव्हर अतिशय जोरानें गाडी चालवी. इटलीचें सृष्टिसौंदर्य सूर्यप्रकाशानें छान दिसत होतें. एका बाजूस अफाट अड्रियाटिक समुद्र, एका बाजूस हिरवीचार झाडी असलेले पर्वत व दोन्हींमधून नागमोडी रुंद रुंद रस्ते, टेकड्यांवर टुमदार दाट रंगाचीं नवीं नवीं घरें छान दिसली. इटली घाणेरडी वाटली. ह्याप्रमाणें हें ३०–४० मैलांचें अंतर तोडीत स्टेशनवर आम्ही तीनच्या सुमारास पोहोंचलों. गाडी पांच वाजतां होती. म्हणून सर्व जणी पायींच गांवांत गेलों. Cafe त जाऊन छानशी कॉफी घेतली, गप्पा मारल्या व पायींच स्टेशनवर आलों. Trieste अगदीं अफाट पण घाणेरडें वाटलें. एकेक दगडी इमारत भक्कम व टोलेजंग दिसली. आगगाडीपाशीं आलों. कसली जुनाट घाणेरडी गाडी! श्रीमान् स्वतंत्र

देशांतील गाडी अशीच का! मोरी-संडासची घाण येतच होती. म्हटलें हिंदुस्थानच्या थर्डक्लासला नांवें नकोत ठेवायला. आमचे तर प्रवास करणारे गरीब अडाणी लोक. स्वच्छतेची व आरोग्याची त्यांना काय कल्पना? पण हेंच सुशिक्षित देशांतलें पाहिलें म्हणजे नवल वाटते. ह्यांच्या सेकंडक्लासची ही स्थिति. असो. रात्र जसजशी व्हायला लागली तसतशी मला धास्ती वाटायला लागली. कारण सर्व बायका Lussane वरून पुढे पॅरिसला जाणार आणि मग मी एकटीच राहणार. Lussane ला सकाळी ६ ला मी उतरणार होतें. माझ्या मैत्रिणींनी गार्डाला माझ्याकडे लक्ष ठेवण्यास सांगितलें, व स्टेशन येण्यापूर्वींच जरा सुचविण्यास सांगितलें होतें. कांहीं काळजी करूं नकोस असें सांगून व्हेनिसला त्या Sleepers मध्ये गेल्या. किती प्रेमानें वागायच्या ह्या सर्व माझ्याशी? बाहेरच्या लोकाचें माझें तेव्हांच जमे. एवढ्या बाबतींत मोठेंच नशीब होतें म्हणायचें. ह्या माझ्या मैत्रिणींना सोडल्यानंतर जवळजवळ सर्व रात्र मीं जागूनच काढली. गाडी स्टेशनवर दोनच मिनिटें थांबते. सामान आपणच उतरायचें. भाषा येत नाहीं. इकडील नाणें देखील चांगलेंसें कळत नाहीं. आपल्याला कुणी फसवील काय? नंतर पहांटेच मीं दाराजवळ सामान आणून ठेविलें. दार उघडतां येतें कीं नाहीं म्हणून नीट उघडून पाहिलें. दर स्टेशनागणिक पाटी वाचावी, असें चाललें होतें.

---

# प्रकरण चौथें

## स्वित्झर्लंड देशांत

### १३ ऑक्टोबर १९३६

सकाळी ६ वाजतां आलें एकदांचें Laussane (स्वित्झर्लंड) आणि मी नीट खाली उतरलें. खरें पाहिलें तर काळजी करण्याचें कांहीच कारण नव्हतें. दर स्टेशनवर Wagons-Lits चे इंग्लिश जाणणारे Porter असतातच, आणि आमच्या देशाप्रमाणें—बायका म्हणून—कोणी सहसा फसवील अशी परिस्थिति नसतेच. ह्यावरून मला एका गोष्टीची आठवण झाली. माझी एक मैत्रीण यूरोपमध्यें ३–४ वर्षे शिक्षणानिमित्त राहून आल्या होत्या. त्या व मी कॉन्फरन्सकरितां पाटण्याला जमलों. एका रात्री सभागृहांतून निवासस्थानीं त्यांना एकटेंच जाण्याचे भय वाटू लागलें. मी म्हटलें, यूरोपांत तुम्ही एकटचा प्रवास करावयाच्या आणि येथें स्वदेशांत तुम्हाला भय वाटतें? आणि तें अगदी खरे. आमच्या इकडे दिवसां एकटें जाण्याचें भय मग रात्रीचें नांवच नको काढायला मुलीनी, बायकानी मोकळेपणानें हिडण्यासारखा आहे का आमचा देश सुरक्षित? टक लावून पाहणें, पाठलाग करणें, आणखी कित्येक अनन्वित प्रकार करणें, आमच्या देशांत सरसहा चालू असतें.

असो. सकाळीं सात वाजता मी झूरिकला (Zurich) जाणाऱ्या गाडीत बसलें. येथून ती सरळच तेथें जाणार होती. म्हणून गाडी बदलण्याची वगैरे फारशी काळजी नव्हती. Swiss Railway फारच छान होती. बसण्याची जागा सुखकर, स्वच्छ होती. गाडीचा वेग पण खूप होता. बाहेर निसर्गाची शोभा पण खूप सुदर होती. मधून मधून सरोवरें, बाजूची हिरवीचार झाडी, गवताची कुरणें, त्यावरील रुपेरी बर्फाचे जाळीदार रुमाल फारच सुरेख दिसत होते. १० वाजतां मी झूरिकला पोहोचलें. स्टेशनवर Central Hotel चा मनुष्य होताच. त्याच्याबरोबर मी Hotel मध्यें गेलें. मी येण्यापूर्वीच हे हॉलंड, जर्मनी वगैरे गांवी कारखाने पाहून झूरिकला काम करण्यास आले होते. मी येथें आलें. त्या वेळेस हे कामावरच गेले होते

तरी पण त्यांचे सामान खोलीत दिसलें. विरही अंतःकरणाला आपलेपणाची साक्ष पटली. आणि माझी एकटी राहण्याची हुरहूर गेली. आणि आज त्यांच्या जिवावर मला कसलीच भीति म्हणून वाटत नाही.

१ वाजतां जेवणाच्या वेळेस हे आले. आमचें हें हॉटेल किती लख्ख, किती चकचकीत, सर्व सुखसोयींनी परिपूर्ण होतें. जिकडे पाहावें तिकडे तोंड दिसे. भिंतींचे रंग, पडदे, फोटो, गालिचे सर्व एकमेकांना शोभणारे. सगळीकडे धोब्याचे लख्ख कपडे, पलगाजवळ देखील टेलिफोन. चहा, कॉफी, जेवणाचे पदार्थ अतिशय स्वच्छ, सुरेख व अगदी ताजे कढत असे मिळत. येथील अन्न, दूध, लोणी फारच चागलें असे. असो. आम्ही दोघेच येथें होतों. मुलगी ह्या गंमतीस अंतरली म्हणून चैन पडेना. पुष्कळ वेळां तार करून तिला विमानानेच बोलवून घ्यावे असें आम्हां दोघांनाही वाटे. पण एकटीच कशी आणायची म्हणून मोठ्या कष्टानें तो नाद सोडला. प्रेम वेडें म्हणतात तेंच खरे. आईबापाचे प्रेम किती थोर असतें, निःस्वार्थी असतें, हें तसें झाल्यावाचून नाहीच कळावयाचें. 'आईचें दिव्य प्रेम आई झाल्याशिवाय कळत नाही.' माझ्या आईवर ती तरुण वयांतच विधवा झाल्यामुळें आमचें फारच प्रेम आहे. आणि तें आमची मुलगी शाळेकरिता म्हणून दूर ठेवावी लागली तेव्हां तर फारच वाढलें. आई व मुलाचा संबंध किती निकटचा असतो. कविवर्य गडकरी म्हणतात ना 'ज्यांना आईचें प्रेम माहीत आहे अशांनाच तें कळेल मी दुसऱ्यांना तें सांगत नाहीं.' आणि ऐन तारुण्यांत विधवा झालेल्या, ऐश्वर्याच्या शिखरावरून गाढ अधःकारांतील दरींत लोटून दिलेल्या आईवरचें प्रेम ज्यांची आई अशी आहे त्यांनाच कळेल ! असो. माझी चबी आमच्या दोघामधील प्रेमाचा अभेद्य दुवा आहे; आमच्या प्रेमाची ती पक्की गांठ आहे. दोघांचें रूप-गुण, त्यांचें हुबेहूब चित्र आपल्या मुलांत दिसतें, म्हणूनच ती आपल्याला इतकी आवडतात.

## १४ ऑक्टोबर

आज सकाळीं ७ वाजतां आम्ही दोघे आगगाडीनें Lausanne ला गेलों. तेथून १०॥ वाजतां इलेक्ट्रिक आगगाडीनें २–३ तासांत पोहोंचणाऱ्या एका गांवास गेलों. आमच्याबरोबर Swiss Federal Railway चे तिघे इंजिनियर होते. स्वभावानें फारच चांगले होते ते.

पर्वताची शोभा किती पाहिली तरी तीत रोजची नवी मजाच वाटे. जागोजागीं बीटच्या गाड्या भरून पडल्या होत्या. जवळच साखरेचा कारखाना होता. एक वाजतां Stationवरील Buffet मध्यें सर्वांनीं खाल्ले. स्विस अन्न फारच चागले लागे. त्यात तऱ्हाही असत पुष्कळ. श्रीमंती पण असे. आम्हांला फार आवडत असे. इंग्लिश अन्न अगदीच साधें, नुसतें उकडलेलें. मीठ, मिरी लावून चव उत्पन्न करावयाची त्याला. नुसते उकडलेले बटाटे, ती रोटी, दूध, आणि चहा; फारच भूक लागली म्हणजे आपल्या छान छान पदार्थांची नामावळी जपायची. तोंडाला पाणी सुटायचें अगदी. आम्ही परत आगगाडीनें एका स्टेशनवर आलों. नंतर झूरिकच्या गाडीत बसलों, व ह्या स्विस् रेल्वे इजिनियराना मोठ्या प्रेमानें निरोप दिला. ५ वाजतां झूरिकला पोहोंचलो. कॉन्फरन्समध्ये ओळख झालेली स्वित्झर्लंडची सभासद Mrs. Anna Murset ही माझी वाट पाहात बसलीच होती. तिनेच पुढें मग स्वित्झर्लंडमधील सर्व प्रमुख कार्यकर्त्या बायकाची ओळख करून दिली; तिच्यामुळेंच सर्व संस्था बघायला मिळाल्या व माझी व्याख्यानें तिनेच करविली.

## १५ ऑक्टोबर

आज सकाळी १० वाजतां Mrs. Muriel Hignaur ह्या मला येथील संस्था दाखविण्यासाठी आल्या. शेतकरी व गरिबांच्या बायकांना प्रसूतिपूर्वी स्वत.ची काळजी कशी घेतात, व नंतर लहान मुलांना कपडे पुरवणें, त्यांची व्यवस्था कशी ठेवायची हें शिकविणें, ह्या गोष्टीची संस्था पाहिली. तिघी बायका हें सर्व काम शिकवितात. येथील मुख्य बाई मोठ्या प्रसिद्ध डॉक्टरांच्या पत्नी आहेत. त्यांनी आमच्या शेतकरी बायकांची मला माहिती विचारली. स्वित्झर्लंडमध्यें संततिनियमन करण्याची पद्धत फारशी नाहीं. पण बायका डॉक्टरकडून गर्भपात फार करवून घेतात. हें फार वाईट आहे. हिंदुस्थानांत हें फारसें नाहीच, पण आम्ही संततिनियमन अंमलांत आणण्याची खटपट करीत आहोंत. यानंतर तिनें आपल्या मोटारींतून आणखी कांहीं संस्था पाहण्यास नेलें. ' बेकायदेशीर मुलांचें ' घर पाहिलें. हें १८९६ सालीं सुरू केलें. आज तेथें ४० मुलें होतीं. किती छान व्यवस्था होती

त्यांची ! प्रत्येक वस्तु अगदी चित्रासारखी व्यवस्थित ठेवलेली होती. खिडक्या, दारें, फर्निचर सर्व चमकत होतें. लांकडी जमिनी झाडून पुसून स्वच्छ. सर्व धोब्याचे कपडे. आणि ही संस्था धर्मादायावर कशी चालते हेंच मला कळेना. एका जागी बिचारी पतित आई डोळ्यांमध्ये अश्रु आलेले, व आपल्या अर्भकाची काय वाट लावायची अशा दुःखी व सद्गतित अंतः-करणानें गांगरून गेलेली असा फोटो टांगला होता. त्या आईला ही संस्था म्हणजे किती आसरा वाटत असेल ! त्या गोऱ्या गोंडस निष्पाप बाल-कांना पाहून मला वाटलें जेथे नको तेथे देव देतो. हो, पण इकडेच तीं जन्मली म्हणून पायदळी तुडविली जात नाहीत. आमच्याच देशांत, त्यांच्या गळ्यांना आईचें, ती घाबरून जाऊन, नख लागून, परमेश्वराजवळ रूढीच्या भीषण जाचाची दाद मागण्यास ती गेली असती. अथवा कांट्यांत पडून पोलिसाकरवी त्यांच्या हालअपेष्टा झाल्या असत्या, विधवेच्या परित्यक्ता कुमारिका ह्याच्या जीवनावर समाजानें टीकास्त्र सोडले असतें. किंवा मिशनरी डॉक्टरणीकडून त्यांचा जन्म झाला असतां आणि तीं हिंदुधर्मांत वाली नाही म्हणून 'शरणपुरां'त रवाना झाली असती. असो. माझ्या मनांत मात्र खळबळ उडाली होती. ह्यांचें काम कसें सुरळीत होतें. भांडण नाही. वांकडीनासकी बोलणी नाहीत. कोणाला हाणून पाडण्याचे उपाय पण कोणी योजीत नाही. प्रत्येक जण सरळ आपापलें काम करते. कशा सर्व आनंदात आणि कर्तव्यतत्पर आहेत; आणि म्हणूनच आज अव्याहत त्यांच्या संस्था सरळ चालल्या आहेत. असो. तेथून आम्ही Rescue Home मध्ये गेलों. येथेंही १४–१५ वर्षें वयापासून २५–२६ वर्षांपर्यंत वाईट वर्तनाच्या मुली आहेत. पोलिस, म्युनिसिपालिटी व पालक अशा मुली येथें लावून देतात, त्यांना तेथे तऱ्हतऱ्हेची कामे शिकवितात, व नंतर नोकऱ्या लावून देतात किंवा लग्नें करून देतात. येथेंही स्वच्छता, टापटीप छान होती. सर्व कामें, स्वयंपाक सुद्धां ह्याच मुली करीत. हे सर्व बघून झाल्यावर ह्या माझ्या स्विस् मैत्रिणीना मी एका मोठ्या हॉटेलमध्यें जेवण्यास घेऊन गेलें. नतर दुपारीं २ वाजतां येथील एका प्रसिद्ध बॅरिस्टरची बायको माझ्या-साठीं स्वतःची मोटार घेऊन आली. तीमधून तिनें मला बायकांचा, प्रमुख बायकांनीच पैसा गोळा करून स्थापन केलेला, दवाखाना दाखविला.

हा नुकताच बांधला होता. येथें डॉक्टरणीच सर्व काम करीत. दवाखान्यांत सर्व आधुनिक सुखसोयी. बांधणी अगदीं हल्लींची. रग निळा. फर्निचर अगदीं कोरें. जिकडे तिकडे सर्व चमकत होतें रोग्याला जितक्या तऱ्हेनें सुखी करतां येईल, तितक्या सोयीची पराकाष्ठा केलेली होती. इमारतीत सूर्यप्रकाश येण्याची छान व्यवस्था होती. बाहेर झाडी, हिरवी-चार मैदानें हें सर्व पाहून येथें दुखणें तावडतोब पळून जाईल असें वाटलें. स्वच्छता व टापटीप ह्यांत स्विस् लोक चांगलाच वरचा क्रमाक मिळवितील. शस्त्रक्रिया करण्याची जागा तर नवनव्या आधुनिक शस्त्रांनी, व यंत्रांनीं चमकत होती. इतका चकचकाट व जागजागची अप्रतिम स्वच्छता कोठेंच पाहिली नाही. नुकतीच जन्मलेली मुलें ज्या खोलीत होती तेथे परिचारिका, डॉक्टरिणी वगैरेंशिवाय कोणी जायचें नाही. Surgically Clean असा त्याचा अर्थ. आमच्याकडे देखील बाळंतिणीच्या खोलीत जाण्यास पाय धुऊन जावें लागते. दहा दिवस बाळंतीण अस्पृश्य समजली जाई. ह्या गोष्टीत तथ्य होतेंच; पण अशा दृष्टीनें कोणी आमच्या गोष्टीकडे पाहील तेव्हांच ना? हेंच स्विस् लोकांचे चागलें म्हणून आम्हीं म्हटलें. पण पतित गुलाम देशाचे कोण भले म्हणणार, उलट आमच्यांत अठरा विटाळ आणि सतरा सोंवळी म्हणून आम्ही आम्हांलाच नांवें ठेवून घेतो. असो. स्त्रियांच्या सुखासाठी स्त्रियांनीच खटपट करून हा बांधला, त्याबद्दल सर्व स्त्रीजात त्यांना दुवा देईल. नंतर दवाखान्याचें स्वयंपाकघर पाहिलें. किती तरी यंत्रें होतीं तेथे. विजेच्या चुली, जिकडे तिकडे लख्ख, फ्रिजिडेअरमध्यें फळें, भाज्या, दूध, लोणी थंड करीत ठेवलें होतें. अन्न नेण्यासाठीं चाकाच्या गाड्या, लिफ्ट्स् वगैरे सोयी. त्यांचा थाट कोणीकडे!

नंतर परिचारिकेचें वसतिगृह पाहिलें. उत्तम फर्निचर, पियानो, जिमनॅशिअम् अशा सर्व सुखसोयी होत्या. त्यांच्या सुदरशा दिवाणखान्यांत त्यांनीं मला चहापार्टी केली. बोलतां बोलतां हिंदुस्थानासंबंधीं किती तरी त्यांनीं मला प्रश्न विचारले. नीट उत्तरें मिळाल्यावर चुकीच्या समजुतीचें निराकरण झालें व त्या काढून टाकल्या.

चहा घेतल्यावर बॅरिस्टरीणबाईंनीं पुनः मला मोटार दिली. सरोवरा-

वरून व गांवाबाहेरून मी व Mrs. Hignaur खूप हिंडून आलो. देखावा फारच रमणीय होता. डोंगरावरील टुमदार छोटेखानी बंगले, नजर फेकावी तिकडे हिरवेचार, मधून मधून उच पाईन वृक्ष, आणि म्हणूनच देखावा शोभिवत वाटला. वाटेंतच एका स्विस् घरी गेलों. त्या बायकांनी पण माझे खूपच स्वागत केलें. चहा-फराळाचे दिले. म्हटलें हें सर्व अगत्य आम्हां हिंदुस्थानी लोकांप्रमाणें आहे; जात चाललें तें आतां परकीयांच्या अंधानुकरणानें. हल्ली ज्याचे त्यालाच रोजचें उकडून खाणेंच कष्टाचे झालें मग आल्यागेल्याचे कोण करतो? अगत्य तर जाऊंच द्या, धड प्रेमानें, आपुलकीनें बोलायला राजी नाही कोणी!

## १६ ऑक्टोबर

आज सकाळी पुन: ह्याच बायका मला दुसऱ्या संस्था दाखविण्यास घेऊन गेल्या. गिरणीत किंवा इतर जागी कामावर जाणाऱ्या गरीब आयांच्या मुलांचें घर Cresche पाहण्यास गेलों. आया सकाळी ६। ते रात्री ८ पर्यंत मुले तेथें ठेवतात. एक फ्रँक दर मुलामागे त्या देतात. संस्थेस दोन फ्रॅंक खर्च पडतो. मुलाना दूध, उत्तम खाणें, आंघोळ, दांत घांसणें, औषधपाणी व शिक्षण देणे अशी कामे करतात. ह्यांच्या गरीब मुलांची व्यवस्था म्हणजे आमच्या श्रीमंतांची नसेल. ती मुलें गुटगुटीत तरी किती दिसलीं. यूरोपमध्ये मूल राष्ट्राचे खांब समजतात; आणि म्हणूनच सगळ्यांचीं उत्तम व्यवस्था असते. ह्यानंतर बायकांनी केलेलें काम म्हणजे Temperance, म्हणजे कामकरी लोकांना थोड्या पैशांत दारूविरहित जेवण देण्याची व्यवस्था केलेली आहे. तिसरी गोष्ट म्हणजे, स्विस् शेतकऱ्यांकडून जोडधंदा म्हणून कापड विणणें, लोंकरीचे मोजे, स्वेटर करणें, कांचेचें सामान करणें, असें शिकवून व करून घेऊन दुकानांत विक्रीस मोठ्याच प्रमाणावर ठेविलें आहे. काम फारच सुंदर केलें आहे. अशा तऱ्हेनें येथील बायकांनी ही चांगलीच कामगिरी केली आहे. वरील सर्व संस्था म्युनिसिपालिटी व सार्वजनिक धर्मादायांतून होतात व चालतात. बायकांनीं एवढें प्रचंड हॉस्पिटल बांधावें ही फारच नवलाची गोष्ट आहे.

दुपारी १ ला जेवून आम्ही दोघें Selnan ला ट्रॅमनें गेलों व तेथून

आगगाडीनें Uteliberg ला गेलो हे झूरिकचे सपाटीपेक्षां २,००० फूट उंच असें ठिकाण आहे. वनश्री रमणीय होती. येथे एक उच्च Tower होता.

## १७ ऑक्टोबर

आज शनिवार सकाळी १० ला सरोवरावरून फिरत फिरत जवळच्या बागेत गेलों. सूर्यप्रकाशामुळे सर्व फारच सुंदर दिसत होतें. रूपानें सुरेख व शरीरप्रकृति उत्कृष्ट असलेल्या आया, आपल्या गोंडस मुलांना घेऊन गाडीतून हिंडवीत होत्या. सुरेख बायका, मुले, बाग आणि रम्य सरोवर, त्यात इतस्ततः स्वैरपणाने क्रीडा करणारे डौलदार हंस मनाला रिझविण्याची पराकाष्ठाच करीत होते. लहान मुले नेहमीच गोड वाटतात, पण हीं स्विस् मुले इतकी छान दिसत, आणि नुकतीच वाचा फुटलेल्यांची ती अस्पष्ट किलबिल कानाला फारच मधुर लागे. त्यांचे ते सुदृढ आईबाप आणि तीं गोंडस मुलें बघत राहावीत असे वाटे; आणि त्या मुलांना उचलून पटापट पापे घ्यावेत असा मोह होई. व्हावीत मुले तर हीं अशी. स्विस् बायकांचें सौंदर्य पण बरेचसें नैसर्गिक व थोडें कृत्रिम रंगसौंदर्यसाधनांनीं सुशोभित केलेलें दिसे. अगदी बाधेसूद तनुलता, चंद्रबिंबाप्रमाणें गोरेंपान प्रफुल्ल मुख, बारीक कंबर, रेखीव चित्राप्रमाणें काळ्या भिवयाची तीं वलयें, हरिणीच्या गतीप्रमाणें चालण्याची लकब, पोंवळ्याप्रमाणें शोभणारे व गोऱ्या गालामधील ते लालसर ओठ आणि तो दाट कुरळा केशभार, कोणाचे Permanent Wave, कोणी Blondes, तर कोणी Brunette, किती वेळ तरी तें लावण्य पाहण्यांत दृष्टि खिळून बसे.

१२॥ ला बागेतून घरी परत गेलों. घाईनें जेवून पळतच जाऊन स्टेशन गाठलें. Luzern ला जाण्याच्या गाडीत बसलों. शनिवार असल्यामुळें खूप गर्दी होती. सुट्टी म्हटली की निघालेच लोक बाहेर मजा करायला. स्टेशन नुसतें फुलून गेले होतें. आगगाडीच्या दोन्ही बाजूंनी सृष्टिशोभेची कमाल झाली होती. जिकडे नजर फेंकावी तिकडे हिरवेचार, मऊ मखमलीप्रमाणें दिसे. मधूनच लहानगा चित्रोळा रस्ता, सुंदर युवतींच्या केशभारांतील गोऱ्यापान भांगाप्रमाणें दिसे. मधून मधून एकादें सरोवर लागे. त्यापलीकडे एकापेक्षां एक उंच पर्वतांच्या रांगा दिसत; आणि ह्या सर्व रमणीय

देखाव्यांतून आगगाडी भराभर आम्हांला घेऊन जात होती. अखेरीस ३॥–४ च्या सुमारास लुसर्न लागलें. जगांतील सर्व भागांतील लोक हें पाहण्यास येतात. असेंच सर्व बाजूनी हें रमणीय आहे. आम्ही प्रथम Bahanof Buffet मध्ये चहा घेतला व मग हिंडण्यास निघालों. थोड्या अंतरावरच सरोवर लागलें. त्यामध्ये लहान लहान सुंदर होड्या व जहाजे उभीं होती. कांहीं येत-जात होतीं. थोडें पुढे गेलों तर तेथें उच पाण्याचा फवारा उड-णारें मोठें कारंजे होतें. खूप उंचवर पाणी त्यामधून उडत होतें. फवाऱ्याच्या पलीकडे व सरोवराच्या कांठावर चौघां नवपरिणत वधूवरांचा फोटो घेण्याचें काम चाललें होतें. एक वधू पाढऱ्या शुभ्र सॅटिनच्या पोषाखांत व दुसरी गुलाबी पोषाखांत होती. गुलाबी गाल व गोरेपान अंग अहमहमिकेनें वधूंची शोभा वाढवीत होतें; आणि ही उत्कृष्ट शरीरप्रकृतीची जोडपी संसाररथ हांकण्यास अतिशय अनुरूप वाटली. प्रेमाचा उगम एकमेकाच्या अत्युत्तम शरीरप्रकृतीतच होतो. आमच्याकडे अशी जोडपी औषधाला कांहीं मिळायची नाहीत. समोरील कारंजे, त्याजवळील रूपयौवनसंपन्न वधूवर व पलीकडील नितातरम्य सरोवर एकमेकाची शोभा वाढवीत होते. तरुण जोडप्यांना ह्यापेक्षा आणखी नयनमनोहर देखावा कुठला हवा? ह्या क्षणास .एकच विचार माझ्या मनांत आला, हे वधूवर वैवाहिक सुखाचा आनंद प्रथमच आज लुटणार असतील तर त्याना स्वर्गसुखास तोटा नाही, पण नवनीति आचरणारे ते भ्रमराप्रमाणे ह्या फुलावरून त्या फुलावर बसणारे त्यांना ‘ अयं स ते तिष्ठति संगमोत्सुकः ’ अशी उत्कंठा कशानें आज वाटणार आहे? असो. त्या वधूवरांना सर्व ऐहिक सुखें चिंतून आम्ही निसर्गाची शोभा पाहण्यात गढून गेलों. सरोवराच्या दुसऱ्या काठावर दोन्ही बाजूनी पिवळ्या रगाच्या झाडांची रांग खूप दूरवर होती. पलीकडे मोठमोठीं हॉटेल्स होती, त्यांवर तावडया रगाचे वेल चढ-वून दिले होते, तर कोठे हिरवे होते. एकीकडे मानवी व दुसरीकडे परमेश्वराची लीला, अशा दोन्ही गोष्टीची जोड येथें असल्यामुळें शोभा फारच वाढली होती. सरोवरापाठीमागील बर्फाच्छादित डोंगरांच्या रांगा, त्यांवरील सूर्याच्या धूसर प्रकाशांत खुलून दिसत. निळा, पांढरा आणि सोनेरी रंग किती सुरेख दिसे. डोंगरापलीकडील दिनमणि कसा हळुहळू, राजाच्या ऐटींत, आपला

लवाजमा दूरवर पसरवीत, स्वगृही जाण्याच्या तयारीत होता. हळुहळू सोनेरी किरणें नववधूच्या आरक्त गालाप्रमाणे मंद मंद पण मनोहर दिसू लागली हें रमणीय दृश्य आता लवकरच सपेल म्हणून मनाला हुरहूर वाटू लागली. एकेका डोंगराला प्रेमानें निरोप देत देत दिननाथ अस्तास गेला. कोठे तरी तुरळक लकेर दिसावी, लहान बालकाच्या अनिमित्त व क्षणिक हास्याप्रमाणें ती लकेर, पण क्षणार्धांत लोपली. झालें, हळुहळू निशादेवीचें साम्राज्य होण्याची चिन्हें दिसू लागली. तत्पूर्वी आकाश तऱ्हतऱ्हेचीं रूपे बदलून चमत्कार दाखवीत होतेच. आम्ही घटकाभर निसर्ग सोडून गांवात हिंडून आलों. तऱ्हतऱ्हेच्या उत्तमोत्तम मालांची दुकानें बघत बघत पुनः त्या पिवळ्या झाडाच्या रागामधून आलों. त्यांमधून आतां विजेचे दिवे पेटले होते. गौरीच्या आरासेप्रमाणे दिसले. जिकडे तिकडे हिरवे, पिवळे, जाभळे दिवे झळकत होते. काळयाभोर पर्वतांमधून दिवे तारकांप्रमाणें चमचम करीत होते. तर त्या कारंज्यामधून वर पांढरे तुषार तर खालचा गोल भाग पाचूप्रमाणे हिरवाचार दिसत होता. जिकडे तिकडे चकचकाट व चित्त बेहोष करणारा देखावा होता. तें कारंजें, व पाचू पांढऱ्या शुभ्र रत्नांचीच साक्ष पटवीत होते. असो. मोठ्या कष्टानें Luzern ला निरोप देऊन आम्ही घरी आलो.

## १८ ऑक्टोबर

आज आदितवार सकाळी ८॥ च्या गाडीनें आम्ही Rigi हा सुमारें नऊ दहा हजार फूट उंच डोंगर पाहण्यास गेलों. प्रथम Goldau ला गेलों, व तेथून डोंगराच्या चढणावर दुसऱ्या गाडीने गेलों. स्टेशनवर लोकांची अत्यंत गर्दी होती. प्रत्येक जण डोंगर चढण्याच्या पोषाखांत, व मोठमोठे जाड तळांचे व खाली खिळे असलेले बूट घालून, हातांत काठ्या व आणखी आयुधें घेऊन लहान मुलें, बायका, पुरुष घाईनें चालले होते. आज हवा पण चांगली होती; पण मधूनच धुकें जरा आलें. थोडा विरस झाला. थोड्या वेळांतच तें गेलें. सर्वांना हायसें वाटलें. सर्व दिवसभर दिनराज होताच आज. असो. आम्ही वर जाणाऱ्या गाडींत घाईघाईनें बसलों. गाडी गंभीरपणानें मार्ग आक्रमीत होती. नवनवी सृष्टीचीं रूपें पाहून आमचीं मनें आनंदीत

झाली होती. आमच्या डब्यांत आमच्या समोरच एक विक्रमोर्वशी बसलें होतें. निसर्गाच्या वाढत्या शोभेबरोबर त्याचें आकर्षण चद्रकलेप्रमाणें वाढू लागलें, व ते एकमेकाच्या बाहुपाशात बद्ध झाले. आल्प्सचें सौंदर्य पाढऱ्या शुभ्र बर्फाच्या थरानें शिखराला पोहोचले होते व वाटे की गौरवर्णीयांना गिरिराज आपल्याप्रमाणेंच गोरापान हवा की काय कोण जाणे! निळा, पाढरा व हिरवा रंग, त्यावरील झाडी, अफाट पर्वताच्या रांगा, ह्यानी केवढा तरी मोठा अजस्र भाग व्यापला होता. मधूनच अवखळपणाने उंच कडयावरून पाण्याचा स्रोत शीघ्र गतीनें खाली उडी घेई. पर्वताची गंभीरता, ह्या स्रोताच्या उडीच्या आवाजाने भग पावे. मधूनच हिरव्याचार गवतावरील पांढरे शुभ्र बर्फाचे थर चित्त थरारून सोडीत. हा सर्व देखावा त्या भावी वधूवराना जवळजवळ खेचीत होता; आणि म्हणूनच त्यांना त्या स्वर्गीय सुखाचा आस्वाद देण्याकरिता पटकन् बोगद्यामुळे काळाकुट्ट अंध.कार होई. गुलाबी गालांवरती हृदयाचा ठसा उठलेला किती शोभिवंत दिसे. त्यांच्या प्रेमविलासांना आळा घालण्याकरितां पुनः दैदीप्यमान प्रकाश आडवा येई. तरी पण यौवनमदानें त्याना कशाचें देखील भान राहिलें नाहीं. पण मला असे वाटले, की आमचे हिंदुस्थानी प्रेम किती मुग्ध असे. त्यांत किती अवर्णनीय शोभा व सतत टिकणारी गोडी असे. वडीलमाणसे ऐकतील, बघतील म्हणून मन साशंक, तर बोलण्याची इतकी उत्सुकता असायची. नुसता बांगडयाचा मंजुळ आवाज पत्नी आगमनाची चाहूल दाखवितांना, पतिहृदयाची आतुरता वाढवी. प्रेम, दृष्टीत, मितहास्यांत भरलेलें असे.

इंग्लंडमध्यें प्रेम कोठें वाटेल तिथे दृष्टीस पडेल. समुद्रकांठची गांवें, हाईडपार्क येथें तर प्रदर्शन, नव्हे प्रेमाचा हिडिस बाजारच दृष्टीस पडतो. इतर देशांत इतकें फारसें दिसलें नाही. असो. ओघालाच आलें म्हणून लिहिलें. अशा तऱ्हेनें 'रिगी' येथें ११॥–१२ च्या सुमारास पोहोंचलों. थंडी मी म्हणत होती. सगळीकडे बर्फच बर्फ. स्विस पोरें त्यांत लोळत होतीं, खेळत होतीं, तर लोक भराभर चालत होते. आम्ही चालण्याचा प्रयत्न करावा तर भस्दिशी पाय खूप आंतमध्यें जाई व भीति वाटे.

नंतर तेथील हॉटेलमध्यें जेवलों. Omelette, तळलेले बटाटे, सॅलड

व asparagus खाल्ले. येथेंही माणसांची अत्यंत गर्दी झाली होती. आम्ही परक्या देशचे आहोंत असें समजून आम्हांला मदत करण्यास म्हणून आमच्या टेबलावरच एक स्विस् गृहस्थ व फरेच पत्नी येऊन बसल्या. दोघेंही फार चांगली दिसली. खूप आमच्याशी बोलली. जेवण होण्यास १॥-२ तास लागले. कारण माणसें खूप व नोकर कमी. नतर बाहेर पडलों. एका दुसऱ्या हॉटेलच्या दरवाजाजवळ निवाऱ्यांत बसलो. तेथेंही एक बरेच म्हातारे गृहस्थ व त्याचा मुलगा येऊन बोलले. नंतर पायींच खालीं जाऊं लागलों. बर्फाचे चेडू केले. ह्यांनी खूप फोटो घेतले. एक जर्मन बाई बोलू लागली Do you feel cold? I had been to India, saw Darjeeling, Tajmahal, Sunrise at Tiger Hill वगैरे वगैरे. झूरिकला माझ्या मोटारीतून चला वाटेल तर वगैरे. तसेंच आणखी एक स्विस् नवरा बायको व तीन मुलगे अशी फार चांगली मंडळी भेटली. त्यानी सर्व विचारपूस केली व आमची काळजी घेतली. आणखी एका इंग्लिश गृहस्थांचीही खूप दोस्ती झाली. Goldau ला जाईपर्यंत ते आमच्याचबरोबर होते. नंतर Goldau वरील Bahanhof Buffetमध्यें त्यानीं आम्हाला चहा दिला. नंतर आम्ही झूरिकला निघालो. त्या इंग्लिश गृहस्थांना निरोप दिला. अशा तऱ्हेनें आमचा प्रवास फारच उत्तम झाला.

## १९ ऑक्टोबर

माझे बंधु स्वित्झर्लंडमध्ये शिकावयास असतात. Culman Strasse येथील लो राहात होता तें घर आज सकाळी, बाहेरून पाहिले. नंतर युनिव्हर्सिटी व तेथील Laboratories पाहात पाहात सरोवराजवळ आलों. सकाळ ९॥ ची वेळ होती. कॉलेजची खूप मुले सुट्टीच्या वेळेत खात-पीत होती. Bahanhof Strasse वरून घरी आलों. नंतर पुनः हिंडत हिंडत स्टेशनवर गेलों व Buffet मध्यें सूप व बटाटे खाल्ले. हे १॥ वाजतां Winterthur ला गेले. मी घरी आलें. नंतर हे सहा वाजतां परत आल्यावर पुनः सरोवरापर्यंत हिंडून, नेहमीच्या Vegetarian Restaurant मध्यें जेवायला गेलों. सूप, दही, कोबीची व बटाट्याची भाजी, भात दोन तऱ्हेची Puddings खाऊन Bahanhof Strasse वर हिंडून घरीं आलों. ह्याच रेस्टॉरंटमध्यें आम्ही

खाण्यास जात असू. अन्न उत्तम मिळे. Maid इंग्लिश बोलणारी व मोठी छान होती. माझे बंधु पण येथेंच जेवावयास येत. येथें जेवून व Maid ला प्रेमानें निरोप देऊन आम्ही स्टेशनवर निघालों.

झूरिक सोडायचे जिवावर आलें. हे आम्हाला फारच आवडले. आणि हें अगदी सोडूं नये असें वाटले. पण चबी लंडनला एकटी म्हणूनच लवकर जावें लागलें. जिनीव्हास जायचें होतें. वाटेत लुझानला सर हसन सुन्हावर्दींची मुलगी दिसली. ती पण आमच्याच गाडीनें जिनीव्हास जात होती. आम्हाला तिला पाहून फारच आनंद झाला. जिनीव्हा येईपर्यंत आम्ही गप्पा मारीत होतों. नतर ६ वाजतां जिनीव्हा आले. League of Nations मध्ये Political Section मध्यें असलेले First Class Officer, Dr. Ram, लखनौ युनिव्हर्सिटीचे प्रोफेसर आमच्या जुन्या ओळखीचे, आम्हाला स्टेशनवर नेण्यास आले. त्यांना पाहून आम्हांला अतिशय आनंद झाला. ते आम्हांला आपल्या घरी चला म्हणतच होते. पण आम्ही Rue Du Rhone येथील व्हिक्टोरिया हॉटेलमध्ये गेलों. दर 9 Franks ( Swiss ) दोघांना नुसत्या खोलीचे. सामान ठेवून डॉ. राम-बरोबरच त्यांच्या घरी 15 Rue De l' Athenee. येथें पायीच गेलो. घर मोठें आहे. भाडे ४०० रुपये. ह्यांत Linen, Cutlery, Crockery वगैरेंचा (Furniture) समावेश होतो. त्याच्याजवळ एक Swiss Maid व एक हिंदुस्थानी मॅट्रिक झालेली मुलगी मुले सांभाळण्याकरिता म्हणून आणली आहे. डॉक्टर व सौ. राम दोघेंही अतिशय उत्तम संस्कृतीचे, राष्ट्रीय बाण्याचे, परकीयांतील चांगले गुण घेणारे, एकमेकांना अत्यंत अनुरूप, अत्यंत सज्जन व अगत्याचे आहेत. गांधीजी, ताजमहाल, भगवान् श्रीकृष्ण, अभिमन्यू, भगवद्गीतेंतील श्रीकृष्ण व अर्जुनाच्या रथाचा फोटो, हिंदुस्थानचा नकाशा, असे प्रिय हिंदुस्थानचे फोटो घरांतच काय, पण League of Nations मधील ऑफिसमधील त्यांच्या खोलींत, हे फोटो साक्ष ठेवून, ते काम करीत असतात. आणि खरेंच ते दोघेही हिंदुस्थानाला ललामभूत आहेत. नंतर त्यांच्याकडे खूप गप्पा मारल्या, व आपलें जेवण जेवलों. त्यामुळें जास्तच मजा आली. रात्रीं घरीं गेलों.

## २१ ऑक्टोबर

आज सकाळी Rolex कारखान्यांत घड्याळे घेण्याकरितां गेलों. येथें कामावर सर्व बायकाच. डायरेक्टर चांगला मनुष्य होता. ह्यांनीं स्वत:ला सुदरसें घड्याळ व आणखी ४–५ घड्याळें घेतली. नंतर इकडे तिकडे हिंडत हिंडत वस्तु घेत घेत Bahanhof जवळ Vegetarian Restaurant मध्यें जेवलों, व १–२० च्या गाडीनें Varnayaz गांवी Montreaux वरून गेलों. येथें ७५००० अश्वशक्तीचें वीज उत्पन्न करण्याचें Power House आहे. पाणी २००० फूट उचीवर असलेल्या डोंगरांतील तलावावरून दोन मोठमोठाल्या जाड लोखंडी नळांतून खालीं येतें व चक्रे फिरवतें. डोगरावरील तलावाकडे सामान व माल नेण्याकरितां जवळजवळ Funicular Railway Line बांधली आहे, व त्यावरून जाड लोखंडी दोरानें Trolley वर–खाली नेली जाते. दोर तुटल्यास मनुष्याचे Minced Mutton प्रमाणें तुकडेच व्हावयाचे! ती लाईन बघून माझी तर बोबडीच वळली. पण हे थोडेच ऐकणार. शिवाय आमच्याबरोबर Power House चे मुख्य इंजिनियर म्हातारे गृहस्थ होते. त्यामुळे न ओरडतां चूप बसले. बाकी मी मागे पाहातच नव्हते. खालीं खोल, चोहों बाजूनी अक्राळविक्राळ डोंगर. एका बाजूने ऱ्होन नदी वाहात होती, तर बहुतेक डोंगर बर्फमय होते. वनश्री सुदरच होती. एका बाजूनें साधी रेल्वे लाईन, तर कोठें बोगद्यातून दृतवेगाने शिरणारी आगगाडी, तर दुसरीकडे मोटारचा रस्ता, असे ईश्वरी लीलेचे व मानवी कृतीचें चढाओढीचें दृश्य मनोहर व भीतिदायक होतें. मनुष्याची अक्कल तरी काय कमी! एवढ्या उंच डोंगरावर आगगाडी नेली कशी, एवढे अजस्र नळ घातले कसे, तेथील वाहणाऱ्या पाण्यापासून वीज काढली कशी, सर्वच चमत्कार. केवढा खटाटोप माणसांचा तरी. मी मात्र शिखर येतें कधी व उतरते कधीं ह्याची वाट पाहात होतें. अखेरीस दिसलें. वर खेडे होतें. खूपशीं मुलें आम्हांला पाहण्याला जमली. किती गुटगुटीत व निष्पाप दिसलीं तीं. शेतकरी-शेतकरणी आम्हांला त्यांच्या भाषेत 'राम राम' करीत होतीं. वर डोंगरांत लोकांना राहण्याचे बंगले होते. उन्हाळ्यांत खूप गर्दी असते. जवळच मुलांमुलींची शाळा होती. प्रत्येकानें शिकलेंच पाहिजे. लांकूड

फोडणें, शेणाचे ढीग, खूप भाज्या, असें सर्व शेतकरी-जीवन पाहण्यास मिळाले सर्व मुलाना मी Chocolate दिलें. मुलेच ती, आनद झाला त्यांना. गुलें येथून तेथून सारखीच. नतर परत जाण्यास निघालों. बरोबर बरेचसे Soldiers व कारखान्यांतील मंडळी होती. Chief Engineer ला इंग्लिश जेमतेमच येत होते. I goes every months there. There चा उच्चार 'जेअर' करी. मला हंसू येई. नंतर सर्वांना निरोप देऊन आम्ही निघालों. आगगाडीला थोडा वेळ होता, तेव्हा स्टेशनवरील एका दुकानांत जाऊन छानशी कॉफी घेतली. दुकानाचे मालक व मालकीण चांगले पण खेडवळच होते. आपल्या भाषेत ते अगत्याने बोलले. त्यांची १२-१३ वर्षांची मुलगी छान गोरीपान व गुटगुटीत होती. तिला १० Centimes आम्ही खाऊला दिले. नंतर गाडी पकडली व रात्री ८॥ ला जिनीव्हास पोहोंचलों. Vegetarian Restaurant मध्ये, पालेभाजी, भात, सूप व पुडिग खाल्लें आणि दुकाने पाहात पाहात घरी निघालों.

## २२ ऑक्टोबर

आज सकाळी Rue De Mont Blanc येथें Cooks मधून पत्रे वगैरे घेतलीं. मी घरी आले. जर्मनीबद्दलचा लेख लिहून तो मी केसरीकडे पाठविला, व हे Atiliers De Sechron येथें कामावर गेले व एकला आले; नंतर आम्ही Vegetarian Restaurant मध्ये जेवलों. मग थोडेंसें दुकाने पाहात पाहात हिडलों. नतर ३ वाजतां Cook च्या गांव दाखवून आणण्याच्या ३ Frank प्रत्येकाला पडणाऱ्या, Tour मधून गेलो. कांही चर्चेस, वागा वगैरे पाहून Labour Office मध्यें आलों. इमारतीचें थोडेबहुत काम होत होतेंच. एका हॉलमधील सर्व सागवानी लांकूड हिदुस्थानहून आणलें होतें. कामकरी वर्गाच्या सुखसोयींची चर्चा करण्याची ही जागा. त्यामुळें भितींवरील चित्रें पण हृदयस्पर्शी होतीं. खाणी-कामगार, गिरणींतील मजूर, शेतकरी, हे आपापली कामें कशी करीत आहेत व त्यांच्याकडे तोही 'मनुष्य' आहे ह्याच दृष्टीनें बघायचें व त्याच्या कामाचे तास कमी करून, विश्रांति देणें, आजारी पडल्यास नीट व्यवस्था करणें वगैरे वगैरे सोयी करावयाच्या. या वेळीं आपल्या रा.

एन. एम. जोशी याची आठवण होत होती. नंतर League of Nations दुरूनच दाखविलें, व ही टूर ५ वाजता संपली. नंतर Bahanhof Buffet मध्यें चहा कॉफी घेऊन घरी गेलों.

आज रात्री डॉ. राम याजकडे High Commissioner for India Sir Phirozkhan Noon ह्यांना जेवण होतें. पण सर्दी झाल्यामुळे ते ऐन वेळेस आले नाहीत. आम्ही दोघे, Mr. and Mrs. Zaman, Trade Commissioner for London, Captain and Mrs. Khanolkar व Mrs. Khanolkar याचे वडील हे जिनीव्हासच प्रोफेसर आहेत, व Mr. and Mrs. Raja, हे तरुण गृहस्थ मद्रासी असून Labour Office मध्यें आहेत. अशी सर्व मडळी जेवणास जमली होती. Dr. Ram अगदी हिंदुस्थानी पोषाखांत होते. Mrs Ram पण भरजरीचें स्वदेशी मद्रासी लुगडें नेसल्या होत्या व बनारसी ब्लाऊझ घातला होता. स्वदेशीच किती चांगलें दिसतें. हिदुस्थानी कापडाची सर कशाला तरी येते का? त्यांनीं आपलें कांही सोडले नव्हतें. ढळढळीत मोठे कुकू कसें सर्व छान दिसत होतें. ज्याचें त्यालाच सर्व शोभते.

जेवण पण बरेंचसे हिंदुस्थानी होते. सर्व हिंदुस्थानी आदमी, एकत्र जमल्यामुळे सगळचांना तें आवडलें. जेवणानंतर मी, सौ. राजा व सौ. राम ह्यांनीं गाणी म्हटली. डॉ. रामची मुलगी १४–१५ वर्षांची आहे. ती International स्कूलमध्ये जाते. ती एक अत्यंत तरतरीत नवयुगीन (Modern) मुलगी; साहजिकच आहे, तिनें इंग्लिश संवाद व नाच केला. नतर पुन: सौ. राम व सौ. राजा ह्यांनी शेवटचें 'वदे मातरम्' व 'जन मन नायक' हीं स्वदेशप्रीतीची मातृभूमीबद्दल गाणी म्हटलीं. सौ. रामचा आवाज 'खडा', म्हणणें फारच चांगलें, व रोमांचकारी, हृदयस्पर्शी गाणे! माझ्या डोळचांत गंगा-यमुना यायला लागल्या. हाय! पृथ्वीवरील सर्व देशांत उत्तम माझा हिंदुस्थान. अणुभर तरी उणीव त्यात परमेश्वरानें ठेवली आहे काय? पर्वत, नद्या, समुद्र, तऱ्हतऱ्हेचीं फळेफुलें, धान्य, काय कमी होतें आमच्या हिंदुस्थानांत? सोन्याचांदीचे ढीग, रत्नांच्या खाणी जेथें होत्या तेथें आज खायला मिळत नाहीं. ह्यापेक्षां दुर्दैव तें कोणतें! असतील दुसऱ्यांचे देश चांगले. मला मात्र ह्या क्षणास माझ्या मायभूमीला उडून जावें असें वाटलें. स्वदेशा-

शिवाय दुसरे जगांत कांही चांगलें नाहीं. हिंदुस्थानवर अणुभर जास्तच प्रेम करायला ह्या परदेशांतील प्रवासापासून मी शिकलें. गरीबगुरिबांना-देखील सुखानें आमच्या हिंदुस्थानांत राहतां येत होतें. परदेशांत पाहिलें तर काय दरक्षणी पैसा लागतो, व सर्व गोष्टींत हिमटेपणा ! असो. नंतर एक-मेकांशीं खूप गप्पा मारल्या. सौ. खानोलकर ह्या स्विस बाई, महाराष्ट्रीय कॅप्टन खानोलकर ह्यांच्या पत्नी, ह्यांचा विवाह १९३३ साली रँग्लर परांजपे ह्यांच्या घरी लखनौस झाला. आम्ही हजर होतोंच. त्या प्रोफेसरांची मुलगी, त्यामुळे कुल चांगलें व साहजिकच गुण पण चांगले, साडी नेसणे, मंगळसूत्र, मोठें कुंकू, मराठी शिकण्याची धडपड हे पाहून कौतुक वाटलें. मराठी दोन गाणी म्हटली. मुलीचें नाव कुमुदिनी असलेले गाणें म्हटलें. ह्यांचें गृहसौख्य चांगले असावेसे वाटते. परक्या देशांतील बायको अशी चांगली निघाली तर अशी लग्ने फारशी वाईट नाहीत. असो. ११॥ ला प्रोफेसर व Captain आणि Mrs. Khanolkar ह्यानी त्यांच्या मोटारी-तून आम्हांला Hotel मध्यें आणून सोडलें.

## २३ ऑक्टोबर

आज सकाळी ७ च्या गाडीनें आम्ही Lausanne वरून Interlacken बघण्यास गेलों. फारसा सूर्यप्रकाश नव्हता. हे गांव शांत आहे. ११॥ ला पोहोंचलों. गांवात डोंगराच्या पायथ्याशी एक कालवा आहे त्याच्याभोंवती खूप दूरवर हिंडलों. सभोवती झाडी, सफरचंद व पेअर्स पडली तीं वेंचून खाल्लीं. किती मधुर होती. मी ह्याना म्हटलें लहानपणी असें रानावनांतून हिंडायला व चिचा आणि बोरें खायला, कच्चा कैऱ्या खायला किती मजा वाटायची. एकसारखे १० ते ५ शाळेंत डाबून बसण्याचा मुलांना कंटाळा येतो. आणि खरेंच हल्लीच्या यांत्रिक युगांत, भयंकर जीवनकलहांत लहान मुला-पासून तों वृद्धापर्यंत प्रत्येक जण गुरफटलेला असतो. त्यामुळे हें रमणीय खेड्यांतील साधें जीवन आपणांस मिळत नाही. कालव्याभोंवतीं स्वैरवृत्तीनें आम्ही दोघे हिंडत होतों. आम्ही एकमेकाचे फोटो घेतले व घटकाभर तरी सर्व दुःखें विसरून निसर्गाच्या शोभेचा निरतिशय आनंद लुटीत होतों. पतिपत्नीचें स्वर्गीय सात्त्विक प्रेम असलें म्हणजे पृथ्वीच्या पाठीवर कोठेंही असलों तरी

सुखच आहे. हे येथें जरी कामावर जात तरी मी सावलीप्रमाणें त्यांच्या पाठोपाठ असे. एकमेकाना विसंबून आम्ही कोठें फारसें जायचेंच नाहीं. एकादे वेळेस असें वाटे, की ह्या सर्व सुखास दृष्ट तर नाही ना लागायची! जगाच्या दृष्टीनें आम्हाला 'मुलगा' नाहीं हें एक वैगुण्यच आहे. तरी पण नेहमी एखादी गोष्ट कमी असलेलीच बरी. आमची लाडकी चबी आम्हांला मुलाच्या वरच आहे. असो. नंतर पायीच परत जाण्यास निघालों. वाटेनें किती तरी धष्टपुष्ट गायी भेटल्या. त्यांच्या गळ्यांतील घंटा-नादानें सर्व वातावरण कसें मंजुळ व गंभीर वाटत होतें. शेतांतील जीवन नेहमींच रमणीय असतें.

नंतर Bahanhof Buffet मध्यें सूप, बटाटे, वालपापडीच्या शेंगा, रोटी, व Omelette खाल्लें, व पुन: गांवांत हिंडण्यास निघालों. ह्यांनीं Jungfrau ह्या बर्फाच्छादित शिखराचा फोटो घेतला. हें ९००० फूट उंच आहे. ह्या गांवांत Hotels तरी किती! April ते October व नंतर December मध्यें येथे season असतो. तेव्हां येथें खूप गर्दी असते. दुकानें पाहात पाहात स्टेशनवर आलों. येथे आम्हांला छान वाटलें. पण ३॥ लाच गाडी होती, म्हणून निघावें लागलें. ५ ला Berne Switzerland च्या राजधानीचें शहर, येथें आलों. एका Vegetarian Restaurant मध्यें चहा, कॉफी, घेतली व हिडावयास निघालों. दुकानें पाहात पाहात भाजी बाजारात आलों व द्राक्षे घेतली. नंतर Confederation House हें बाहेरूनच पाहून त्याच्या मागच्या बाजूस आलों. खालील देखावा फारच रमणीय होता. एका बाजूने सरोवर, त्यावरील कमानदार पूल, टुमदार घरें, स्वच्छ रस्ते, सुदर झाडी, दिव्याचा मधून मधून चकचकाट, असें हें दृश्य अत्यंत रमणीय दिसत होतें. ह्यांनीं फोटो घेतले, व पुनः दुकानावरून हिडत होतोंच. सध्याकाळच्या वेळीं दुकानें पाहण्याचा एक नादच आम्हाला लागला होता. सुंदर सुंदर बायका बघण्याची हीच वेळ असायची. Evening Dresses, Make up वगैरे पाहण्याची अत्यंत मजा असे. लहानशी fashionable टोपी, त्यावर कसलें तरी पीस, अंगाबरोबर अगदीं घट्ट झगा, गोरा पान वर्ण, तोंडावरील काळीभोर जाळी, सर्व फारच सुरेख दिसे. बायका मुली सुदृढ, गोऱ्या पान व अंगबांधा अतिशय सुरेख,

त्यामुळें त्या डोळचांत भरायच्या अगदी. कांहीं कांहीं तर उंच टाचांचे बारीक बूट व अगदीं बारीक अंग, एकाद्या करकोच्याप्रमाणें वाटायच्या. एवढे मात्र खरें, सर्व बायकात Swiss बायकाच आम्हास अत्यंत अप्रतिम वाटल्या. नंतर गाडी गाठली. ८॥ ला जिनीव्हास पोहोंचलों. आमच्या नेहमीं-च्या Vegetarian Restaurant मध्ये खाऊन हिडत हिडत घरी गेलों. सकाळपासून हिडल्यामुळें दमून गेलों होतों अगदी.

## २४ ऑक्टोबर

आज शनिवार-सकाळीच League of Nations मध्ये डॉ. रामकडे गेलों. त्यांनी Social Section मध्ये मला नेलें. तेथील मुख्य गृहस्थांनीं Java मध्यें येत्या फेब्रुवारीत होणाऱ्या International Conference of the Prevention of 'Traffic of Women & Children' ची माहिती सांगितली. हिंदुस्थानातून कलकत्त्याच्या Mrs. S. C. Mukerji ह्या जाणार होत्या. मी पण जाण्याची खटपट India Office मध्यें करीत होते.बघायचें काय होतें त्याबद्दल त्यांनी मला त्या विषयाच्या माहितीचें सर्व लिखाण पाठवून दिलें. नतर आम्ही परत आलो, जेवलो व हॉटेलमध्ये गेलों. पुन: मला Social Section मधील एका अधिकारी बाईची भेट घ्यायची होती. म्हणून League of Nations मध्यें गेलों. तिने Traffic of Women & Children ची सर्व माहिती सांगितली व राष्ट्रसंघ काय करतो तेही सांगितलें. ४॥ वाजतां पायींच हिडत हिडत आम्ही एका बागेत गेलों. सरोवराकांठी ह्यांनी माझा फोटो घेतला. बागेमधील Open Air Cafe मध्ये आम्ही चहा-कॉफी घेतली. किती सुदर Cafe. ही एक मोठी मजा असे. येथें सर्वच गोष्टीची मजा. पैसा खर्चून हवा की सुखसोयीना काय तोटा! पैशाचा मोबदला पुरा मिळतो एवढी गोष्ट खरी. नंतर सरोवराकाठीं हिडलों. Mont Blanc येथील सरोवरावरील पूल, खालीं खेळणारे हंस, लहान लहान होडचा, पुलावरील सर्व देखावा मोठा रमणीय होता. त्यावरून सारखे आम्ही येत जात असूं जिनीव्हा आम्हांला फार आवडलें. नंतर रात्रीं पुन्हां डॉ. रामकडे गेलों व गप्पा मारून रात्रीं घरीं आलों.

## २५ ऑक्टोबर

आज आदितवार. आम्ही स्वित्झर्लंड सोडणार म्हणून चहा पिऊन बांधाबांध केली. नंतर १०॥ ला घर सोडलें. चालत चालत डॉ. रामकडे त्यांच्या मोठचा ३ वर्षांच्या—माधव—मुलाचा वाढदिवस होता म्हणून जेवायला आम्हांला बोलावलें होतें. French Maid ची सुट्टी होती. सौ. राम व हिंदुस्थानी आय्यानेंच जेवण केले होतें. भात, आमटी, भाजी, पापड, रायतें, फोडणीच्या मिर्च्या, दही. मग काय विचारतां मेजवानीच्या वर वाटलें सर्व. जेवून खूप गप्पा मारल्या. सर्वांचे फोटो घेतले. एकमेकांना निरोप देतांना कठ दाटून आला. कितीदां नमस्कार म्हणावा, तरी पण पुरा होईना. अखेरीस निघालों. पायीच पुनः सरोवराकाठी हिंडलो, फोटो काढले. येथील एकेक गोष्ट सोडतांना जिवावर आले. जिनीव्हा सोडवेना. झूरिकचें पण असेच वाटलें. इतके स्वित्झर्लंड आम्हांला आवडले अगदीं. विरह नेहमीच अत्यंत वाईट असतो. आमचे Victoria Hotel पण चांगलें होतें. माणसे चांगली. खरे म्हटलें तर आम्हाला सर्व जागीं Hotel ची माणसें अत्यंत चांगली भेटलीं. त्यांतल्या त्यात Continent वर फारच चांगलीं भेटली.सर्वात प्रवास Continent वरच चांगला (अर्थात फरान्स वगळून) आणि स्वित्झर्लंडमध्ये तर फारच उत्तम झाला. माणसे चागली,हवा व अन्न पण फार उत्तम. Victoria Hotel चा म्हातारा Proprietor छानच असे. असो. २॥ ला हॉटेल सोडलें. दुःखी मनानें गाडीत बसलो. संध्याकाळी ५ वाजल्यापासून सृष्टिसौदर्य दृष्टिआड झालें. मोठमोठे बोगदे लागत एवढेच. रात्रीं १०॥ ला पॅरिस लागलें. रूपसिग नांवाचा एक गुजराथी गृहस्थ ह्यांनीं पत्र लिहिल्यावरून आला होता. दारू प्यालेला व एकदर त्याचे चलनवलन ठीक दिसलें नाही. तो दुसऱ्याच एका हॉटेलमध्ये चला असें म्हणू लागला, पण आम्ही टाळलेंच तें, व हॉटेल Baudin मध्यें आलों. ह्याचा पत्ता Rue Lafayatte, Rué Baudin, Paris 9. दर नुसत्या खोलीचे. रोजीं ४० Francs. चालक फारच चांगले होते.

# प्रकरण पांचवें

## फरान्स देशांत

### ता. २६ ऑक्टोबर १९३६

सकाळीं चहा घेऊन Ac नंबरच्या Buss नें आम्ही Rue Du La Madeliene येथे Cook च्या ऑफिसमध्यें पत्रें आणण्यास गेलों. Casino Du Paris ला जाण्याची तिकिटे माणसी 40 Francs अशी घेतली व टॅक्सी-मधून ह्यांना कामाला जायचें तेथे गेलों. ह्यापूर्वी British Embassy मध्यें गेलों होतों. अशा वेळी मी खाली बसून राही. आज सारखा पाऊस व सूर्यदर्शन नव्हतें. रस्त्यानें मोटारीची अत्यंत गर्दी. भाषा समजत नव्हती. त्या-मुळें सारखी Taxi करायला लागली. मोठ्या शहरांत प्रथम गागरल्या-सारखेच होतें. मला तर रस्त्यांतल्या मोटारी व गर्दी पाहून काहीच सुचेना. नंतर १२ ला घरीं आलों. १ ला हॉटेलमध्येंच जेवलों. १॥। ला हे कामावर गेले. मीं चारपांच दिवसांची रोजनिशी लिहून काढली. रात्री ७ ला जेवून ८ वाजतां पायीच Casino ला जाण्यास निघालों. थिएटर खूप मोठें. सर्व मखमली गालिचे, जागा दाखविणाऱ्या गोऱ्या पान ओठ रंगवलेल्या मुली. पाहणारांची गर्दी पण पुष्कळ होती. आणखी दुसरे कांही हिंदुस्थानी लोक पण होतेच.

पहिल्यानें Orchestra सुरू झाला. अखेरपर्यंत तो होताच. गोऱ्यापान, रंगलेल्या, अतिशय सुंदर व बांधेसूद अंगाच्या मुलींचा हा बीभत्स पण मोठा ऐटदार खेळ, नाच, वगैरे अप्सरांचीच साक्ष पटवीत होता. चित्रविचित्र उत्तम पोषाख, रंगीबेरंगी पडदे, मुलीच्या तोंडावर पाडलेले तऱ्हतऱ्हेचे प्रकाश डोळे दिपवीत होते. सर्व कृत्रिम सौंदर्याची कमाल केली होती. नाच म्हणजे अगदीं नग्नावस्थेंतच होता. कांही कांहीं प्रकार तर अत्यंत हीन दाखविले. सभ्य माणसानें बघण्यासारखे तर नाहींतच. तरी पण शुभ्र व बांधेसूद अंग अतिशय रमणीय दिसलें. हिरवे, जांभळे, पांढरे पोषाख घालून Revolving Stage वरचा नाच तर अत्यंत प्रेक्षणीय झाला. फरेंच लोक मोठे विलासी.

काय त्यांचे करमणुकीचे प्रकार! असे हे, रसिकतेच्या दृष्टीनें चांगले कीं वाईट ह्याचा मला निकालच लागत नाहीं.

काव्य काय किंवा उत्तम चित्र काढणें काय शृंगाररसच दाखवायचा असला तर त्याची पराकाष्ठाच केली तर खरी मजा असते. कालिदासाचें मेघदूत किंवा ऋतुसंहार हें अशाच प्रकारचें थोडेंसें अश्लील नाही का ? पण तें वाचतांना स्वर्गसुखांत मन तरंगत असतें. कालिदासाला त्याच्या रमणीय काव्यांबद्दल जगांत पहिला नंबर मिळाला. तेव्हां सौदर्याच्या दृष्टीनें वरील प्रकार हाही पहिल्या नबरच्या मानास योग्य आहे. अर्थात् हिंदुस्थानांत हा रूढ होऊं नये असेच देवाजवळ मागणें आहे.

## २७ ऑक्टोबर

आज सकाळी १०॥ वाजतां Rue Du La Madeliene वरून Cook Wagon Lits ची Sight Seeing टूर घेतली. 50 Francs दोघांना पडले. प्रसिद्ध रस्त्यांनी एका मोठ्या अफाट बागेवरून राजवाड्याजवळ आलों. तो आतून बघितला. अफाट मोठा आहे. भिंतीवर व छतावर अतिशय सुदर Paintings आहेत. ही पण अगदी बरीचशी नग्नावस्थेंत तर पुष्कळशी बीभत्स आहेत. तरी पण अत्यंत गोरी, बांधेसूद अंगे सारखीं पाहात राहावी वाटतात. चित्रांमधून पण फरेंचांची रसिकता दृष्टीस पडते. गोरीपान, गुटगुटीत मुले आईच्या भोंवती खेळणारी, स्तनपान करणारीं फारच मोहक वाटली. तसेंच निजून पुस्तक वाचत असलेल्या गोऱ्यापान, केस पसरलेले, व केळीच्या खांबाप्रमाणें मांड्या असलेल्या रमणीचें चित्र ऊर्वशीचीच साक्ष पटवीत होतें.

असो. नंतर आणखी पुष्कळ राजवाड्यांवरून एका उंच Tower जवळ आलों. हा दगडी असून फारच भव्य आहे. ह्याच्या भोंवती गोलाकार १२ रस्ते आहेत व तेथून देखावा फारच सुदर दिसतो. पॅरिस अगदी अफाट, रस्ते मोठे, मोठमोठ्या इमारती, फरान्सच्या पूर्ववैभवाची साक्ष दाखवीत आहेत. तेथून श्रीमंतांच्या वस्तीमधून सुप्रसिद्ध लोखंडी अतिशय उंच Eiffel Tower जवळ आलों. हा जगांतील 'आश्चर्यांपैकीच' एक आहे. नंतर १२॥ ला Cooks Office जवळ आलों. तेथून पायी हिंडलों. पाऊस पडतच होता.

एका Vegetarian Restaurant मध्यें खाल्लें. पुन्हां दुकानें बघत, मी २ ला बसनें घरी आलें व हे कामावर गेले. ६ ला हे परत आले. संध्याकाळच्या वेळेस पॅरिसची दुकानें व रस्ते रंगीबेरंगी दिव्यांनी फारच सुंदर दिसतात म्हणून आम्ही पायी भटकण्यास गेलों. ८॥ ला परत आलों.

## २८ ऑक्टोबर

आज सकाळी पायीच स्टेशनवर जाऊन आगगाडीच्या परतीच्या तिकिटांची तारीख बदलून फिरत फिरत Cook च्या ऑफिसमध्यें गेलों. २ वाजतां शेजारील Restaurant मध्यें चहा-रोटी खाल्ली. २॥ वाजतां Cook च्या मोटारीमधून प्रसिद्ध स्थळें बघण्यास गेलों. Cook म्हणजे विश्वकुटुंबी. मोटारमध्ये जपानी, गुजराथी, दक्षिणी, तर आणखी जागोजागचे लोक होते. मोठी गंमत दिसली. सर्व भाषा बोलणारा असा त्यांचा वाटाड्या असे. तो सर्व समजावून सागे. प्रथम आम्ही Napoleon's Tomb पाहण्यास गेलों. नेपोलिअनबद्दल आम्हाला अत्यंत आदर आहेच; तेव्हां तें बघण्यास फार श्रद्धा व उत्सुकता होतीच. मोठ्या भव्य इमारतींत गोलाकार जागेंत त्याची पेटी आहे. भोंवताली स्वर्गातील अप्सरा उभ्या आहेत. म्हणतात की, इंग्रजाना मुद्दाम वांकायला लावण्याकरितां तें असें वांकूनच पहावें लागतें.

असो. प्रवेशद्वारावर दोन भव्य पुतळे हातांत दिवे घेऊन उभे आहेत तर वर भिंतीवर त्या महत्त्वाकांक्षी वीराचे अखेरचे शब्द कोरलेले आहेत :

**" माझी राख माझ्या फ्रान्समध्यें माझ्या लोकांत नेऊन टाका. कारण त्या लोकांवर माझें अत्यंत प्रेम आहे."**

वरील अर्थ ऐकतांना आमचे डोळे भरून आले, कंठ दाटून आला. देशावर किती प्रेम त्याचें! आमचा हिंदुस्थानसुद्धां आम्हांला इतकाच प्रिय आहे. हिंदुस्थानचे लोक अडाणी असले, गरीब असले, तरी ते आमचे—माझे. दुसऱ्याचा देश घटकाभर बघायला चांगला असला तरी आपलाच आपणांस प्रिय. असो. तेथून मुख्य मुख्य रस्त्यांवरून कॉलेजवरून Notre Dame हें चर्च पाहण्यास आलों. आंतमध्यें अंधार, जुन्या मूर्ती पण काचेच्या खिडक्यांवर रंगीत काम सुंदर होतें. एका भिंतीवर ब्रिटिश

गव्हर्मेन्टची War Memorial ची पाटी होती. त्या पाटीवर इतर ब्रिटिश कॉलनीबरोबर India असें नांव होतें. लढाईंत जे लोक पडले त्यांपैकीं पुष्कळ लोक फरान्समध्यें चिरकाल टिकणारी विश्रांति घेत आहेत. आमचे हिंदुस्थानी लोक पण आपली काया लोकांकरितां झिजवून हिंदुस्थानची दाद मागण्यास गेले. त्याचा करुणरव परमेश्वर ऐको, व त्या वीरांच्या प्राणदानाची पुण्याई आमच्या हिंदुस्थानच्या उपयोगी पडो, अशी मी माझ्या मृत वीराकरिता मनापासून प्रार्थना केली व जड अंतःकरणानें त्यांची जागा सोडली. मोटारींत बसलों. ५ वाजण्याची वेळ होती. रस्त्यानें ऑफिसें सुटल्यामुळे अत्यत गर्दी होती. चोहो बाजूनी मोटारीची अतोनात गर्दी होती. वर दिवे चमकत होते. सगळीकडे लखलखाट. डोळयाना जरा शांत काळोख पाहिजे म्हटला तर नाहीं. आजूबाजूनी नटलेल्या बायका. जसा सर्व नाटकाचाच देखावा दिसे.

असो. ५॥ ला Cook च्या ऑफिसापाशी आलों. आमच्याबरोबर मुंबईचे डॉ. पारीख हे होते. M. R. C. P. करितां २ वर्षे ते एडिंबरोला होते. १ नोव्हेंबरला ते हिदुस्थानास जाणार होते. स्वभावानें चांगले दिसले. तेवढया वेळात त्याची आमची दोस्ती जमली. मुबईचे ते होते ना! नंतर पायीच दुकानें बघत बघत घरी आलों, कपडे वगैरे करून जेवलों व ८ वाजतां Follies Berger पाहायला गेलों. दर 30 Francs प्रत्येकाला. हा Casino पेक्षा चांगला वाटला. कारण ह्यांत हुबेहूब देखावे दाखवीत नग्नावस्थाही पुष्कळच दाखविली. एक देखावा हिरवेचार डोंगर, त्यांतून धबधबा वाहात आहे, सुदर झाडी व त्याचें चित्र, एक तरुण, अंगानें सुदर गोरापान, अशा जणू दुष्यताचें चित्र काढीत आहे. नंतर तो कपडे काढून ठेवून पोहायला जातो. इतक्यांत सुदर पोषाखात पऱ्या नाच करीत येतात. ते कपडे पाहून तारुण्यमदानें त्या बेफाम होतात. तो पोहून येतो तो ह्या मुली एकेक कपडा घेऊन उभ्या. तेव्हां प्रेमानें त्यांच्याकडून तो तें परत घेतो. मग त्याही आपले सर्व कपडे काढून टाकून देतात. व डोंगरावर धबधब्याच्या भोंवती उभ्या राहतात. ती गोरींपान, बांधेसूद अंगे व तो रमणीय देखावा फारच उन्मादक असतो. असेच सर्व

हुबेहूब पुष्कळ देखावे दाखविले. परेंच लोक मोठे रसिक. ही कला त्यांची अगदीं पराकाष्ठेला पोहोंचलेली दिसते.

## २९ ऑक्टोबर

आज सकाळीं पायीच भटकत भटकत Cooks मध्यें गेलों नंतर जेवलों; व Rue Madeliene वर Aux Trois Quartiess ह्या मोठ्या दुकानांत गेलों. ह्यांना दुकानें बघण्याचा व जिनसा घेण्याचा अत्यंत मोह शिरले आंतमध्ये व ४०० रुपयांचे काचेचे सेट (Crockery) घेतले. घरीं वाटेल तेवढीं भांडी पडलीं आहेत. त्यांत पैसे नासून ही एक भर आणखी. मला मुळीच पसंत नाही. मला शिकण्याचा व सामाजिक कामाचा नाद, त्यामुळें एवढ्या सर्व वस्तूची व्यवस्था माझ्याने होत नाही. असो. हे घेण्यांत ५ वाजले. मग एका बागेंत जाऊन बसलों. हे सकाळी Paris Orleans Electric Substation बघावला गेले. मी लेख लिहीत घरीच बसलें.

संध्याकळी आम्ही फिरावयास निघालों. पॅरिस दिव्यानी, व दुकानांतील आरासीनें नटले होते. आम्ही दोघें बाकावर मजा पाहात विचार करीत होतों. सर्व बायका आपल्या बाहेर सदा न् कदा. हॉटेलें भरलेलीं. कसें हें ह्याचें जीवन. बंधन नाही. असो ! नतर पायीच दुकानें बघत घरीं गेलों. दमल्यामुळे रात्री कोठेच गेलो नाही.

## ३० ऑक्टोबर

आज पाऊस पडत होता. धुकें पण होतें. सकाळीं बरींचशीं पत्रें वगैरे लिहिलीं व १२ च्या सुमारास येथील टचूब कशी असते ती पाहावी म्हणून टचूबनें ७।८ स्टेशनें गेलों. एका स्टेशनवर प्लॉटफार्मवर जायचें दार आपोआप (Automatically) उघडे व बंद होई. स्टेशनवर गाडी होती म्हणून आम्ही धावत गेलों. तोंच चटकन् दार बंद. मी खूप हसलें नवख्या माणसाची अशी फसगत होते. टचूबचा बोगदा खूप मोठा दोन गाड्यांपुरता व आंतून सर्व दिव्यांचा लखलखाट. प्लॅटफॉर्म पॅसेज व आगगाडीचे डबे अगदीं घाणेरडे. खरें म्हटलें तर आम्ही पाहिलेल्या सर्व यूरोपिअन राष्ट्रांत पॅरिस, मार्से ही पुष्कळच घाणेरडी दिसलीं. थुंकी तर थिएटर,

आगगाड्या, रस्ते ह्यांतून दिसेच. कागद चोहींकडे. एकंदरींत फरान्स घाणेरडा. हॉटेल्स, रेस्टॉरंट पण तितकी स्वच्छ नाहींत. पुष्कळ जागीं कपबशा फुटक्या असत. अर्थात् हे सर्व पैशाचे खेळ आहेत. आम्ही पॅरिस-बद्दल इतर पुष्कळ निंदा ऐकल्या होत्या. लोक फसवतात, हॉटेलमध्यें चोरीचा संभव, बायका येऊन रस्त्यातदेखील पुरुषाला मिठी मारतील; पण आम्हांला तर असा मुळीच अनुभव आला नाही. अगदी प्रथम तर वरचेवर टॅक्सीतून हिंडलों, पैसे कळत नसत. पण कोणी फसविलें नाहीं. लोकही फार चागले वागतात. अत्यंत वाईट जागी रात्रीचे गेलों. पण कांहीं झाले नाहीं. आमच्या हॉटेलचे चालक व इतर लोक पण फार चागले होते. मुख्य मालक तर मोठा गोड असे. नीट चौकशी करी, जेवायला मागू तें देई. तेव्हां फरान्स ह्या बाबतीत तरी वाईट नाही, असे प्रथम आम्हाला वाटले.

पॅरिसचे पोलीस पण फारच चांगले असत. आम्ही वाट ओलांडायला थांबलों, की आम्हांला चटकन् मदत करीत. रस्त्यांत मोटारची अत्यंत रहदारी, तरी पण व्यवस्थित असे. बायकामुलाच्या सुरक्षितेकडे हेही फार बघत असत.

येथील दुकानांत आम्ही बरीच खरेदी केली. पण कोठें फसवेगिरी दिसली नाही. पुष्कळशी दुकानें आत जाऊन बघितली. माल मांडण्याची पद्धत फारच चित्ताकर्षक असे. हँडबॅग्ज, बूट, अत्तराचीं दुकानें अत्यंत शोभिवंत व भपकेदार केलेली असत. त्यांमध्यें विकणाऱ्या अतिशय सुंदर बायका, बघत बसाव्यात अशा असत. कांचेचा माल देखील तऱ्हतऱ्हेचा. रंग नाजुक व डोळ्यांत चट्दिशी भरणारे व मोठे नयनमनोहर असत. किती अजस्र माल पडला होता ! कपड्यांची दुकानें खूप. त्यामधील हुबेहूब पुतळे कपडे घालून फिरतांना दिसत—पॅरिस म्हणजे मोठे शोकीन शहर. येथील फॅशन तर प्रसिद्ध. फॅशन येथें पहिल्यानें सुरु व्हावयाची व मग दुसरीकडे पसरावयाची.

Cafe तर एक घर सोडून असतच. रस्त्यावरील Footpath वर रंगीत खुर्च्या, टेबलें असत. तेथें चहा, दारू, कॉफी लोक पीत बसतात.

रात्रींच्या वेळीं तर कोठें सुंदर बायकांचा Orchestra तर कोठें Cabarets तर कोठें सिनेमा अशी सारखी गडबड असावयाचीच.

जुन्या ऐतिहासिक इमारती, त्यांवरील तऱ्हेतऱ्हेचे पुतळे हे तर जागोजागीं आहेत. रस्त्यांच्यामध्यें उच भव्य पुतळे व बागातून, हॉटेलमधून, तसेंच भिंतीवर सुंदर Paintings तर जागोजागी दिसत. नग्न फोटो दुकानांत टांगलेले असावयाचे. रस्त्याच्या बाजूला पुष्कळ जागीं काचेच्या पांढऱ्या स्वच्छ फुलांतून कारजें व भोंवताली हिरवीगार बाग असे. हें सर्व पाहून मोंगल राज्याची पॅरिस ही नक्कल वाटते. दिल्लीला पण अशीच सर्व रसिकता दृष्टीस पडते. शहरांमधून Seine नदी गेलेली आहे. तिच्यावरील पूल, भोवतालचे भव्य राजवाडे, त्या अफाट बागा, मोठमोठे रस्ते, पुतळे, एकापेक्षा एकेक जुनीं व मोठी Opera Houses व दिव्यांचा चकचकाट ह्यांनी पॅरिस शहर मोठे विलासी व थाटदार बनले आहे. म्हणूनच जगांतील सर्व लोक हें पाहण्यास येतात.

असो. आज १ च्या सुमारास Eiffel Tower वर चढण्यास आम्ही गेलों. हा Rue De Petrograd येथे आहे. तो ९०० फूट उंच आहे. सव काम जाळीसारखें (Lattice) लोखंडी असून Eiffel नांवाच्या एंजिनिअरनें बांधला आहे. जगांतील नऊ आश्चर्यांपैकी हे एक आहे. मला वर जायची भीति वाटत होती. कारण उंचावरून पाहिले की, मला घेरी येते. तथापि हे थोडेच ऐकतात. मला जबरदस्तीने नेलें. जाण्यास १० फ्रँक प्रत्येकीं पडतात. लिफ्ट असतो. चालविणारी दोन माणसें असतात. भीति मुळीच नाही. ४ मजले आहेत. वर अगदी मोठ्या घरासारखें आहे. पहिल्या मजल्यावर मोठें भव्य हॉटेल, आंतमध्यें दिवे, झुबरें, नाचाची जागा, सगळीकडे आरसे, खेळाच्या जागा असें आहे. उत्तम जेवण मिळतें. पैसे फार पडत नाहीत. दुकानें आहेत. सर्व कांही आहे. आम्ही येथें सूप, रोटी, तळलेले बटाटे, केळीं, व चहा घेतला. २० फ्रँक पडले. नंतर वर दोनदां लिफ्ट बदलावा लागला. किती उंच गेलों. डोकावून पाहिलें तर किती खोल दिसे. नंतर ३ ला खालीं आलों. लिफ्ट चार वाजेपर्यंत चालतो. सकाळपासून बारवाजेपर्यंत वर राहतां येतें. उंच बांधण्याची कमाल आहे खरी ! ह्याच्या आसपास १९३७ मध्यें Coronation निमित्त होणाऱ्या प्रदर्शनाची जंगी

तयारी चाललेली दिसली. असो. खालीं जमिनीवर पाय ठेवल्यावर मला हायसें वाटलें. नतर पायीच हिंडत हिंडत घरी ६ ला आलों. यूरोपांत आल्यापासून आम्ही रोज जवळ जवळ ६–७ मैल चालत असू. बस्‌मध्यें क्वचितच बसत असू. टॅक्सी तर क्वचितच अगदी. रात्री कोठेंच गेलों नाहीं.

## ३१ ऑक्टोबर

आज Cookकडे पत्रें आणावयास गेलों. नंतर Verseilles (व्हर्साय) ला आदितवारी जाण्याची तिकिटें काढून खूप हिंडलों. Vegetarian Restaurant मध्यें खाल्ले. नंतर Opera Avenue मध्यें एका Beauty Saloon मध्यें गेलो. पॅरिस ह्याबद्दल पण प्रसिद्ध आहे. तेथें ८ Francs ला मी नुसते केस धुऊन घेतले. धुवायला पुरुषच होता. अंगांत कपडे असून देखील एक थेब न सांडतां केंस स्वच्छ धुतले. यत्रानें लगेच वाळवले. नंतर मुख्य बाईला मी पुष्कळ माहिती विचारली. ती Beauty Treatment ची Surgeon होती. 'अंग व चेहरा सुरेख दिसावा म्हणून तऱ्हतऱ्हेचे Facial Massage Slimming ची पथ्ये, व्यायाम, Bust-reduce होण्याची Operations, अशी पुष्कळ तऱ्हेची माहिती तिनें सांगितली. दिवसाची अमकी तर रात्रीची तमको Cream तर हा Rouge नी ती Powder व Lip-stick. फरेंच बायका सौंदर्याकरिता प्राण देतील अगदी! काय त्यावर पैसा ओतणें व शरीराला यातना सोसणें! Permanent Wave ला तर ३०–३५ रुपये पडतात. चार साडेचार तास यंत्रांत डोकें घालून बसावें लागतें. कोण यातना! पण सौंदर्य ठेवणें हेंच या बायकांचें ध्येय! शहरात राहून अनैसर्गिकपणें राहणें, आणि म्हणूनच कृत्रिम सौंदर्याचे उपाय. Slimming चें तरी कोण बंड येथें. ती डॉक्टरीण म्हणाली की, त्यामुळें प्रकृतीवर मोठे वाईट परिणाम होतात. तुमच्या हिंदुस्थानांत सौंदर्याकरिता काय करतात? मी म्हटलें, आमचे बिनखर्चाचे व नैसर्गिक उपचार असतात. इतकें खूळ आमच्यांत नाहीच मुळी! असो. माझ्या मनांत येथे मुळीच जायचें नव्हतें. कारण असली हीं कृत्रिम कामें मला मुळींच आवडत नाहींत. माझी निसर्गावर व मेहनतीवर भिस्त आहे. व त्यामुळें मी माझें शरीर नीट राखलें आहे. ह्यांनींच अतिशय

आग्रह केला म्हणूनच गेलें. असो, पण एकंदर माहिती ही मिळाली. कमाल आहे येथल्या बायकांची एवढी गोष्ट खरी! आपल्या हिंदुस्थानांत कृत्रिम सौंदर्यसाधनें येत चालली आहेत. पण अशक्त शरीराला तें प्रेतावरील शृंगाराप्रमाणें दिसतें. आमच्या बायका व मुली जास्त मेहनत घेतील तर जास्त सुदर दिसतील. नंतर पायींच फिरत फिरत आलों.

रात्री ८॥ ला Alcazar, Speetacular Show बघायला गेलों. हा देखील मुलींचाच नाच. मागील दोन्हीपेक्षा ह्यांत नग्न मुली जास्त होत्या. एक काळी मुलगी साधारण ऑफ्रिकेंतल्याप्रमाणें पण अगदी तितकी काळी नव्हती. दुसरी एक पुष्कळच गोरी होती. पण कुठली होती हें कांही कळेना. ह्यांत देखावे फारसे नव्हते. पण एका मुलीने कसरतीचें उचावरचें काम नग्नावस्थेंतच फार उत्तम केलें. मला तर बघवेना अगदी. ह्या नग्न मुलीची मला कीव आली अगदी. पोटाकरतां कोण हिडिस काम त्यांचें! रोज जेव्हां लोकांपुढें शरीराची विटबना करतील तेव्हांच तुकडा पोटाला मिळायचा. किती वेळ तरी त्यांना उभे रहावे लागे! ह्यापेक्षां आणखी दुसरें घनघोर पाप कोणतें! कोणत्या पापाची शिक्षा भोगतात कोण जाणे! ह्या नग्न मुलींच्याच जिवावर एवढा पैसा मिळतो तर! पॅरिसची ह्या गोष्टीत फार प्रसिद्धि! म्हणून म्हटलें बघावे काय असते तें. शिवाय आम्ही दोघें बरोबर जात असू तेव्हां कोणतीच भीति नव्हती. कला ह्या दृष्टीनें हे फारच उत्कृष्ट दिसे. पण हें पाहणें चांगलें की वाईट तें कांहीं समजत नाही. हिंदुस्थानांत मात्र हें न येवो. ह्या मुली कोठच्या व कशा मिळतात? त्यांच्या आईबापांना हें कसें आवडतें? सरकार तरी हें कसें राजरोस दाखवूं देतें, ह्याचेंच आश्चर्य वाटतें. एकदरीत बीभत्सप्रकारांची कमाल आहे एवढी गोष्ट खरी!

## १ नोव्हेंबर १९३६

आज आदितवार म्हणून Malmaison व Verseilles हें पाहावयास सकाळीं १०॥ वाजतां गेलों. दोघांना ९५ फ्रँक पडले. Thomas Cook चे ११० होते. म्हणून ह्यानें गेलों. पण Cook ची सर नाहीं. काय मोटार बैलगाडीसारखी चालत होती. वाटाड्या पण मोठा घाईचा. पुन्हां Cook-

शिवाय जाणार नाही, असें ठरविलें. ह्यांनीं चटकन् दाखवून थोडें गाळून ६ च्या बदली दुपारीं ४ लाच घरी आणलें. असो. जातां येतां रस्ता झाडीतून होता, आसपास अरण्य-बाग होती. ही त्यांची Hyde Park. गजबजलेल्या पॅरिसमधून सुटल्यामुळे निसर्ग व थंड वारा चांगलाच ताजा वाटला. पुढे जरा शेती लागली. नैसर्गिक शोभा नेहमीच आल्हाद-कारक असते. काय ती शहरांतली गडबड, तो चकचकाट, सर्वच कृत्रिम. आज सुट्टीमुळे, सारा आठवडाभर कोदट ऑफिसांतून, दुकानांतून ताटकळत बसलेल्याची रहदारी झाडाझुडपाकडे होती. आमच्या बरोबर एक अमेरिकन व स्वीडिश बाई होती. Malmaison हा नेपोलिअन बोनापार्ट व एम्प्रेस जोसेफिन्चा राजवाडा. जागोजागी त्याचे फोटो पाहून त्या महत्त्वा-कांक्षी व देशावर प्रेम करणाऱ्या वीराचें प्रेम वाटले. एका फोटोंत त्यास बंदी म्हणून St. Helena बेटांत जहाजावरून नेत आहेत व तो उभा आहे. पण फरान्सकडे तोंड करून, देशाला किती पाहावें व किती नाहीं असें त्याला झालें होतें. त्याचें स्वदेशप्रेम पाहून हृदय भडभडून येतें. एक फोटो त्याच्या मृत्यूच्या वेळचा आहे. तो पाहून तर कंठ दाटला. अगदी रडे यावयाला लागलें. मृत्यु किती निष्ठुर ! ह्या शूर वीराला कशाला नेलें ? आतां तो उठावा व आपल्याला पाहावयाला मिळावा. पण छे मृत्यु आहे म्हणूनच माणसाची किंमत कळते. अशा राष्ट्र-पुरुषाला देशाकरिता बंदीवास ! महत्त्वाकांक्षेकरितां ! असो. लहानपणा-पासून ज्याच्याबद्दल अत्यंत आदर होता त्याचें घर पाहायला मिळालें त्याबद्दल मोठा आनंद झाला. तेथून १२ मैलांवर असलेल्या Verseilles गांवी गेलों. प्रथम लच घेतला. हॉटेलमध्यें खूप गर्दी होती. ४९ Francs पडले. नंतर जरा गांवांत हिंडून आलों. लोकवस्ती बरीच आहे. चांगलें मोठें गांव आहे. नंतर २ ला राजवाडा पाहण्यास गेलों. हा १४व्या लुईचा राजवाडा. केवढा प्रचंड. आंतील हॉल वगैरे ! सर्व सोनेरी रंगाचे. भिंती-वरील Paintings फारच सुदर. एक प्रचंड आरशांचा हॉल आहे.

खालीं ज्या जागीं जर्मनीनें फरान्सकडून १८७० सालीं ज्या टेबलावर तहाची सही घेतली, त्याच जागीं त्याच टेबलावर जर्मनीचें उट्टें काढण्या-करितां फरान्सनें महायुद्धानंतर १९१९ सालीं जर्मनीकडून सही घेतली. ह्या

जागेमध्यें आल्यावर 'कालाय तस्मै नम:' असेंच वाटतें. सह्या करतांना जित राष्ट्रांना कोण यातना झाल्या असतील ! असो. नंतर बाग पाहिली. बरोबरचा वाटाड्या मोठा घाईचा होता. ४ लाच परत जाण्यास निघालों. मोटार बैलगाडीप्रमाणें चालत होती. ह्यांनी विचारले काय काही बिघडलें काय ? तर म्हणाला "Oh are we in a hurry to go we are going for excursion and where is the hurry then !" मी खूप हंसलें व म्हटले काय लबाड माणूस आहे. नंतर परत आल्यावर मोटार स्टॅंडपासून आम्ही Louve Garden मध्यें गेलो. कारजी सोडलीं होतीं. खूप पुतळे आहेत, तेथे फोटो घेतले व पायीच घरी आलों.

## २ नोव्हेंबर

आज सकाळी पायीच हिडत त्याच बागेत आलों. ऊन पडलें होतें. जरा बाकावर बसलों. मग जायला निघालो. तों एक इंग्रजी बोलणारा मनुष्य तुम्हाला Perry Palace माहीत आहे कां म्हणून विचारू लागला. नंतर पुष्कळ बोलला. Canada येथील Montreal चा मी डॉक्टर आहें. माझा बाप कलकत्त्यास Jute Merchant आहे. त्याला भेटा वगैरे म्हणाला. नांव Dr. John Duncan म्हणून सागितले. असो. नंतर तो गेला. आम्ही पायीच पार्लमेंट हाऊसवरून आलो. त्यावर Fraternity, Equality, Freedom असें लिहिलें होतें. एका प्रचंड पुलावर आलों. काय त्याच्यावर सोनेरी रगाचे पुतळे ! मोठा छान दिसला. नतर एका रेस्टॉरंटमध्यें खाल्ले. मग पुनः खूप हिडून सिनेमाला गेलों. "Mr. Deed goes to Town." हा चित्रपट बोधपर व छान होता. ५ ला एका लहान cafe मध्ये उभ्यानेंच कॉफी घेतली व घरी गेलों. ७ वाजतां Conference मधील ओळखीची, Madam Drefus Barney ही भेटायला आली. पॅरिसमधील संस्था मला दाखविण्याची तिनें व्यवस्था केली. मला फुलें आणली होती. ती आठ वाजतां गेली. नंतर आम्ही जेवलों; व रात्री इकडे तिकडे भटकलों.

## ३ नोव्हेंबर

आज सकाळीं Madam Barney यांनीं एक बाई माझ्याबरोबर शिक्षणसंस्था दाखविण्यास दिली व आम्ही गेलों. मुलांच्या शिक्षणाच्या शाळा कशा तऱ्हेनें उतम करतां येतील यासबंधी तेथें तज्ज्ञांचे विचार-विनमय होतात. कोणती बांकें, कोणता सिनेमा, कोणतीं पुस्तकें चांगलीं ह्यांचें जवळजवळ प्रदर्शनच होतें.

तेथून Rescue Home मध्ये गेलों. हें एका Banker च्या बायकोनें चालविले आहे. येथे फक्त मुलांची मानसिक परीक्षा घेतात. त्यांची राहण्याची जागा निराळी आहे. ४० बायका येथें काम करतात.

पहिली शाळेची सस्था Ministry of Education ची आहे. तेथून Young Women's Christian Association मध्यें गेलों. तेथें सर्व देशाच्या दीडएकशें मुली आहेत. त्या तऱ्हतऱ्हेचे शिक्षण घेतात; खर्च फारच थोडा येतो ही अमेरिकन सस्था आहे. Miss Watson ह्या मुख्य. त्यांची ओळख झाली. नंतर मला तेथेंच Lunch दिला. मोठी सुदर व्यवस्था होती. मग आम्ही घरी गेलों. ही बाई फार चांगली होती. तिला मीं चहा दिला. नतर रात्री जेवून आम्ही भटकण्यास गेलों. रात्रीची Cafe सर्व भरलेलीं. कोठें Orchestra तर कोठे Dance. दिवे तर कांहीं विचारायला नकोत. रात्री एकेक वाजेपर्यंत दारू व बायका, अशी मजा चाललेली दिसायची. एकेक जण बाईचा हात धरून चालला आहे. पॅरिस अतिशय शोकीन. ह्या लोकांना भटकल्याशिवाय व Cafe मध्यें जाऊन मजा केल्याशिवाय कसची झोंप येते. पॅरिसचे चैनीचे प्रकार मात्र मजेचे एवढें खरें.

## ४ नोव्हेंबर

आज Miss Napier Ford, Conference ची Interpretor मजकडे आली. ती मला अत्यत आवडे. म्हणतात ना ' व्यतिषजति पदार्थान्तरः कोपि हेतुः' एवढेंच. ती वयानें ४३ वर्षांची, दिसावयास चांगली व तिचें भाषण पण फारच गोड लागे. बहुतेक मोठाल्या सर्व Conferences मधून ती Interpretor असते. एक वेळेस ती Land & House Mortgagesचा

धंदा करी. खूप पैसा मिळविला. स्वतःची मोटार पण होती. तिनें १९ वर्षांची असतांना फरान्समध्ये शिपायांची शुश्रूषा केली. किती हुषार बाई! पुरुषाप्रमाणें कसे पैसे मिळविते!

ती व मी मिळून एक मोठा सरकारी दवाखाना बघण्यास गेलों. तो एका फरेंच बाईनें दाखविला. मोठी चागली होती ती. दवाखान्यांत बायकांची ३० वर्षांपूर्वी Social Service League स्थापन झाली. ह्या बायका गरीब रोग्यांची विचारपूस करतात. ते दवाखान्यात असतांना घरच्या मुलांबाळांची व्यवस्था, पैसे, अन्न, कपडे, विमा उतरविणें, वगैरे गरीब आयाबहिणीची काळजी घेतात. गरिबाच्या घरी जाऊन क्षय वगैरे रोगांचें निर्मूलन करतात. आयांना स्वच्छता शिकवितात आणि अशीच किती तरी कामें करतात. तेथील बाळतिणीचा Ward व क्षयरोग्याचा Ward पाहिला. सर्व बायकांनीं हिंदुस्थानची माहिती विचारली. 'आभाळच फाटलें त्याला ठिगळ कोठवर जोडणार?' मोठें कठिण काम आहे म्हणाल्या. असो. नंतर त्या दोघीना मी एका मोठ्या Fashionable Restaurant मध्यें Lunch दिला. एक पौंड पडला. त्या दोघीची व माझी खूप गट्टी जमली. मी कोठेंही बाहेर कामाला गेलें कीं, सर्वांना तेव्हांच आपलेसें करून टाकी. असो. त्या दोघीचा निरोप घेऊन मी पायीच Rue dula Madelienela वरील बाजूनें घरीं आलें. (Miss Ford व मी एकाच बशीतून Pudding खाल्लें. मी तिला म्हटलें, आज माझ्या बहिणीप्रमाणें तूं केलेंस. ती व मी असेंच खातों.)

आज रात्री आम्ही दोघे Miss Napier Ford कडे जेवायला गेलों होतों. तिची मैत्रीण व ती एकाच Flat मध्ये असत. किती सुंदर फर्निचर व व्यवस्था. बायका म्हणून कांहीं कमी आहे कां? आम्हीं खूप गप्पा मारल्या. जेवणही चांगलें होतें. Miss Ford मला अत्यंत आवडे. आज दुपारी कामावरून परत येतांना रस्त्यांत त्यांना तो कॅनडाचा डॉक्टर John Duncan पुन: Rue Lafayatte जवळ भेटला. गप्पा मारल्या, कॉफी घ्यायला चला म्हणाला. पण हे नको म्हणाले. उद्यां आपण Perfumery Works बघायला जाऊं म्हणून म्हटलें. हे पण कबूल झाले, व घरीं आले. आज सकाळपासून त्या बायकांचीं सामाजिक कामें पाहून व हिंदुस्थानची दुर्दशा आठवून माझें डोकें तापून गेलें होतें. शिवाय दवाखाना

पाहिला की मला नेहमीच चैन पडत नसे. रात्री ३–४ च्या पुढें मी व माझ्यामुळें हे जागत. दोघांच्याही मनांत सुखदु:खाच्या विचारानें काहूर उठवून दिले होतें. मला एका कवितेची आठवण झाली. ' रात्रिर्गमिष्यति भविष्यति सुप्रभातम् ' व अखेरची ओळ ' हा हन्त हन्त नलिनीं गज मुज्जहार ! ' रात्रीच्या भयाण वेळीं परदेशांत आपल्या नातलगांपासून हजारों मैल दूर असल्यावर असें एकादे काहूर उठतें नाहीं ! वरील कविता आठवून तर कसेसेंच झाले. कोण जाणे सकाळी कांही अनिष्ट होणार होते म्हणूनच डोळ्यास डोळा कांहीं लागेना !

## ५ नोव्हेंबर

सकाळीं ८ ला उठलो. हे ९॥। वाजता Hotel Bohy Lafayatte जवळ Duncan ची वाट पाहात उभे राहिले. जातांना मीं म्हटले ' मनुष्य माहितीचा नाही, पैसे जपा ह. कांही तरी तो करील ' मला त्याला पाहिल्यापासून संशय येतच होता. ' बायकांचे मन संशयी.' हे म्हणाले, ' मला कांही कळते आहे की नाही का अगदीं मी वेडा आहे ? ' मी घरीच राहिलें, कारण रात्री Young Women's Christian Association मध्यें माझें व्याख्यान व्हायचें होतें, त्याची तयारी करायची होती. सगळ्याच वेळा जमून आल्या. नेहमी मी बरोबर असें. आजच काम निघालें. असो. हे लवकर आले परत, मी म्हटले का लवकर ? हे अगदी रागावून सांगायला लागले : माझें सगळें गेलें. पैसा व घड्याळ पण; Perfumery नाहीं नि कांहीं नाही. Confidence Trick केली त्या डकनने. ३० वर्षांचा, उंचबिच, दांडगा, डोळ्याला चष्मा लावलेला असा फॅशनेबल दरवडेखोरच होता तो ! ह्याना मोटारीतून कॅफेमध्ये नेले. दुसरा एक मनुष्य त्याचा साथीदार होता. त्याच्याजवळ २०,०००–३०,००० फ्रँकच्या नोटा (खोटया असाव्यात) व पिस्तुलदेखील होतें. ह्यांना Gare Du la East च्या समोरील Cafe मध्यें नेलें. व पिस्तूल दाखवून लुबाडून, बुचाडून पाठविलें. त्यांचें घड्याळ जे किती हौशीनें घेतलें होतें ? ह्यांचा स्वभाव खर्चिक व धर्मादाय करणारा. इतकी वर्षे सोन्याचें घड्याळ घेतां आलें नाहीं. तेव्हां या घड्याळाचे त्यांना कोण कौतुक वाटे ! किती वेळां म्हणत

'ए, हें माझें घड्याळ पहा.' आपलें नसलें म्हणजे राहायचें नाहीं एवढेंच ! एकूण १५–२० पौंडांचें नुकसान झालें. अशा तऱ्हेनें आम्हां दोघांना फारच वाईट वाटलें. कांही चैन पडेना. झालें तें झालें. एवढ्यावरच निभावले, ही देवाची कृपा म्हणायची. आतांच्या आतां पॅरिसहून निघून जावेंसे वाटलें. माझें व्याख्यानच होतें म्हणून राहिलों. काय हुषार चोर येथले. शिवाय बुडायची वेळ आली म्हणजे मनुष्य कसा वेडा बनतो, ह्याचें हें उत्तम उदाहरण आहे. अगदी अखेरपर्यंत ह्यांना त्या दुष्टाचा संशय आला नाही. पॅरिस येथेही परकीयांची अशी टोळी आहे. आमच्या ओळखीचे रा. देवधर यांच्याही खिशांतून पण असेच एका बाईनें ३०० रुपये लांबविले. ह्यांच्याजवळचे सर्व पैसे गेले; फक्त 85 Francs घरीं होते ते वांचले. पॅरिसमध्ये एकंदर भीति फार. रस्त्यातून लोक पाठीमागे लागत. Come, I will show you nice things : म्हणजे नग्न मुली व अनन्वित प्रकार दाखवावयाचे,व मग पैसे लुबाडावयाचे. त्याचा काय नेम ? पुष्कळ Foreigners मुद्दाम अशा जागी जातात. त्यामुळे नांव बद्दू झालेले आहेच. तेव्हां आमचा हा प्रकार कोणाला सांगायचीदेखील चोरीच झाली. लोकांना वाटेल की, हेही असें कोठे गेले असतील. कारण आपले लोक येथें असले घाणेरडे प्रकार पाहतात. Paris चें Night Life अत्यंत भयाण जागी Underground मध्यें. तेथें सर्व वेश्या, दारू, जुगार असले अत्यंत निंद्य प्रकार आहेत. जागोजागच्या वेश्या. एकंदर येथे कांही रोग होईल की काय अशी भीति वाटे. घाणेरडे गांव. असो. वरील प्रकारानें आमचा जीव अगदी विटून गेला. म्हणून घराबाहेर पडलों. आज कांहीच गोड लागेना. मग खाऊन ४ वाजतां परत आलों. व्याख्यान तयार केलें. ७ ला जेवलों व बसनेंच गेलों.

टॅक्सीला पैसे कोठें होते आज ! Y.W.C.A. चें ठिकाण केव्हांचें सांपडेना. अखेरीस वेळेवर मिळालें. Miss Watson च्या अध्यक्षतेखाली 'Indian Womanhood, Religion' ह्या विषयावर बोललें. मुली ५० होत्या व बहुतेक सर्व देशाच्या. मग सारखे खूप प्रश्न विचारले. मींही छान उत्तरें दिलीं. कॉलेजच्या व फॅशनेबल देशाच्या मुली, शिवाय तयारी मुळींच नव्हती, व जीवही स्वस्थ नव्हता; पण व्याख्यान पुष्कळच त्या मानानें चांगलें झालें. मुलींना फारच आवडलें, व त्यांची समजूतही पटली. मला वाटलें, .कसें

होईल ? विचार पटतील की नाही ? असो. ८॥ ते १०॥–११ पर्यंत हें चाललें होतें. त्या सर्वांना मी आमची झालेली चोरी सांगितली. अशा मन:स्थितींत मी इतकें चांगले बोलूं शकलें म्हणून त्यांना कौतुक वाटलें. हे थडीत माझी वाट बघत बसले होते. कारण आज मला एकटी जाण्याची भीति वाटू लागली. पायी निघालों. रस्त्यानें एक बंगाली विद्यार्थी कलकत्त्याच्या Chakrabere रोडवर राहणारा भेटला. बोलतां बोलतां चोरीची गोष्ट त्याला पण सांगितली. त्यानें ती फरेंचमध्ये एका पोलीस शिपायाला समजावून सांगितली. सकाळी ठाण्यावर जाऊन सांगा, शोध लागेल असें तो म्हणाला.

## ६ नोव्हेंबर

आज सकाळी जवळील पोलीस ठाण्यावर गेलों. कोणाला काही कळेना. लोक पण चागले नव्हते. नंतर एक मुलगी इग्रजी बोलणारी भेटली. तिनें सर्व समजावून सागितलें. ते म्हणाले, Gare Du la East येथील ठाण्यावर जा. टॅक्सीने गेलो; तेथेंही कोणाला कळेना. मग Mr. Vintenan (ह्याच्या ओळखीचे एक कारखानदार) ह्यांना टेलिफोन करून त्याने इंग्रजीचें फरेंच भाषांतर करून Telephone नेंच अधिकाऱ्याना सागितले. आम्ही आमची तक्रार लिहून दिली. असो अशा तऱ्हेनें हे प्रकरण मिटलें; व आम्ही मोटारीत बसलों. पॅरिसला नमस्कार अगदी कोपरापासून केला. पुन: पॅरिसला जायचें नाही ! ! Duncan मात्र जन्मांत विसरायचा नाही. माणसानें पैसा वांचवावा. पुष्कळ वेळा कधी चहा तर कधी जेवण नाही, असें केलें कारण परदेशांत आम्हा तिघांचा खर्च फार व हे असे २००/३०० रुपये गेलें व अशा घातकीपणानें. १२ ला Gare Du Nord स्टेशनवरून पॅरिसहून निघालों; ३॥ वाजतां Calais आलें; नंतर S. S. Canterbury नें Dover पर्यंत आलों. इंग्रज व इंग्रजी भाषा पाहून आपलेपणा वाटला. संवयीचा परिणाम. १५० वर्षें इंग्रज आपल्यांत. तेव्हां कसें कां होईना ते संवयीचे आहेत हें तर खरे. रात्रीं ७। ला Fellowship Club, London ला गेलों. तेथें तर घरच्याप्रमाणेंच वाटले. आज आपलें जेवण पण मिळालें. तोंडाला कशी छान चव आली.

तेवढ्यांत चबीचा फोन आला. मग तर फारच आनंद. १॥ महिना ती दूर होती. रात्रीं तिला आणलीच नाहीं फार वेळ होईल म्हणून. रात्रीं पत्रें लिहून झाल्यावर Oxford Street वरून हिंडून आलों.

# प्रकरण सहावें

## लंडनला परत

### ता. ७ नोव्हेंबर १९३६

आज हे High Commissioner च्या ऑफिसमध्यें व P. & O. Bank मध्यें जाऊन १२। ला Thomas Cook मध्यें आले. मी येथून एकटीच पायीं Thomas Cook मध्यें जाऊन बसलें. हे आल्यावर घरची पत्रें वाचली व आम्ही Bond Street Station वर पायी गेलों. तेथून Tube नें Liverpool Street स्टेशनला गेलों. आज अगदीं एकटी अशी प्रथमच मी Escalator वर चढले व उतरलें. अद्यापही थोडी भीति आहेच. तेथून L. N. E. R. आगगाडीनें Ilford ला गेलों. नतर Tram ने Barking Side, 3/2 Horns Road वर Mrs. Othic च्या घरी चबीला आणण्यास गेलों. Miss Edwards, या Australia ला गेल्यामुळें चबी महिनाभर ह्यांच्याकडे होती. Joan, Peter, Mickey, अशीं तीन मुले त्यांना होती. Mrs. Othic नी चबीला फारच चांगलें म्हणजे पोटच्या मुलाच्या वर वागवलें. चबी पण मुलांत आनंदांत होती. म्हणून आम्हांला मुळीच काळजी वाटली नाही. असो. मुलांना 25 Shillings आम्ही खाऊला दिले. Mrs. Othic व Mr. Othic फारच सज्जन लोक होते. असो. चबीला घेऊन आलो. सामान खूप होते. आम्हांला थोडीच उचलायची संवय. घरी १० नोकर. येथें पाण्यासारखा पैसा खर्च करून, दम छाटेतों ओझे उचलायचें; थोड्या पैशांत खुप सुख हिंदुस्थानांतच खरें! नंतर Paddington Station वर Lyons मध्यें जाऊन चहा घेतला. ह्या दुकानातला चहा व इतर सर्वच गोष्टी आम्हांला फार आवडत. चहा येथला तर फारच चांगला असे. माल स्वस्त, उत्तम व चटकन् मिळे म्हणूनच ह्या दुकानांत अत्यंत गर्दी असे. नंतर पायी हिंडून घरीं आलो. ७ ला जेवण झालें. ८ वाजतां रा. तावडे भेटण्यास आले. मोठ्या अरिष्टा-तून ते सुखरूप उठून आपल्या पायानें चालत आले, हें पाहून अत्यंत आनंद

वाटला. खूप गप्पा मारल्या. मग ते ९ ला गेले. हे व चबी Paddington Station वर त्यांना पोहोंचवून आले. अशा तऱ्हेनें मी सभेला जायच्या आदल्या दिवशीं चबी जाणार, मी एकीकडे तर हे एकीकडे, रा. तावडे दवाखान्यांत अशी जी चिंताजनक स्थिति होती, ती आज अशा चांगल्या तऱ्हेनें १॥ महिन्यानें पुनर्मीलन होऊन दूर झाली.

## ८ नोव्हेंबर

आज आदितवार. हवा साधारणच होती. गार वारा सुटला होता. आम्ही तिघे हाइड पार्कमध्यें ११ च्या सुमारास गेलो. ह्यांनीं चबीचा व माझा फोटो घेतला. हाइड पार्कमध्यें आदितवारी जाण्याची गमत असे. लहान मुलें, बायका, पुरुष सुट्टीची खूप मजा करीत. सरोवरांतल्या हंसाशीं मुलें खेळत, तर कोणी लहान लहान जहाजें पाण्यांत सोडून खेळत. ह्यांचे खेळ देखील बोधप्रद. त्या लहानग्या जहाजांची किमत देखील किती तरी असे. पैसा मिळवावा व त्याचा उपभोग तेच घेऊं जाणे. शिवाय जिन्नस घेतली कीं तिचा नीट उपयोग व्हायचाच! ती धूळ खात पडायची नाही. कामाच्या वेळेस भरपूर काम, व खेळाच्या वेळेस पोराबरोबर पोर होऊन खेळणें हा पाश्चात्यांत मोठा गुण आहे. खेळणें व त्यामुळें नित्याचा व्यवसाय विसरणें हें शरीराला ताजेतवानें करणारें मोठें रामबाण औषध आहे. हे लोक आदितवारी ९ शिवाय कधी उठायचे नाहीत. रोज तरी लवकर उठण्याचा लकडा कां? नोकर-चाकर, ह्यांना देखील कोणाला अर्धी तर कोणाला पुरी विश्रांति. आज पोस्ट बंद. पत्रें मुळींच मिळायचीं नाहींत. बहुतेक शनिवार दुपार ते आदितवार सबंध सर्व कांहीं बद. शरीराला जपायचें कसे, ते जास्त दिवस जगवायचें कसें, आहे यापेक्षां तरुण कसें दिसावयाचें हें ह्यांनाच माहीत. ते त्याच्याकरितां काय पाहिजे तें करतील, पण रूप व प्रकृति वाईट दिसूं द्यायचे नाहींत. आदितवारीं हाइड पार्कमध्यें म्हातारेकोतारे, संधिवातानें शरीर आंखडलेले असे खुर्चीवर घालून, चाकाच्या गाडींत ज्याचा तो, ही फरफटीत नेतो, असे सर्व निसर्गाचा उपभोग घेण्यास याचचेच. प्रत्येकाला प्रत्येक गोष्टीची पूर्ण मुभा आहे. अंगांत विकृति असली म्हणून घरांत जें कोंडून खिचपत पडायचें तें

इहलोक सोडल्यावर 'दरवाजां'त दिसायचें, असें कां ? असा मनुष्य कांहीं कोणाच्या कडेवर बसून जात नाहीं. त्याला नेतो कोण ? बाकी येथे जो तो आपले स्वतःचें सुख पाहतो. घरी कोणाकरितां कोणी रडत बसत नाही. त्याला चाकाच्या गाडीवर बसविलें की काम झाले. असो. अशी हाइड पार्कमध्ये मोठी गंमत असे.

येथील Serpentine मध्यें तरुण मुलेमुली बोटीतून विहार करीत, तर एका बाजूस गोरीपान पोहण्याकरितां उघडी केलेलीं अंगे मोठी सुरेख दिसत, तर रस्त्यावर मोटारीच्या रांगा लागून कोणी वाचीत बसत, तर कोणी विलास करीत, एकमेकाच्या स्पर्शसुखाचा अत्यानद उपभोगीत. आमच्या सारख्यांना वाटते की, हे कसे सर्व आनंदी, कसे तरतरीत. मजा आहे खरी. एक वेळ असें वाटे की, आमच्या हिदुस्थानांत सुट्टी असली, कीं सर्व मुलें, पति आज घरांत राहतील, एकमेकांचा प्रेमळ सहवास घरांत मिळेल, सर्व दिवस एका जागीं बसूं, बोलू व गृहसौख्याचा आनंद लुटू. आम्हांला आमचें घर म्हणजे सर्व सुख. येथे पाहावें तों सर्व लक्ष घराबाहेर. असें कां ? अशानें गृहसौख्याचे धागे शिथिल होत नाहीत का ? बरें कामानिमित्त रोज मुलें व पुरुष बाहेर असतातच. मग आठवड्याकाठी एकादा दिवस घरांत राहणें वाईट थोडेच. उलटा तो एक बदलच होतो. वाटेल ते कपडे घाला, झोंपा व कांही करा. आज कोणाचें कोणी बांधलें नाही एवढें खरें ! लाडकीं मुलें रविवारची घरीं असली म्हणजे आईला किती बरें वाटतें. एकादा आवडीचा जिन्नस करायचा असला तर तो त्या दिवशीं होतो. मग सगळ्यांनीं बसून नीट खायचा, वडील, मुलें, ह्यांना पत्नीच्या, आईच्या, प्रेमळ हातांनी तो मिळायचा. आणि त्यांत सर्व प्रेम सांठलेलें असायचें. किती रम्य दृश्य तें. असो. हाइड पार्कमध्यें लोक घोड्यावर बसत. एके ठिकाणीं सुदर Cafe असे. तेथें चहाची खूप गर्दी असे. आम्ही तेथें कधींच घेतला नाहीं म्हणा. लहान मुलांच्या ढकलगाड्या, कुत्री, सगळ्यांची एकच गर्दी. वरवर पाहणाराला तरी हें दृश्य मोठें मनोहर वाटे.

आम्ही १ला जेवण्यास घरीं आलों. कारण आदितवारीं रात्रीं स्वयंपाक करणाऱ्याला सुट्टी, म्हणून थंडा फराळ. दुपारींच बरें जेवण मिळे. मग

कोठेंच गेलों नाही. रात्रीं जिनीव्हाहून आलेले डॉ. राम आमच्याच हॉटेल मध्यें राहिले व सकाळीं उठून विमानाने जिनीव्हास गेले.

## ९ नोव्हेंबर

आज पायीच Thomas Cook कडे गेलों. नंतर 180, Piccadilly येथील Galdvin Jewellers ह्यांच्याकडे जाऊन Canteen ची (काट्या चमच्यांचा सेट) Order देण्यास गेलो. नंतर जवळील Lyons मध्यें Lunch घेऊन Trafalgar Square मध्ये नेल्सनच्या पुतळ्याजवळ नव्या निवडून आलेल्या Lord Mayor चा Show पाहिला. तऱ्हे-तऱ्हेचे पोषाख, बॅंड व सन १७०० सालापासून ते आतांपर्यंतचे लढाऊ पद्धतीचे व सैन्याचे नमुने मिरवणुकीत होते. खुद्द Lord Mayor ची पालखी जुन्या तऱ्हेची व घोड्यांनी चालविली होती. सर्व जुना थाट. किती छान दिसला. जुन्या वंशपरंपरागत चाललेल्या गोष्टीस नेहमीच शहाणे लोक मान देतात. लॉर्ड मेयर गांवांतील अतिशय श्रीमंत व नांवलौकिकाचा मनुष्य असतो. राजाखालोखाल त्याचा मान. आज रात्रीं Guild-Hall मध्यें मेजवानी. त्याचा व ह्या मिरवणुकीचा खर्च १०,००० पौंड त्यांना द्यावा लागतो. ज्याची सापत्तिक स्थिति फारच अवाढव्य अशांनाच हा मान मिळतो. ह्यांचा पगार थोडा पण त्याच्या त्याना दुप्पट तिप्पट खर्च करावा लागतो. अशा ह्या गोष्टी राज्यकर्त्यांच्याच देशांत पाहण्यास कोण गर्दी लोटली होती. पोलिसांची काय व्यवस्था उत्तम. कसे सर्वांना जपून मार्गाला लावीत. नाही तर कलकत्त्यास हौऱ्याच्या पुलावर सार्जंट आपल्या लोकांना मारतांना आम्ही पाहिलेलें आहे. 'आपण कोण जनावरे आहोंत का? पोलिस रक्षणाकरितां, कीं दंडुक्यांनी मारण्याकरितां? त्यापेक्षां वाहनाखाली मेलेलें काय वाईट? कोणीकडे देशाचा व प्रजेचा सेवक इकडचा पोलिस! त्याच्याजवळ गेलों म्हणजे जीविताची सुरक्षितता वाटते. आम्ही हें केव्हां शिकणार! कां असेच आमचे शिपाई जनावरासारखे आपल्याच बांधवांना मारणार! लोक जर अडाणी असले, रस्ता ओलांडायचा कसा हें कळत नसले, तर दोष कोणाचा? शिकवल्यावर, पोपट बोलतो. कुत्रा काय वाटेल तें करतो; मग मनुष्य हें करूं शकणार नाहीं काय? फरक एवढाच कीं, आम्हांला कोणी शिकवीत नाहीं.

## १० नोव्हेंबर

आज हाइड पार्कमधून Hyde Park Corner वरून Thomas Cook कडे गेलों. हा रस्ता व Cook कडे जाणें हा आतां रोजचाच जवळ-जवळ कार्यक्रम होऊन बसला होता. तेथून Shaftsbury Avenue मधील Lyon मध्यें दुपारचें खाल्लें व मग Automobile Association मध्यें ह्यांचें काम होतें म्हणून गेलों. नंतर पायीच चालत चालत Regent Street वरून Oxford Street वरील Woolworth मध्ये तेल व आणखी कांहीं सामान घेतलें. नतर ५ वाजतां घरी आलो. एका दुकानांत Regent Street वर चबीला काही खेळ घेतला. त्याला १६ शिलिंग पडले. पैसे नासते म्हणून मी खूप तिच्यावर रागावले. हे म्हणत तिच्या नशिबाने सर्व आहे. तेव्हां तिची कोणती हौस नको राहायला. माझें म्हणणें, दिवस फार कठिण तेव्हां मुलीच्या जातीने पैसे जपण्यास शिकावें. बाकी हे म्हणाले तेंच खरे. जपणे हें तर जन्माचेंच लागलें आहे. आहे तोंपर्यंत मजा करावी, पुढचे कोणी पाहिले ?

## ११ नोव्हेंबर

आज Armistice Day असल्यामुळे ४४ नबरच्या बसनें आम्ही Trafalgar Square जवळ, राजा Cenatoph वर Wreaths ठेवायला येणार होता तें पाहण्यास गेलों. लोकाची खूपच गर्दी होती. ज्याच्या त्याच्या कोटावर Poppy होत्या. गरीब, मजूर, भिकारी, सर्वांनीं विकत घेतल्या होत्या. पहा कसे आपल्या मृतबंधूंचें कौतुक करतात ! नाहीं तर आम्ही नाताळचा सण करूं, पण दिवाळी करायला नको. येथील लोक उत्सववादी तरी किती ! बायका Poppy घेऊन हास्यवदनानें विकत होत्या, आणि सगळीकडे एकच गर्दी होती. ११ वाजतां तोफा उडून दोन मिनिटांची स्तब्धता (Silence) होती. एवढया गर्दीची जागा; पण त्या तोफांच्या आवाजाबरोबर जागच्या जागी सर्व चित्रासारखें शात. लहान मूल देखील चूप ! मोटारी, ट्रॅम, बस कशाचा आवाज नाही. Trafalgar Square जवळील कबूतरांच्या फडफडण्याचा मात्र आवाज आला. म्हटलें पहा, काय ह्यांचें शिक्षण ! एवडा जनसमूह व रहदारी पण सर्व कसें चूप राहिलें. शिस्त ही सर्व

जागीं पाहिजे. व लहान मुलापासून ती आहे. रडूं नको, चूप बैस म्हटलें म्हणजे मूल बसलेंच गप्प.असे गुण आहेत म्हणूनच ते आमच्यावर राज्य करतात.आम्हीं अशी गोष्ट सभेंत उच्चारली तर सभा आमचा निषेध करील. असो. नंतर आम्ही Thomas Cook कडे गेलों. व मी बसने Victoria Station वर गेलें. तेथून Birth Control Information Bureau (International) Parliament Mansion, Orchard Street, London S. W. I. येथे गेले. त्याची खजिनदार Dr. Mrs. Guy हिनें मला Lunch ला बोलाविले होते. समोरील Restaurant मध्यें खाल्लें. हिंदुस्थानांतील संततिनियमनाची माहिती त्यानी मला विचारली, व इकडील नवी माहिती मला सांगितली. नंतर पुनः एकदां भेटायचें असें ठरवून मी निघाले. २॥ वाजता Victoria Station वर जाऊन थांबलें. हे व चबी Lyons मध्ये खाऊन तेथे आले. २।५१ च्या गाडीनें आम्ही ह्यांचा Retired Chief Electrical Engineer Mr. Gundry ह्यांच्याकडे Cheam येथे गेलो. आज पाऊस तर सारखा होताच. त्याचा २००० पौंड किंमतीचा बंगला 72, Sandy Lane येथे आहे. एक Maid कामाला. बाकी सर्व बायको व मुलगी करतात. माळी थोडा वेळ कधी तरी येतो, त्यास आठवड्याचे १० शिलिंग पडतात. लहान मोटार आहे. घराचें नांव Aur Thora, (और थोडा. हिंदुस्थानी) असें ठेवलें. साहजिकच आहे. सहवासाचे प्रेम. ३०।३५ वर्षे एवढ्या ऐश्वर्यांत जेथें काढलीं त्याचे का नाहीं प्रेम वाटायचें? Mr. and Mrs. Gundry शी आमचे दोघांचें सख्य असे. तेव्हां जाऊन भेटावें म्हटलें. एवढ्या थाटांत राहिलेले, पण आतां राहणी मध्यमच असे. तरी अजून स्वतः ते नोकरी करतातच. पहा काय तरतरी आहे ती! एक मुलगी व ती घरकाम सर्व करतात. दोन मुलगे पैसे मिळवीत व शिकत आहेत. कसें सर्व सुंदर आहे. मुलगे पण जवळच आहेत. हीं माणसें आपलीं साधीं व मोठी व्यवहारी.

## १२ नोव्हेंबर

आज सकाळपासून पाऊस पडत होता. हे व चबी Holborn ला

गेले. मी Associated Countrywomen of the World, 26, Eccleston, Street, near Victoria Station येथें बसनें ११ वाजतां गेलें. ह्या सस्थेची सभा ११ ते ५ पर्यंत चालू होती. सर्व सभासद आपलेकडील व कानडा वगैरे देशाच्या गव्हर्नर–व्हाइस-रॉयांच्या नात्याच्या व "Lady" अशा होत्या. Lady Elenor Cole ह्या अध्यक्ष होत्या. Mrs. Charles Russell ही Organizing Secretary. Mrs. Zimmern ह्या पण ह्याच सस्थेत आहेत. त्याची व माझी गांठ Dubrovnik ला झाली. ह्या बाई फारच चागल्या. मला त्यांनीं पुष्कळ मदत केली. आजचें माझे व्याख्यान त्याच्यामुळे झाले. १६ तारखेचें बोलावणेंही त्यांच्याचमुळें मिळाले. ११ ते १ त्यांचे Report वाचन वगैरे झाले. एक वाजतां सर्व जणी शेजारील हॉटेलमध्ये Lunch ला गेलों. Miss Zimmern ने मला आपली guest म्हणून नेले. नंतर सभेला पुनः सुरुवात झाली. Dubrovnik Conference ची हकीकत Mrs. Baxludale Newbury ह्यानी सागितली. नतर माझे Modern Woman of India and The Hindu Religion, या विषयावर २० मिनिटे व्याख्यान झालें. चांगलें झालें. नंतर Divorce, Condition of Deserted Wives, Purdah ह्या गोष्टीवर बायकानी प्रश्न विचारले. मी पण भराभर उत्तरें दिलीं. सर्वांना फारच आवडले. एक तर ज्या गोष्टी खऱ्या त्या मी लपवून ठेवीत नसे. You are very frank that is why we like you असें मला त्या म्हणत. माझें बाहेर नेहमीच सर्वांशी जमे. एवढी परमेश्वर-कृपेनें देणगी होती. भाषण ऐकण्यास २५–२६ बायका व त्या जगाच्या सर्व भागांतील होत्या. Latvia, Czecoslovakia, Canada, America, Queensland, Australia, New Zeland अशा सर्व ठिकाणच्या होत्या. भाषणाच्या वेळीं टाळचा व Hear, Hear असें पुष्कळदां म्हटलें जाई. आजही मला धास्तीच होती. कारण लंडनमध्यें व प्रसिद्ध अशा थोरामोठ्यांच्या बायकांत मला बोलावयाचें होतें; तथापि सर्व जणी फारच चांगल्या, साध्या व अगदीं सरळ स्वभावाच्या दिसल्या. सभा चालवितांना कोणाचें मन न दुखवितां, टोंचून, अरेरावीनें न बोलतां, वेळेवर व मिनिटाबरहुकूम काम होई. मुख्य गोष्ट म्हणजे कोणाला हिणवून टोंचून न बोलतां हंसतमुखानें,

गोडीने व देशाचे काम आहे ह्या सद्भावनेनें सर्व काम करीत. एकाद्याला हाणून पाडायचें असें कधींच कोठें दिसलें नाही. सर्व काम वेळेवर. ११ ला तर ११ ला सुरुवात! सारखा पाऊस! सकाळची वेळ! पण सर्व वेळेवर हजर! १ ला जेवण. चारला लगेच चहा. कसली अडचण म्हणून नाहीं. Typing तरी किती जणीना येतें. मधूनच Telephone Calls; पण त्यांची हुषारी दांडगी. शिवाय मदत करण्याकरितां कशा तयार असत. गर्व, ऐट मुळीच नाही कोणाला. एवढ्या मोठ्यांच्या बायका पण अगदीं साध्या. सामाजिक काम करायला गेल्यावर नट्टापट्टा करायला फुरसत कोठची! मला आजच्या सभेपासून खूपच शिकायला मिळालें. आणखी एक महत्त्वाचा प्रश्न त्यांनी मला विचारला, "हिंदुमुलसमानांचें सख्य होण्याकरितां बायका काय करितात?' आणि हा प्रश्न स्त्रियांनी हाती घेण्यासारखाच आहे. ह्याला चालना द्यावयाची एवढे ठरले. हिंदुस्थानांत गेल्यावर Milk Marketing Board, साक्षरता, बायकांना Politics शिकवायचे असा निश्चय केला आहे. बघावयाचें काय काय घडते तें.

## १३ नोव्हेंबर

आज हे Henley कंपनीत सकाळीच ९ ला त्यांच्या मोटारीतून गेले. Miss Zimmern नी कालच Ministry of Agriculture, 10, White Hall Place येथील Miss Alliyne ह्यांना मी आज ११ ला भेटायला येईन, असें टेलिफोनवर ठरवून ठेवले होते. तेव्हां मी चबीला घेऊन गेलें. मी येणार म्हणून त्यांनी दरवाजाजवळील Porter, Liftman, वगैरे लोकांना सागून ठेवलें होतेच. त्यामुळें सर्व चटकन् झालें. ह्या बाई चांगल्या वाटल्या. दुधाबद्दल प्रथम लोकमत जागृत करायला हवें. येथील लोकांनी तसें केले व नतर पार्लमेंटानें कायदा केला. तेव्हां तुम्ही पण हिंदुस्थानांत तसेंच करा. येथें Food Stuffs वगैरे गोष्टींचे कायदे आहेत. शिवाय दूधदेखील Dairying शिकलेल्या माणसानेंच काढायचें व विकायचे. वाटेल तो रस्त्यावरचा उठला व गवळी होऊं म्हणेल तर तसे नाहीं. ह्यांचें दर गोष्टीत शास्त्र! स्वयंपाकदेखील Course घेऊन शिकावा लागतो. जेथें तेथें Hygiene. त्यामुळें लोकांना

भाजी धुणें, दुधादह्याची व्यवस्था ठेवणें, माशा बसूं न देणें अशा गोष्टींचें शिक्षण आहे. त्यामुळेंच येथें हॉटेलें व रेस्टॉरंट्स इतकी उत्तम चालतात. प्रत्येक जण जबाबदारीनें काम करतो. शिळा, घाणेरडा, कच्चा, कमी दराचा माल वापरून दुकानदार कोणास ठकवीत नाहीत. त्यामुळें लोकांना जुलाब, पोटदुखी, ताप असे आजार होत नाहीत. येथें थंडी असल्यामुळे रोगाची भीति कमी. खरें पाहिले तर हिंदुस्थानात ह्या गोष्टीची किती काळजी घ्यायला हवी. दूध तेव्हांच नासतें. जिन्नस उघडा ठेवल्यास माशा, पाली, झुरळे ह्याचा उपद्रव! एकादे वेळेस प्राणघातक पण! नोकरांना भाजी धुवा, असें लाखों वेळां सागितले तरी त्यात ते चुकारपणा करतात. जिन्नस झांकून ठेवण्याचे कळत नाही. खरेंच विचार केला म्हणजे वाटते कीं, 'आकाश फाटल्यावर कोठवर ठिगळ जोडणार'! येथील नोकर तरी किती जबाबदार! ज्याची त्याला जाणीव असते. सांगावे काहीच लागत नाही. हुषारांचें राज्य ह्यांत तिळमात्र शका नाही. पैसा येथे खूप खर्च होत असला तरी त्याचे सुख पुरें मिळते. नोकराची कटकट नाही. आपल्याकडे मालकिणीला १० नोकर असून सारखें सकाळपासून संध्याकाळपर्यंत देखरेख करीत बसावें लागतें. शिवाय नोकरांचा व पतिराजाचा वाईटपणा व धाक ह्यापेक्षां एकादे वेळेस वाटतें गरिबी पत्करली पण ह्या नोकरातून सोडवा. अर्थात् येथील नोकरांना आठवड्यांतून दीड दिवसाची सुट्टी, Health Insurance वगैरे सर्व आहे. त्यांना अन्न व खोली चागली दिली पाहिजे असा सरकारी कायदाच आहे. मी आठवड्यातून प्रत्येक नोकराला पुरी सक्तीची एक दिवसाची सुट्टी देणार आहे. येथे येण्यापूर्वी मी बहुतेक सर्वांना मधून मधून द्यायचीच. पण आता नेमानें देणार आहोत. शिवाय ज्यांचा शक्य असेल त्यांचा विमा उतरावयाचा. त्यांच्यामध्यें विद्या शिकण्याची लालसा उत्पन्न करायची. विचार तर खूप केले आहेत. हातून काय घडेल तें खरें! एवढ्यामधून एकादें तर होईल. असो. नोकर शिकलेले, त्यामुळें टेलिफोन घेणें, ज्याचा असेल तो मनुष्य नसेल तर निरोप लिहून ठेवणें, जेथली वस्तु तेथें ठेवणें, ही कामें अगदीं चोख. शिवाय येथें कोणी कांहीं सहसा चोरायचें नाहीं. पैसे, कपडे, दागिने वाटेल तेथें टाका, तसेंच्या तसें जेथल्या तेथें राही. कोणाला कधीं हांकायला लागायचें नाहीं. Miss Alliyne नीं उद्यां Swanley ला

Dairy व Farming चें कॉलेज बघण्याची व्यवस्था टेलिफोननें केली. तेव्हां तें बघण्यास मी सकाळींच ९ ला Victoria Station वरून जाण्याचे ठरविलें. नंतर तेथून पायींच Thomas Cook कडे पत्रें पाहण्यास गेलों व Bond Streetनें Marble Arch वरील Lyon मध्यें खाण्यास गेलों. ऊन चांगलें पडलें होतें. पण थोडा वेळच अगदी. म्हणून हाइड पार्कमध्यें बसलो. मग घरी २॥ वाजता आलों. चबीनें व मीं तिच्या Album मध्ये ह्यांनी घेतलेले फोटो लाविले. ४ वाजतां Paddington स्टेशनजवळील Lyons मध्यें चहा घेऊन, William Whitley च्या Show Windows बघून घरी आलों. Christmas आल्यामुळें दुकाने सजविलीं होती, व बघण्याची मोठी मजाच दिसे. आज पाऊस पडला नाही. हल्लीं चार वाजल्यापासून काळाकुट्ट अधार पडे. जूनमध्यें आलों तेव्हां रात्री १०–११ ला सूर्य ! सगळेंच उलटें. रात्री सूर्य असला म्हणजे मला तर प्रथम चैनच पडायचें नाही. आतां अंधार म्हणून एकादे दिवशी आपला सूर्य कोठें तरी जाऊन अगदी शोधून आणावा असे होई. बाकी येथील लोकांना पण जरा सूर्य दिसला की फार बरें वाटतें. Lovely Morning असें सकाळीच सूर्य दिसला की म्हणायची सर्वांची पद्धत. सूर्यप्रकाशानें कसें सर्व आनंदी व शोभिवंत दिसतें. ह्यांना पाऊस एकादे वेळेस लागला म्हणजे जीव नकोसा होई. हवेचा भरंवसा तर नाहींच कधी. आमचे हिंदुस्थानी कपडे पण आणून वांयाच गेले. वरून डगला चढवायचा तेव्हां चांगल्या कपड्यांची काय शोभा, उगाच एवढे आणले. नाशिकला आमचें सामान पाहून कांही ऐटीची माणसे म्हणालीं, 'एवढेंच सामान तुमचें'? पण पुनः जर आलों तर ह्यापेक्षांही कमी म्हणजे प्रत्येकाची एकेक सूट-केसच फक्त आणायची. येथें सर्व सुटसुटीत असतें; कपडे लवकर मळत नाहीत व आंथरूण पांघरूण हॉटेल्सच पुरवितात.

असो. रात्री जेवणानंतर आम्ही तिघे पायीच Marble Arch वर फिरायला गेलों. Christmas जवळ आल्यामुळे Selfridges, Liley and Skinner, Marks and Spencer, Marshal and Snelgrove वगैरे Oxford Street वरचीं दुकानें फारच शोभिवंत केली होतीं तीं बघण्यांत वेळ किती तरी तेव्हांच जात असे. दुकानांत माल चित्ता-

कर्षक मांडून ठेवण्याची कला ह्या लोकांना चागली साधली आहे, व दुकानें बघण्याची संवय सर्वांना आहे. घरी करमत नसल्यास जरा दुकानें हिंडून यावींत कीं मनाला बरें वाटतें. दुकानें तरी किती ! रस्त्याच्या दोन्ही बाजूंनीं इमारतीचा खालचा भाग प्रचड दुकानांनीं व्यापिलेला असतो व कोठेही जा, Show Windows असायच्याच. असो. नतर रात्रीं बस्नें घरीं आलो.

## १४ नोव्हेंबर

आज हे Euston येथे L. M. S. Railway चा मोठा अधिकारी, Mr. Pope ह्यांना भेटायला गेले. मी ९ वाजतांच बस्नें Victoria Station वर गेले व तेथून Swanley येथे आगगाडीनें गेलें. Bromley Junction वर गाडी बदलावी लागली. एकटी म्हणून जरा धाक पडला. पण Guard म्हणाला, मी Bromley आलें की सांगेन तुम्हांला. माणसे फारच चागली. म्हणून लहान पोर देखील सुरक्षित जाईल. येथें आगगाडीचा रस्ता प्रथम गरीब वस्तीतून गेला होता. त्यामुळें इग्लिशांचें खरें जीवन दिसलें. लहान घरे, प्रत्येकाची लहानगी बाग, गृहिणी काम करतांना, व मुलें खेळतांना दिसली. पुढें गेल्यावर मोठमोठीं Football Grounds दिसलीं तर कोठे कोठे पुरुष टेनिस खेळतांना दिसत. हिरवी मैदानें, झाडी, त्यामधून गेलेला लहानसा कालवा फारच रमणीय दिसे. अशा तऱ्हेने Swanley आले. स्टेशनवर स्टेशनमास्तरला माहिती विचारून बाहेर पडले. Taxi Driver ला Dairy College च्या एका माणसानें माझी व्यवस्था करायला सांगून ठेवलेंच होतें. कॉलेजमध्यें गेलें. एका Demonstrator मुलीनें मला Milk Marketing Board ची माहिती सांगितली. गवळ्याजवळ जेवढ्या गायी असतात तेवढ्या रजिस्टर कराव्या लागतात; त्यांची वैद्यकीय तपासणी होते.

दूधवाल्यांजवळून दूध, Dairies विकत घेतात. तें सर्व काम Milk Marketing Board पाहतें. गायींचे गोठे County Council च्या Public Health Department चे Inspectors वरचे वर तपासतात. तसेंच, शहरांत दुधाच्या Vans मधून न कळत Inspectors दूध घेतात

व तपासतात आणि जर कांही वाईट दिसलें तर दंड होतो. शरीराला आवश्यक असणारे दुधाचे गुण दुधांत येतील अशो Board खबरदारी घेतें. शिवाय स्वच्छता व निरोगी गायी ठेवण्याची खबरदारी घेतात. सर्व शाळांत Half Penny ला एक मोठा कप दूध मुलांना देतात. बाकी पडणारे पैसे Board देतें. असे Board स्थापण्यास लोकांनीं पुढें यायला पाहिजे. लोकमत जागृत झाल्यावर कायदा होण्यास वेळ लागत नाही. तसेंच, देशाला लागणारें मांस पण तपासलें जातें. डुकराची वैद्यकीय तपासणी होतें. हुषारांचें सर्वच निराळें. नंतर Dairy दाखविली. तेथें सर्व काम यंत्रानेंच होतें. दुधाचीं भांडीं Sterilize करतात. गुरांची तपासणी, गोठ्यांची स्वच्छता, उत्तम दूध व तें गरीब मुलाना फुकट मिळणें, हे आपल्या देशांत कसें होणार हा मोठाच प्रश्न आहे.

हृया कॉलेजात ८० मुली शिकतात. मुली अतिशय धष्टपुष्ट व मेहनतीचीं कामें करतांना दिसल्या. चार वर्षांचा कोर्स आहे. नतर १।। वाजतां आगगाडीनें Victoria ला आलें. सकाळी ९ वाजतां स्टेशनवर कशीं सर्व माणसें भराभर कामाला जातांना दिसलीं. जिकडे तिडके तरतरीत हुषार माणसे. जडग्यासारखा बसलेला कोणी दिसायचा नाही. असो. बस्नें Marble Arch ला गेलें. ऊन पडलें होतें, म्हणून Hyde Park वरून घरीं गेलें. मग चबीला घेऊन शेजारील नेहमीच्या लहानग्या Hotel मध्यें जाऊन तळलेले बटाटे, ब्रेड, लोणी व दूध असें खाऊन घरी आलों. नंतर ३ वाजतां Paddington Station वरून Underground Tube नें Stone Bridge Park ला गेलों. तेथून पायींच 36, Vivian Avenue, Wembley Hill येथें Mr. Druary हृयांच्या घरीं गेलों. तेथें प्रि. तावडे राहात. त्यांनीं आम्हांला चहाला बोलावलें होतें. Mr. Druary हे गृहस्थ ३७ वर्षांचे. २२ व्या वर्षीं मास्तरकी करूं लागले. हल्ली ३५० पौंड वर्षाचा पगार म्हणजे अदमासें ४०० रुपये महिना. त्यांचें घर स्वतःचें असून घरांतील सर्व फर्निचर लांकडी व उत्तम पॉलिश केलेलें आहे. 'तें सर्व त्यांनीं स्वतः हातांनीं' केलेलें. त्यांनी सांगितलें कीं येथें सक्तीच्या शिक्षणांत सुतारकाम, गवंडीकाम, रंग लावणें, घराच्या भिंतीला कागद लावणें, बाग करणें, पोहणें, तसेंच सक्तीचें शारीरिक शिक्षण प्रत्येकाला असतें. त्यांनीं ११-१२ वर्षांच्या

मुलांनी लांकडी काम केलेले मला दाखविलें. मला अत्यंत आश्चर्य वाटलें व काय करूं नि काय नाहीं असें झालें. प्रत्येक जण शिक्षणानंतर स्वावलंबी व्हावा, त्याला चांगल्या तऱ्हेने पोट भरता यावें, असाच त्यांच्या शिक्षणाचा उद्देश आहे. आणि ते सर्व Mr. Druary मध्ये दिसलें. घराच्या भिंतीचे कागद त्यांनी लावलेले आहेत. बागेंतील जमीन सर्व चुनखडीची त्यांनी केली आहे. शिवाय त्याची प्रकृति फार उत्तम असून हंसतमुख, विनोदी असे आहेत. बायको घरांतील एकूण एक काम करते. वेळ पडल्यास ते घरकामांत मदत करतात. येथील ४००–५०० रु. महिना मिळविणाऱ्याची बायको, बाजारांतून सामान आणणे, झाडणे, धुणें, मुलें फिरविणें ही सर्व कामें करते. आमच्या रेलवेच्या Mrs. Gundry व त्यांची मुलगी, ज्यांचा सारा जन्म ऐश्वर्यांत, Saloon, Ist class अशांत गेलेला. अजूनही एक हजार रुपये महिना ५६ व्या वर्षी Mr. Gundry हे मिळवतात, व शिवाय खच्चून Provident फंड आहे. असे असतांना, घरकाम करण्याची लाज त्यांना वाटत नाही. मग आम्हीच इग्लंडला जाऊन आलों कीं, साहेब बनतों, हें कसें ? मी आजपर्यंत इंग्लंडला जाऊन आलेल्या माणसांची हीच ऐट पाहात आलें. कोणतेंही काम करण्याची लाज वाटते. देव नको, धर्म नको, देश नको, वडील माणसें नकोत. आपणही साहेबांतलाच एक आहों असें वाटतें. धर्माभिमान, तीव्र देशाभिमान, राजाबद्दल अत्यंत प्रेम, शिस्त, कायद्यांचें पालन ह्या गोष्टी तर इंग्रजाच्या नसानसांतून भिनल्या आहेत. शिवाय इंग्लंड आपल्याला Sporting Nation म्हणवितें. आम्ही खेळाडू, आमची हवा चांगली म्हणून तऱ्हेतऱ्हेचे खेळ आम्हांला येतात असा त्याना मोठा सात्त्विक अभिमान आहे. आमचे हिंदुस्थानी साहेब मात्र अंगमेहनतीला विसरतात. इंग्रजांसारखे सुदृढ शरीर England returned आणते तरी पुरें झालें असतें.

## १६ नोव्हेंबर

आज सोमवार सकाळींच ९ वाजतां मी Lancaster Gate Central Tube नें Liverpool Street Stationला गेलें. तेथून १०–२६ च्या गाडीनें Frinton-on-sea येथें गेलें. १२॥ ला गाडी पोहोंचली. मला घ्यायला बाई

स्वत: मोटार घेऊन आल्या. त्यांनी गांव दाखविलें. नंतर Mrs. E. M. Orr Gunfleet, Frinton-on-sea ह्या तेथील सभेच्या President, ह्यांना घेऊन आम्ही एका श्रीमान् बाईच्या घरी गेलों. त्यांचा बंगला, बगीचा फारच सुंदर होता. किती तरी फर्निचर, दिवे, शोभेचें सामान, व जिकडे तिकडे गालिचे व सर्व सुखसोयी होत्या. बंगला व व्यवस्था बघून कसें समाधान वाटलें. जिवाला सुख कसे लावून घ्यावें हें ह्यांनाच माहीत. जसा भिंतीचा रंग तसा कोचांचा; तशाच उशा, पडदे, दिव्यांच्या झालरी. जिकडे तिकडे स्वच्छ सर्व सामान चकचकीत. दारांच्या कांचा वगैरे अगदी लख्ख. त्यांच्याकडेच Mrs. Orr, मी व आणखी एक बाई ज्यांच्या घरीं दुपारीं सभा झाली त्या, अशा जेवलों. जेवणाचा व जेवण्याच्या सामानाचाही असाच थाट होता. आपल्याप्रमाणें पदार्थ खूप नाहींत. Mushroom Soup, Fish & Chips माझ्याकरितां Omelette and Chips व Pudding, Coffiee and drinks झाले एवढेंच. इंग्रजांमध्ये स्वयंपाकाचा गोंधळ नाहीं. शिवाय पुरुष, मुलें याचाही गोंधळ नाही, त्यामुळें बाकीचा थाट जमतो. आर्धीं अर्धे जिन्नस बाजारचे तयार, त्यांतून Labour saving devices व जेवणाचे पदार्थ कमी. त्यामुळे सामाजिक कार्य करायला त्यांना फुरसत असते. प्रत्येकाला स्वतंत्रता. कोणी कोणाकरितां थांबत नाहीं. अर्थात् प्रत्येक देशाच्या पद्धती निरनिराळ्या असतात. ज्याला जसें सोयिस्कर पडेल तसेंच करावयाचें.

जेवतांना बायकांनीं हिंदुस्थानविषयक खूप प्रश्न विचारले. नंतर मीं १५–२० मिनिटें विश्रांति घेतली. कारण मला आज खूप सर्दी झाला होती. अगदीं बरें नव्हतें. नंतर आम्ही शेजारच्या घरीं व्याख्यानास गेलों. माझ्या करितां मुद्दाम दिवस ठरवला होता. बरोबर ३ ला, २५–२६ बायका वेळेवर जमल्या.माझा विषय " Indian Woman, Religion, Caste System, Untouchables, असा होता. अर्धा तास बोललें. आतां मला इंग्रजींत बोलण्याची चांगली संवय झाली होती. आजचें भाषण चागलेंच झालें. गांधी-जींची चांगलीच माहिती सांगितली. सती, हिंदु-मुसलमान, विधवा, परित्यक्ता, पडदा, वगैरे किती तरी प्रश्न विचारले. 'Mother India' वर चर्चा झाली, व अशा तऱ्हेनें हिंदुस्थानविषयक मीं त्यांचा गैरसमज घालविला. त्या म्हणत

'तुम्ही मनमोकळ्या आहांत व मनापासून कळकळीनें बोलतां' म्हणून आम्हांला फार आवडलें. नंतर चहा झाला. खूपच मोठी पार्टी होती. खूप गप्पा मारल्या. काही जणी हिंदुस्थानांत राहून आलेल्या. त्यामुळें हिंदुस्थानी बाई भेटली म्हणूनही त्यांना प्रेमाचें भरतें आलें. मागल्या आठवणी काढून त्यांनी खूप गप्पा मारल्या. हिंदुस्थानांत राहिल्यामुळे ह्या सहवासाचें प्रेम वाटलें.

असो. मला Frinton-on-sea फारच आवडले. लहानसें टुमदार गांव व हिरवी कुरणें, सुंदर बंगले, जवळ सुंदर निळसर समुद्र, त्यामुळ गांव शांत व फारच छान वाटले. सर्व बायकांनी माझे अगत्य केले. सभ्यपणानें व प्रेमाने वागल्या. तशा रीतीला सर्व चांगल्या, कुचकें, नासकें टोंचून बोलणे नाही. सरळ प्रश्न विचारणे व समजावून घेणें. ज्यांच्या बंगल्यावर व्याख्यान झालें, त्याचा बंगला व फर्निचर, सर्व सुंदर होतें. दोन Maids चहा द्यायला होत्या. सर्व थाटच होता. असो. अशा तऱ्हेनें हा संस्मरणीय समारंभ संपला. आम्ही प्रेमानें निरोप दिले--घेतले व मी परत जाण्यास निघाले.

सकाळच्याच बाईंनी मोटारीतून मला पोहोंचविलें. ५-४७ च्या गाडीनें निघाले. Guard ला त्यांनी मला नीट सांभाळण्यास सांगितले. नंतर दुसऱ्या स्टेशनवर माझ्या डब्यात एक guard बसला. त्यानेंच Colchester वर दुसऱ्या गाडीत बसविलें व आता सरळ Liverpool Street Station वर उतरा असे मला बजावले. येथील माणसें फार चांगली. कोणीही मदत करी. नंतर पोलिसाला विचारून Underground Tube ने मी घरी आले. सर्दीने माझे डोके तापून गेलें होतें. जास्त आजारी पडेन असें वाटलें. शिवाय प्रवास व व्याख्यान ह्यामुळेंही शीण आला होता. घरी येऊन पडले, Genaspirin घेतले व थोडे जेवून निजले. रा. बेंदरकर आलेले होते. तेही आमच्याकडेच जेवले. आजच मी एकटी Escalator वर चढलें. मला त्याची भीति पडली होती, पण एकदरींत येथे कोठेही एकटे जा. मुळीच भीति नाहीं. आधी सगळीकडे पाट्या असतात. नीट वाचलें म्हणजे काम होतें. शिवाय जागोजागीं पोलिस. कोणी चोरणार किंवा फसविणार नाहीं. जगांत जर कोठें सुरक्षितपणा असेल तर तो येथेंच आहे अशी अनुभवानें खात्री वाटते.

## १७ नोव्हेंबर

आज माझ्याकडे एक पुरुष Press Reporter व Miss Hearnden, of the Associated Country Women of the World, अशी दोघें हिंदुस्थानविषयक माहिती विचारण्यास आली. हिंदुस्थानांतील पूर्वकालीन स्त्रिया, गणितांत, व्याख्याने देण्यात, लढाईत, फार हुषार असत. भास्कराचार्यांची मुलगी लीलावती ही गणितात अत्यंत हुषार होती. तिची गणिते अद्याप शिकविली जातात. 'हिंदुस्थानावर अनेक राज्ये झाल्यामुळे दर खेपेस नवी विटी नवे राज्य' अशी आमची स्थिति आहे. आमच्या पुरुषानीच—आपटे, आगरकर, कर्वे वगैरे लोकांनी—प्रथम आमची सुधारणा लोकमत जागृत करून केली. तेव्हां पुरुष गुलामाप्रमाणें वागवतात हे खोटे. गृहिणी गृहमुच्यते; Husband and wife are the two wheels of a carriage; स्त्रीला सगळीकडे मान आहे; 'जिचे हाती पाळण्याची दोरी ती जगाते उद्धरी' असे आम्हाला समजतात. धर्म म्हणजे समाजाच्या स्वास्थ्याकरिता ऋषीनी केलेले कायदे कालमानानुरूप बदलले जातात. आमचे शिक्षण, आमचे हल्लीचें कार्य वगैरे खूप माहिती दिली. वर्तमानपत्रांत माझ्याशी झालेली मुलाखत व माझें नाव घालून छापणार होते.

नतर ते लोक गेले. मग मी Frinton च्या वर्तमानपत्रात माझें व्याख्यान Mrs. Orr छापणार होती, त्याकरितां माझा फोटो तिला धाडून दिला. नंतर आम्ही तिघे Hyde Park मधून South Kensington मध्ये गेलों. Barkers, Derry and Tom वगैरे Show Windows पाहिल्या. Christmas आल्यामुळे त्या फारच सुदर सजविल्या होत्या. गोऱ्यापान व तरतरीत पुतळ्यावर घातलेले कपडे फारच मनोहर वाटत; पण मला काही कधी एकादा जिन्नस उचलून घ्यावा असा मोह व्हायचा नाही. लहानपणी काही घनघोर प्रसग आल्यामुळे व सर्व भावडांत मोठी, त्यामुळे मलाच नेहमी पैसा जपावा लागे, त्यामुळें असल्या सर्व गोष्टीपासून मी अलिप्त असे. लहानपणापासून मला अत्यत आवड म्हणजे शिकण्याची, सभेत बोलण्याची, लेखिका होण्याची. ती माझी आवड येथें पुष्कळशी पुरी झाली. येथें, Continent वर व खुद्द यूगोस्लाव्हियात सगळ्यांच्या ओळखी झाल्या, व्याख्यानें झाली, वर्तमानपत्रांत लेख लिहिले आणि अशा तऱ्हेनें

माझ्या आवडीचेंच सर्व झालें. दुकानांत माल घेण्याची हौस ह्यांना. संसारांत पतिपत्नी दोघे जर खर्चिक असले तर घरांत पै उरावयाची नाहीं, आणि म्हणूनच देव अशी जोडी घालून देतो.

नंतर Kensington High Street वरील Lyons मध्यें खाऊन हिंडत हिंडत Olympia Show जवळील Stonor Road वर रा. बेदरकर यांच्या घरी गेलों. त्यांची परीक्षा जवळ आली होती; पण ह्यांना, आपलें मनुष्य भेटलें कीं मोह आवरत नसे. त्यांचा खूप वेळ घेतला आम्हीं. तेथेंच छान चहा घेतला, खूप खाल्लें. बोलून चालून नाशिकचे लोक. खायला थोडेंच कमी आहोंत. खाणें झाल्यावर बस्नें Barker पर्यंत गेलों व मग पायींच Albert Hall, Hyde Park Corner वरून घरीं गेलों. मग जेवणानंतर पुन: Marble Arch जवळील Edgeware Road वर Show Window पाहण्यास गेलों. हवा हल्ली फारच वाईट असे. मग लवकर घरीं आलो.

## १८ नोव्हेंबर

आज सकाळी रा. बेदरकर व हे घड्याळें पाहण्यास गेले. मी व चबी पायींच Hyde Park मधून Thomas Cook कडे गेलों. मग हे दोघे १२ ला तेथें आले. Sir Reza Ali व Lady Ali व त्यांची बहीण ह्यांची माझी ओळख करून दिली. नंतर मी बस्नें Victoria Station वर गेलें. तेथून Parliament Mansions, B.rth Control Centre मध्यें गेलें. Mrs.Harold Laski, व Mrs. Hawarden (Secretary Birth Control Centre) ह्यांनी मला Lunchला बोलावलें होतें. संततिनियमनाची हिंदुस्थानला अत्यंत जरुरी आहे.तेव्हां जागोजागीं Clinics उघडावीत.दिल्लीला Dr.Ruth Young, Lady Hardinge Medical College, ह्यांच्याकडे जा म्हणजे त्या सर्व माहिती देतील व मदत करतील. Mrs. Hawarden ही बाई फारच चांगली आहे. मला कितीतरी मदत केली. तसेंच Mrs. Laski ह्या पण हिंदुस्थानबद्दल कळकळ वाटणाऱ्या आहेत. त्या व त्यांचे पति Rationalist, Socialist असून रशियाला जाऊन आलेले आहेत. नंतर Mrs. Hawarden मला Fabian Society त घेऊन गेली. County

Council चीं कामें—हीं दोनतीन पुस्तकें मीं घेतलीं, व मी तिचा निरोप घेऊन निघालें. नंतर पायीच १॥ तास चालून मी घरीं गेलें. फारच दमलें. मी बहुतेक सगळीकडे पायींच जाई. घराजवळ हे व चबी भेटले. Padding Station जवळील Lyons मध्यें जाऊन चहा घेतला. किती मजा वाटली हे म्हणाले पुन: आपण येथें कधीं येऊं का? आणि खरेंच जेथें तीन धोंडे मांडावे तेथेंच माणसाला बरें वाटतें. हल्ली तिघाना पण सुट्टीच, खावें, प्यावें, भटकावें. कोणाचें ·कांहीं बांधलेलों नाहीं. घरची सर्व मंडळी बरी होती. तेव्हां तसे दिवस फारच मजेनें गेले. आमचा प्रवास फारच सुखकर झाला. आतां हे रम्य दिवस संपणार म्हणूनही हुरहूर वाटूं लागली. मनुष्याला काय ज्यांत घालावें त्यांत बरें वाटतें. मग येथें तर काय सर्वसुखाचें आगर, असे हे देश. लोक हुषार, सर्व सुखसोयी. पैसे असल्यावर काय सुखाला तोटा? आम्हांला ह्या देशाची गोडी लागली एवढी गोष्ट खरी. पुन: सुट्टी मिळाली की इकडे येऊं असें वाटतें. कारण तेथें त्रास नाहीं, कटकट नाहीं, चोरी, चहाडी, नावें ठेवणें, कुरापती काढणें वगैरे कांही नाही. ज्याला म्हणून पैसा आहे त्यानें हे प्रांत पाहावेत, ह्यांत तिळमात्र शका नाही. काय एकेकाचे आपलें राष्ट्र हुषार, सामर्थ्यवान् करण्याचे प्रयत्न, किती चढाओढी, प्रत्येकांत थोडेबहुत दोष असायचेच; पण आपल्याला दोषांशी काय करायचें?

हल्ली मनाला हुरहूर वाटूं लागली ही गोष्ट खरी. जेथें राहावें तेंच गोड वाटतें. नवीन गांवीं बदली होतांना देखील असेंच वाटतें. इकडे येण्यापूर्वीं आम्ही जमालपूरला होतों. जायचें ठरलें तेव्हांही वाईट वाटलें. असो. नंतर घरी आलों. रात्री कोठेंच गेलों नाही. कारण दोनतीन दिवस ह्यांनाही बरें नव्हतेंच. हवा दमट, सूर्य नाही, पाऊस, वारा, त्यामुळें असें होई.

## १९ नोव्हेंबर

आज सकाळीच हे Euston Station ला जाऊन तेथून Birmingham ला जाणार होते. Stone Company च्या Air Conditioned Carriage चें Demonstration होतें तें पाहायला गेले होते. कारण अशी

पद्धत हिंदुस्थानात लवकरच सुरू होणार होती. मी सामानाची बांधाबांध केली नंतर १२।। वाजतां घर सोडलें व Paddington Station जवळील Lyons मध्ये खाण्यास गेलो. नंतर पायीच Marble Arch वरून Selfridges मध्यें गेलों. आज तेथें अतिशय गर्दी होती. तिसऱ्या मजल्यावर Father Christmas व तऱ्हतऱ्हेचे मुलांचे खेळ गच्च भरले होते. आईबाप आपल्या लहान मोठ्या बाळांना त्यांना पाहिजे ते घेऊन देत होते. राज्यकर्त्यांचा सण, मग काय शोभा विचारायची ! बाहुल्यां तरी काय सुंदर अगदी तान्ह्या मुलाप्रमाणे दिसत. ४०–५० शिलिंग किमती असत. कांही काळ्या व आफ्रिकन बाहुल्यांना शेंडी, कानानाकात सुकली, मुलांना ती मोठी गंमत वाटे. म्हणे काहींना काळ्या बाहुल्याच आवडतात. आपल्याजवळ नाही तें हवें एवढेंच. बाकी गोऱ्यांना काळे आवडते. येथे कपडे सर्वांचे काळेच. आणि तो फरक फारच सुंदर दिसतो. गोऱ्याला काळे खुलून दिसते. हल्ली थंडीमुळे येथील Lift चालविणाऱ्या मुलींचें कपडे बदलले, त्यामुळें तितकी शोभा कमी झाली. Summer मध्यें त्या फारच सुंदर दिसत. त्यांना केवळ बघण्याकरितांच जावेंसें वाटे. Selfridges मध्ये खूप गमत वाटे. बायका, मुले, मालविक्या पोरी, तऱ्हतऱ्हेचें सामान म्हटले एकदां अखेरचे पाहावें. पुनः हें रमणीय दृश्य कशाने दिसावयाचे ? नंतर पायीच Marble Arch वरील Lyons मध्यें चहा घेतला व घरी गेलों. हे परत आलेच होते. रात्री जेवणानंतर पुनः आम्ही तिघें पायीच हिंडण्यास गेलों. M. Arch च्या अलीकडे Pavement वर Accident झाल्यामुळें गर्दी होती. आम्हीही पाहात उभे राहिलों. नंतर दुकानें पाहात पाहात Piccadilly Circus वर गेलों. तेथे काय रंगीबेरंगी दिवे, बायका-पुरुषांची गर्दी, आणि सर्व छान दिसत होतें. किती वेळ पाहात होतों. आतां जायचें, मग ही गंमत नाही म्हणून हुरहूर वाटतच होती. बसची वाट पाहात होतो. इतक्यांत धाकटी मॅनेजरीण भेटली. ही फारच चांगली असे. आम्ही सर्व तिला व ती आम्हांला आवडे. ती नेहमी हंसतमुख असे. ती व आम्ही बसनें बरोबर आलों.

## २० नोव्हेंबर

आज पायींच Hyde Park मधून नेहमींच्याच रस्त्यानें Thomas

Cookकडे गेलों. पत्रें घेतलीं. Shaftsbury Avenue मधील Lyons मध्यें खाल्लें. मग Cockspur Street वरील His Majesty's Theatre मध्यें Romeo & Julietचीं २½ शिलिंग दराची तिकिटे घेतली. जरा वेळ होता. म्हणून हिंडलो. आज Burlington Gardens, Regent Street च्या मागे I. C. S. च्या Civil Service Commission च्या जागेवरून हिंडून आलों. २॥ ला सिनेमा सुरू झाला. Norma Shearer ही Juliet होती. चित्रपट, प्रेमरस व शृङ्गार ह्यामुळे फारच रमणीय वाटला. Shakespeare ची वाक्ये कानाला किती गोड लागत. Norma दिसायला किती सुंदर. काम फारच हुबेहुब करी. Reslie Howard हा Romeo होता. त्याचेही उत्कृष्ट काम झाले. पण अखेरीस शोकरस बघवेना, व कशाला हें पाहायला गेलों असे वाटले. असो. सिनेमानंतर पुन: Shaftsbury Avenue मधील Lyon कडे चहा घेतला व Leister Square, Strand, Trafalgar Square, Regent Street, Oxford Street वरून घरी गेलों. जेवणानंतर रात्री कोठेच गेलो नाही.

आज रोजच्याच वाटेने Thomas Cookकडे गेलों. हवा चांगली होती. सूर्याचें दर्शन ४ वाजेपर्यंत होते. चि. सौ. विमलचें Air Mail चें पत्र होतें. दिवाळीची गडबड. तो. वहिनी तेथे गेलेली आहे; आणि खरेंच किती आनंदाचा काळ! वैधव्याचें असिधाराव्रत २० वर्षें करून 'असतील बाळ तर काढतील काळ' आज हा दिवस दिसला. असो, चि. सौ. विमल अगदीं उत्तम घरी पडावी म्हणून मी अत्यंत खटपट केली. ह्यांनीही केल च. ह्याचेंच खरें. मी तर सख्खी बहीण, मोठ नवल नाही. परंतु काळजी करणारे मेहुणे विरळे! अखेरीस तिला मनाप्रमाणें मिळालें. तिचे पति व ती अत्यंत आनंदांत आहेत. त्यांना काडीची उणीव नाही. चि. राम-करितां पण ह्यांनी अशीच खटपट केली. त्यालाही उत्तम नोकरी लागली. देवाचेच उपकार म्हणायचे ...... ह्यांनी Baggage Insure केले. मग Shaftsbury Avenue मध्यें Lyons कडे खाल्ले.

## २१ नोव्हेंबर

आज शनिवार. बसमध्यें खूप गर्दी. S. Avenue मध्यें Theatre

जवळ Queue लागलें होतें. मला हंसूं येई. लहान खुर्च्यांवर लोक बसून वाचीत. तसेंच Tube Station वर पण Queue लावून माणसें वाचीत वाचीत यंत्राप्रमाणें तिकिटघरापाशी चालत जात. काय गर्दी दिसे. येथें रस्त्यांतून भटकण्याची गमत वाटे. नंतर भटकत Pall Mall वरून St. James Park मध्यें बसलों. मग Buckingham Palace वरून Hyde Park Corner वरून Knights Bridge, Hyde Park Hotel, Harrods वरून Mr. Chilton यांच्या बायकोस भेटण्यास गेलो. (Mr. Chilton ह्यांना वार्षिक ३,००० पौंड पगार होता). Mrs. Chilton यांना मी १० वर्षांनी पाहिले. किती फरक दिसला. ह्या किती सुरेख असत. शिवाय ह्याचे कपडे उत्तम. ' हिंदुस्थानांतील तेव्हांचे तें बडघा साहेबांचें ऐश्वर्य. ' मग राजासारखा थाट तें सर्व निराळेंच. येथें तें थोडेच दिसणार.

रात्री जेवायला रा. बेदरकर व रा. बेवूराचा मुलगा असे दोघे आले होते. जेवण करून खूप वेळ गप्पा मारल्या. रा. तावडे पण भेटायला आले होते, कारण आतां आम्ही लवकरच जाणार होतों.

## २२ नोव्हेंबर

आज रविवार लंडनमधील शेवटचाच आमचा. धुके पडलें होतें. सूर्य दिसत होता एवढेंच. दाट धुक्यामुळें जरा सुद्धां प्रकाश पडेना. आम्ही हाईड पार्क मध्ये गेलों. Albert Memorial वरून Hyde Park मध्यें जेथें लोक घोडयावर बसतात तेथे थाबलों. हल्लीं येथें खूप गर्दी असे. पुरुष, बायका चारपांच वर्षांचीं मुलें मोठया हुषारीनें व धिटाईनें ऐटीत घोडयावर बसत. काय एकेकीची उत्कृष्ट शरीरप्रकृति. सर्व कसें सुटसुटीत. एकेकाची प्रकृति बघत राहावी. शरीरप्रकृति व्यायामानें मोकळया हवेंत उत्तम राहते. खाणें उत्तम व वेळेवर, झोंप खप घेणें, ह्यामुळे सगळे कसे उंच, धिप्पाड, वयाच्या मानानें अगदी तरुण असे दिसतात. अकालीं केंस पिकलेले, वार्धक्य आलेले असें कोणी दिसायचें नाही. आपण सुंदर दिसावें म्हणून प्रत्येकाची जिवापाड धडपड असे. शरीर माणसानें उत्तम ठेवावें ह्यांत तिळमात्र संदेह नाही. आदितवारची हाईड पार्कमध्यें अत्यंत

गंमत असे. झालें, आतां कांहीं हें दृश्य दिसायचें नाहीं. सरोवरांत लहानग्या होड्या टाकून खेळणे, मुलांच्या Prams, दुष्यंत-शकुंतला, घोड्यावर बसणें, वगैरे गोष्टी वरचेवर आठवतील. येथील आदितवार Holiday Spirit व आमचें जीवन ह्यामध्ये पूर्वपश्चिमेइतकें अंतर आहे. येथें घरांत स्वयंपाक नसल्यामुळें बायकांना बाहेर हिंडतां येते. इग्रजांचे सर्वच निराळें. त्यातील आपल्याला जसें जुळेल तसें घ्यायचें.

असो. नंतर Marble Arch वरून हिंडून घरी जेवण्यास आलों. नंतर Tubeनें Hendonला एका ओळखीच्या हिंदी सॉलिसिटरकडे गेलों. हे येथें १०–१२ वर्षे Solicitor आहेत. बायको इंग्लिश. दोनतीन मुलें आहेत. येथेंच ते नेहमी राहणार ते भेटले नाहीत. म्हणून बस्नें Golders Green ला गेलों, व तेथून एका दुसऱ्या हिंदी मित्राकडे गेलों, तों ते दाराबाहेरच पडत होते. Strand वरील Corner House मध्ये Divali Dinner असल्यामुळे ते व सॉलिसिटर देखील तिकडेच गेले. "I am so sorry I have an engagement." अशा तऱ्हेनें आमची बोळवण झाली. आम्ही हिंदुस्थानी आदमी, तेव्हा साहाजिकच हिरमोड झाला. येथे ज्याचा तो. कोणी कोणाशी बोलायला रिकामा नाही. एकाद्या flat मध्यें एकमेकाना कोण राहतो हें माहीत नसतें. जो तो हिशेबी. पायापुरता बघणारा. कोणी कोणाकडे बसायला जायचा नाही. बाहेर हिंडणें, आजारी पडल्यास दवाखाना, मेल्यास Phone करून County Council यंत्रानें अंत्यविधि करील. दोन अश्रू गाळायला कोणी नाही. असें हें येथील जीवन आहे. प्रकृति ठीक असली, पैसा असला तर ठीक. ज्याच्याजवळ पैसा नाहीं त्याचीं व्यवस्था सरकार लावतें. पण मुलगा किंवा सून, लेकी, जांवई कोणी ढुंकून विचारणार नाहीत. प्रत्येकाला स्वतंत्रता हवी, चैन हवी, लग्न नको, पण लग्नाचें सुख हवें, मुलें नकोत, मोटारी हव्यात, रात्री अपरात्री वाटेल तसें भटकणें, सिनेमा-नाटकें बघणें, रेस्टॉरंट (Cafe) मध्यें जाणें असें स्वैर वर्तन तरुण पिढीचें आहे. गृहसौख्य साहजिकच त्यामुळें बुडत चाललें आहे. पतीकरितां हिंदुस्थानी बायकांना एवढें कां प्रेम वाटतें ह्याची कल्पनाच त्यांना होत नाहीं. हिंदुस्थानी बायकांचें जीवन सात्त्विक, कष्टाळू बांधलेलें. ह्यांना त्याची काय कल्पना येणार? असो. आमचें हिंदुस्थानी अगत्य

किती ! पण तें प्रथम जाईल आमचें. असो. आज तरी मला लंडन आपमतलबी वाटत आहे. कोणी कोणाला विचारायचें नाही. नतर Golders Green ला Lyons मध्ये चहा घेतला. स्वत:चा पैसा काढला की सर्व मिळतें. येथे मित्राकडे पाणी देखील मिळायचें नाहीं. हल्लीच्या आपमतलबी जगांत एक 'पैसा' काय तो कामास येईल. कोणी कुणाचे नाही. असा आम्हां दोघांचा तरी अनुभव आहे.

## २३ नोव्हेंबर

आज सकाळीच Mrs. Orr चें Frinton-on-sea हून मला पत्र आले, व तेथील वर्तमानपत्रात माझे व्याख्यान छापून आले ते खालीलप्रमाणे:—

"16th November, 1936

**" Frinton Fellowship of thought :**
**The Progress of India's Women.**

"The members of Frinton Fellowship of thought met at 'Bratton' Second Avenue on Monday, by kind invitation of Mrs. Jamieson.

"Mrs Sarojini Deshpande, one of the India's Pioneer women, gave an interesting talk on the women's movement in her country. A striking figure in a scarlet sari she described the restrictions by which, women had hitherto, been banned, and the wonderful vista before them on advancement to the status and responsibilities of their sisters in the West.

"She described the innate selfless devotion of Indian women to their husbands, she felt that this, an ineradicable feature, would preserve the sanctity of home life and be a great force in the future as in the past. Mrs. Deshpande described child welfare work, clinics, new conditions of marriage laws, education

among the better class women and professional and civil attainments in amelioration of village life.

"The fact of a large majority of illiterates was recognised and was being remedied by educated Indian women, thus breaking down a caste barrier that had long been felt unworthy. In this latter advance, they had been greatly helped by the example of Mahatma Gandhi, of whom she gave an interesting account and described the veneration in which he is held in her country not as a dictator but as a priest of peace.

"Mrs. Deshpande has recently returned from the Women's Conference at Dubrovnik to which she was sent as an Indian delegate."

* * *

आजही खूप धुके पडले होते. इकडची खरी हवा पाहायला मिळाली. हे Storey's Gate, High Commissioner's Office, Victoria Embankment इकडे गेले होते. मी व चबी Marble Arch, Park Lane, Dorchester Hotel वरून Thomas Cook कडे पत्रें आणण्यास गेलो. नंतर Strand Road वरील Lyons मध्ये तिघांनी खाल्लें. हे पुन्हा वरील ठिकाणी गेले. मी व चबी Piccadilly Regent & Oxford Street वर Show Windows बघत होतों. २॥ वाजतांच काळाकुट्ट अंधार होता. दिवे लागले होते. Christmas Shopping ची गर्दी होती. Selfridges वर तर फारच आरास केली होती. Father Christmas सजविला होता. त्याभोवती चित्रे फिरत होतीं. सर्व दुकानावर, हिरव्याचार झाडांमधून हिरवे, तांबडे दिवे लावले होते. आणि सर्व देखावा मोठा रमणीय वाटत होता. रस्त्यावर थांबून लोक पाहात उभे राहात. लहानग्या बाळांची किलबिल चाले. त्यांच्याचकरितां तर हें सर्व होतें. राज्यकर्त्यांची मजा असते. आधी राज्य स्वतःचें व सुयंत्र हवें, व मग सर्वांना पैसा हवा. म्हणजे अशी सर्व मजा असते.

असो, नंतर मी व चबी Marble Arch वर जाऊन Lyons मध्यें चहा घेतला, व मग पायीच घरी गेलों. मी Illustrated Weekly कडे लेख पाठविला. खूप लिहिलें. जेवणानंतर बांधाबांध केली. कारण भारी सामान Thomas Cook उद्यां नेणार होते. रात्री तऱ्हतऱ्हेच्या विचारांनी आम्हांला दोघांना २ वाजेतों मुळीच झोप नव्हती.

## २४ नोव्हेंबर

आज आम्ही तिघे Marble Arch वरून Selfridges मध्यें गेलों. Demonstrators मुलांना तऱ्हतऱ्हेचे खेळ दाखवीत होते. खेळ देखील नवीन यांत्रिक शोधाचे व किती सुबक. Silver Jubilee Train ही London to New Castle upon Tyne येथें ४ तासांत जाते. ती दाखविण्याचा हेतु हाच कीं, ती किती वेगानें जाते. शिवाय टेलिफोन, टाईपरायटर, सबंध आगगाडीचें स्टेशन, बोगदे, पूल वगैरे हुबेहूब नमुने बालमनाच्या विकासाकरितां ठेवले गेले आहेत. त्यांच्या सुखसोयीचा हेवा वाटणें साहजिक आहे. शिवाय इतक्या महागाईचे खेळ आईबाप घेऊन देतातही, व मुलें खेळतात पण. धूळ खात गोष्ट पडत नाही. आम्हीही, जे थोडेबहुत सधन लोक आहोत, ते मुलांना असे खेळ घेऊन देतों, पण आमचा सर्वच अफाट पसारा. दहा नोकर, तर सतरा किल्ल्या नि अठरा पाहुणे व ह्या सर्व गोंधळांत मुलांकडे कित्येक वेळां दुर्लक्ष होतें; व हें सर्व करून मुलांना खेळ शिकवणें वगैरे गोष्टी केल्या तर स्वतःला जरा सुद्धां विश्रांति नाहीं. असो. हल्लींचा संक्रमणकाल आहे तेव्हा अशी तारांबळ उडायचीच. खेळ बघून आम्हीं Old Bond Street वरून Thomas Cook कडे गेलों. रस्त्यांतून काय सर्व देखावा सुंदर दिसे. पोलिस, तरतरीत धष्टपुष्ट बायका त्यांची प्रत्येकाची चालण्याची घाई, कोठें कोणी बावळे, अजागळ, की कोणी मोटारींच्या वाटेंत चुकून येईल असें कधी दिसावयाचे नाहीं. लहान मल देखील रस्त्यांमधून Automatic Signals बघून चालेल. युरोपियन राष्ट्रांची हुषारी पाहून कसें पदोपदी दुःख होतें. त्यांच्यांत गुण आहेत. आमच्या हजारों दुर्गुणांनीं आम्ही सर्व दवडून बसलों. तेव्हां आतां योग्यता आल्याशिवाय सर्व परत मिळणें कठिण. 'ज्याचा जो व्यापार तेथें असावें

खबरदार,' नाही तर असे हे हुषार लोक सर्व बळकावून बसतात. तेव्हां दोष दुसऱ्याचा नसून आपलाच आहे. आपली सुधारणा आपण केली नहीं तर दुसरे कोण करणार ? एकेकानें मनावर घेतलें तर भाग्योदय होण्यास किती वेळ लागणार आहे! असो.

नंतर आम्ही Shaftsbury Avenue मधील Lyons कडे खाल्लें व हे Institution of Mechanical Engineers मध्यें गेले. मी व चबी घरी गेलों. नंतर ४॥ वाजता Paddington वरील Lyons मध्यें चहा घेतला. हल्ली रात्री थंडीमुळें कोठे जात नसू.

## २५ नोव्हेंबर

आज सकाळी चबीनें धोब्याचे खूप कपडे उचलन शेजारच्या Sunlight Laundry मधून आणले. धोब्याकडे कपडयाचें गाठोडें घेऊन जाण्याची तिला लाज वाटे. कारण घरीं नोकरचाकर. शिवाय हिंदुस्थानी श्रीमंतीच्या कल्पना. स्वतःचें काम करण्याची ' काळ्या साहेबांना ' लाज वाटते. म्हणून तिला आम्ही मुद्दाम असें काम सांगत असू. वर्तमानपत्रें आणणें, पोस्टांत जाणें, पत्रें टाकणें वगैरे काम तीच करी. ती मला हंसायला एक गोष्ट होऊन बसली होती. आम्ही Strattford–on–Avon ला Shakespeare चें नाटक पाहण्याकरितां १½ शिलिंगाची तिकिटें काढलीं. त्याचा Queue धरून चबी २–३ तास बसली होती. घरी सर्व करण्यास नोकर. येथें सर्व स्वतःच करावें लागे. हिंदुस्थानची श्रीमंती नाही येथें. असो. मी केसरीकर्त्यांना पत्रें लिहिलीं व घाईघाईनें हाईड पार्क Grosvenor Gate वरून Park Lane वरून Thomas Cook कडे गेलें. हे P. & O. Bank मधून तेथें आले. Bankers नीं ह्यांना Overdraft आतांपर्यंत दिलाच होता. पण १–२ दिवसात आम्ही जाणार होतों तरीही दिला. हिंदुस्थानांत असें होत नाहीं. येथें जनता विश्वासू व बँका वगैरे संस्था सर्व जनतेच्या सोयीकरितां आहेत ह्या तत्त्वावर सव व्यवहार चालतो शिवाय येथें बँकेंत जा, पोस्टांत जा Thomas Cook कडे जा, माणसाची दाद कशी चटकन् लागते. I won't keep you a minute असें हंसतमुखानें प्रत्येक जण म्हणतो. एक दिवस मी चुकून Thomas Cook च्या भलत्याच Depart-

ment मध्यें गेलें, व चुकले म्हणून परत निघालें. तोंच धावत येऊन एकानें मी परकी बाई म्हणून विचारले, May I help you ? दुकानांत जरी गेलांत तरी चटकन् असें विचारतील. Restauıant मध्ये गेलो, तरी Supervisors येऊन Are you being seıved असे म्हणतील. कोठें वेळ लागायचा नाही. सर्व गोष्टी भराभर. पत्राची उत्तरे चटकन्. मग ते मोठ्या Prime Minister कडे का जाईना. एकदरीत मजा आहे. किती किती गोष्टी शिकलो आम्ही. आता हाताने तसे होण्याची ताकद परमेश्वर देवो म्हणजे मिळविले. नंतर Shaftsbury Avenue मधील Lyons मध्ये खाऊन घरी आलो. चहा Paddington जवळील Lyons मध्ये घेतला. रात्री रा. बेदरकर यांना जेवायला बोलावले होते ते ६।ः। वाजता आले. थोड्याच वेळात रा. बेगिरी सॉलिसिटर आम्हास भेटण्यास आले. त्यानाही म्हटले, थाबा जेवायला म्हणून. मग आम्ही सर्व जेवायला गेलो. सर्वच मराठी बोलणारे. मग काय, जेवणाचा हॉल आहे हे विसरून गेलों अगदी. सारख्या गप्पा चालल्या होत्या अगदी. बेगिरी स्वभावाने फारच चागले. त्यांना मी पुष्कळ महत्वाच्या गोष्टी विचारल्या व त्यानी आपली स्पष्ट मते सागितलीं. ते लंडनमध्यें १२–१३ वर्षे राहिले. तेव्हा त्याना सर्व माहिती. पोटाकरिताच म्हणून मी येथें राहिलो. उद्या जर मला हिंदुस्थानात जायला मिळाले तर मी प्रथम जाईन. एक तर येथे सर्व यत्राप्रमाणे. जो तो आपल्यापुरते पाहणारा सकाळपासून संध्याकाळपर्यंत चाकोरीत घातल्याप्रमाणे येथील जीवन असतें. आपले शरीर पण यत्राचा एक भाग होऊन बसते. कोणी बोलायला, की कोणाच्या घरी घटकाभर बसून जिवाभावाच्या सुखदु:खाच्या गोष्टी करायला कोणी रिकामे नाही. सर्व कृत्रिम, खऱ्या प्रेमाचा ओलावा नाही. आजारी पडलों तर दवाखाना. मेलों तर टेलिफोनकरून मोटारीनें स्मशानांत रवानगी होईल. द न फुलें कोणी पेटीवर ठेवतील कीं झाले काम. दुसरें, जगांत उत्तम शील जर कोठें दिसत असेल तर तें हिंदुस्थानांतच. मी म्हटलें. आजपर्यंत आमचे पुरुष येथें आले, त्यांना इंग्लिश स्त्रियांचें नटणें, वरवरचे गोड बोलणे, त्याचे कृत्रिम सौदर्य हें सर्व गोड वाटून त्यांनी आपल्याच आईबहिणीची निर्भत्सना केली. आम्ही येथें आलों. माफ करा हं असा प्रश्न विचारतें म्हणून; पण आमचे

पुरुष सोडून आम्हांला गोरे आवडले का? पण त्यांच्याकडे ढुकून बघण्याची देखील आमची इच्छा नाहीं. ह्यावर कोणी म्हणेल की, हिंदुस्थानी बायकाना येथे विचारतो कोण! पण आतां हेही लवकरच पाहायला मिळेल. स्वतंत्रतेच्या फाजील कल्पनेनें मुलीचीही मने बिथरली जातील, व जशीं पाश्चात ांमध्यें नीतिबधने शिथिल झाली आहेत, तशी आपल्याकडील होऊन ह्याचें उत्तर लवकरच मुली देतील. काही दिवस सासूचे व कांही दिवस सुनेचे. असो. असे जर झाले तर ते वाईटच होणार. एकाने वाईट केलें म्हणून दुसऱ्यानें थोडेच तसे करावें! असो. अशा तऱ्हेनें खूप गप्पा मारल्या व नतर बेगिरी व मामा घरी गेले. आता फक्त उद्यांचाच दिवस राहिला, ह्या विचाराने मन विषण्ण झाले. झोप येईना. मग देवाचें नांव घेऊन निजलों झाले.

## २६ नोव्हेंबर

आज आम्ही तिघे Thomas Cook कडे गेलो. नतर Leister Square मध्ये Regent Studio त आमच्या तिघाचा फोटो काढला. १०॥ शिलिंग पडले. फोटो हिंदुस्थानात पाठवितील. यूरोपमध्ये आम्ही तिघे एकजीवानें कसे राहिलो त्याची स्मृति जवळ राहावी म्हणून फोटो घेतला. नंतर Shaftsbury Avenue मध्यें Lyons येथे खाल्लें. किती वेळां तरी आम्ही येथे जात अस. आतां अखेरचा नमस्कार. नंतर भटकत भटकत Aldwych येथे गेलो. हे Saloon मध्यें केस कापण्यास गेले. मी व चबी बाहेर उभें होतों. ह्या वेळेस ४॥ चा सुमार होता. अंधार खूप पडला होता. लगेच दिव्यांचा चकचकाट झाला. मग पायीच चबीला Music आवडे म्हणून Strand वरील Lyons मध्ये गेलो. हें केवढें तीन मजली व किती सुदर. दुसऱ्या मजल्यावर Orchestra चालला होता. मुख्य मनुष्य हंसून हावभाव करून वाद्यांना ताल देत होता. चहाला तरी माणसाची कोण गर्दी होती. येथें Waiters असत. मोठमोठ्या माहागड्या हॉटेल–Restaurants मध्ये पुरुष कामाला असत. बायका अगदी थोड्या. असो. चबीला एकंदर युरोपियन प्रवास फारच आवडला. येथें चहाला येण्यास तिला नेहमीच गमत वाटे. लहानपणीं आनंद निर्व्याज असतो. चबीचें तर काय सर्वच दृष्ट लागण्या-

सारखें. शिवाय तिला येथे सर्वच गोष्टींत मजा वाटे. पाश्चात्यांच्या सर्व गोष्टींची भुरळ पडते. तिच्या बालिश आनंदांत आम्ही भाग घ्यावा असे तिला वाटे. 'गाणें किंवा वाद्यें' हृदयांतील नाजुक भावना छेडीत असतात. आई आपल्या बाळाला निजवीत असतांना मंजूळ स्वरांत गाणे म्हणू लागली कीं न कळत प्रेमभरानें खळ्कन् दोन अश्रू ऐकणाराच्या डोळ्यातून पडून जातील. तसेंच हें गाणे माझ्या हृदयांत कालवाकालव करून सोडीत होतें. आणि एकच नाद कानांत घुमत होता : 'आम्ही आहोंत असेंच राहणार का' आणि ह्या नादानें एकेक वृत्ति उचबळून येऊं लागल्या. एकादे वेळेस रडून मन हलकें होतें, व मग आपण भानावर येतों. 'आणि नाही, आम्हीं असे राहणार नाहीं' असें ठरविलें. मी माझा विचारवेग तेथेंच थांबविला. म्हटलें चबी लहान आहे. तेव्हां तिचा आनंद कशाला घालवा. तिच्यांत समरस व्हावें. असो. नंतर थोडा वेळ वरील विचारांत तर कांहीं वेळ चबीशीं खेळण्यांत घालविला. नंतर आम्ही चहा घेतला, व मग Trafalgar Square अखेरचा पाहून त्याच स्टेशनवरून Tube नें Oxford Circus ला गेलों. ऑफिसें सुटल्यामुळें अतिशय गर्दी होती. डब्यामध्यें अगदीं खूप माणसें उभीं होतीं. आम्ही Oxford Circus वरून Tube नें Lancaster Gate ला गेलों. रात्रीं कोठेंच गेलों नाही, कारण फारच थंडी होती.

---

# प्रकरण सातवें

## मायदेशाच्या वाटेवर

### ता. २७ नोव्हेंबर १९३६

आज शुक्रवार, हवा चांगलीच होती. आम्ही २ वाजतां जाणार म्हणून सर्व बांधाबांध केली, व नतर तिघे Lancaster Gate वरून Tube नें Bond Street ला गेलों. तेथून पायीच T. Cook कडे गेलों. तिकिटें वगैरे घेतली. येथे आम्ही कितीदा तरी येत असूं. आजूबाजला सर्व रस्ते पाहिले. जेव्हां आम्ही प्रथम आलों तेव्हां किती गांगरून गेलों. हेंच ऑफिस सांपडायला किती जणांना विचारलें व वेळ लागला. पण आतां आम्हांला कोनाकोपरा माहीत झाला. चबीदेखील वाटेल तिकडे एकटी जाई. नंतर पायींच आम्ही Bond Street वरून Selfridges वरून Marble Arch वरील Lyons Corner House मध्यें पाऊणच्या सुमारास गेलों. हें तर अत्यत नवीन पद्धतीचे होतें. जेवणाच्या अतिशय भव्य दिवाण-खान्यांत विजेचे दिवे तरी किती सुदर व त्यांचा प्रकाश डोळयांना तापदायी नसून अतिशय मनोहर होता. ह्या वेळेस पण लोकांची खूप गर्दी होती. थोडयाच वेळांत Music सुरू झालें. Waiters, Waitresses सुंदर खाद्यपेयें आणून हंसतमुखानें व त्वरेनें देत होती; आणि एकच गडबड होती. आम्हीं खाल्लें व बराच वेळ Music ऐकत बसलों, कारण आतां हें अखेरचेंच. पुनः येतों की नाहीं कोण जाणें व आलोंच तरी असे तिघे जण व अशा चांगल्या स्थितींत! नंतर बाहेर पडलों. बाहेर जरा ऊन पडलें होते. सर्व कसें छान दिसत होतें. हल्ली ६–७ दिवस सारखें धुकें होतें. अर्थात् त्या पावसापेक्षां धुकेंच बरें. पण सूर्यप्रकाशाची सर कशाला नाहीं. आपल्या नेहमींच्या Hyde Park मधून एकदां दर्शन घेऊन यावें म्हणन तिकडून फिरत फिरत घरीं गेलों. आमचा Fellowship Club, with all its defects आम्हांला आवडे. आपण सगळयांशीं गोड असलों म्हणजे तेही असतात.

Miss Annear ही मुख्य Manageress व Mrs. Presse ही दुय्यम Manageress ह्या दोघी, व Maids व आमचा हिंदुस्थानी स्वयंपाकी, सर्वच चांगले वागत. नोकरांना आम्ही बक्षीस देत असू व बोलणें गोड. तसेंच Manageress शीं पण, त्यामुळें आमचें नीट होई. अशा तऱ्हेने हें आमचें घरच आम्हाला वाटे. एक तर येथे पैसे त्या मानानें कमी. आपले मोठमोठे चांगले लोक येथे येत असत. त्यामुळे परकेपणा वाटला नाही. शिवाय एक वेळ आपले अन्न मिळे. सर्व वस्तीस हे जवळ पडे. म्हणून आम्ही येथेंच राहात असू. सामान वगैरे मोटारीत ठेवून Miss Annear चा निरोप घेऊन आमचें हे तात्पुरतें घर आम्ही सोडले, व St. Pancras Station वर गेलो. मोटारीची व आमच्यासारख्या जाणाऱ्या लोकांची गर्दी होती. मामा बेदरकर पण एवढ्यात आले. Platform कसा माणसानी फुलून गेला होता पुष्कळसे आमचे विद्यार्थी होते. त्याना ‘प्रेमाचा’ निरोप द्यायला त्याच्या पुष्कळ गौर ‘मैत्रिणी, नव्हे मोलकरणी’ ज्यांना लग्नाच्या आशेवर भूलथापा देऊन ४–५ वर्षे ज्यांच्या शरीराचा पूर्ण मनमुराद उपभोग घेतला, अशा आल्या होत्या. ह्यातील जे I. C. S. असतील ते भाग्याचे म्हणायचे; पण बाकीच्याची वाट काय? आतां मोलकरणीचे शिव्याशाप मात्र खचित बाधतील व ‘No Vacancy’च्या पाट्या जागोजागी दिसून ज्या डोळ्यांनी ही बेकायदेशीर दृश्यें पाहिली त्याना अंधेरी येईल मात्र. आणि मगच पाश्चात्य सुधारणा व नखरे फोल आहेत हें कळेल. आज मात्र प्रत्येकाच्या—लहान मोठ्याच्या—तोंडांत Pipe पाहून तरुणांची कीव येते मात्र. ते इग्लंडहून जाऊन आले; साहेबासारखे छंद करतात म्हणून साहेब कांहीं ढुकून त्याच्याकडे बघत नाहीत व आपल्या हिंदुस्थानी लोकांशीं बोलायला त्यांना आवडत नाही. त्यांच्याशी बोलायला धजतो कोण! असो. आमची गाडी सुटली. हिंदुस्थानांत जाणाऱ्या गौरवर्णीयांचा ‘आमच्या कल्याणाकरितां’ येणारा थवा पाहून डोकें फिरून गेलें. आमचें कल्याण आम्ही करूं. लोकांना कां आमची काळजी? मिशनरी, डॉक्टरणी, नर्सेस, मास्तरणी जो येतो तो आम्हांला शिकवितो. मनांत काहूर उठलें. आम्ही इतकें दुसऱ्यावर अवलंबून कां? आमचें आम्ही कधीं करणार? पण आतां हें म्हणून काय उपयोग? हातचें गेलें, आतां आपल्या

हातांत आहे ती सुधारणा तर करून घ्यायला हवी ना! असो. आलें अखेरीस Tilbury Dock. आमचे लोक, जहाजावरील मुबईचे कामकरी, सर्व दिसले. त्यांच्याकडे पाहाण्याची आमची दृष्टि बदलली. 'ते आमचे आहेत' असा दृढ विश्वास वाटला. त्यांच्यावरचे आपलेपणाचें प्रेम जास्तच वाढलें. त्याना हिडिस फिडिस तर करणारच नाही, पण जास्त प्रेमाने वागविणार. नतर मामांचा व आमचा सर्वाचा असा डेकवर फोटो घेतला. येथें प्रेमाचे म्हणजे आमचे बेदरकरच एकटे. ते विद्यार्थी, 'पण पुढें काय' असा आम्हाला व त्याना मोठा प्रश्नच आहे. ह्यांनी त्यांना पुष्कळ उपदेश केला व जेवढी म्हणून मदत करतां येईल तेवढी करीनच असा भरंवसा दिला व मामांना निरोप दिला. मामा जाण्यापूर्वीं आम्ही सर्वांनी चहा घेतला. नतर लोकाचे निरोप देणें-घेणें बघत होतो. विरह मोठा कठिण असतो. साहेब रडतात किंवा नाही, असें वाटे; पण तेही रडतात. मनुष्य येथून तेथून सारखाच. स्वतःचा देश, प्रेमाची माणसे, कोणाला नको थोडींच आहेत. स्वतःचा देश खाऊं घालण्यास असमर्थ म्हणूनच कांहीना देशांतर करावें लागतें.

जेवणानंतर निजलों. टेम्स नदीतून प्रथम बोट संथ चालत होती. त्रास झाला नाही.

## २८ नोव्हेंबर

सकाळी धुकें होतें. आम्ही सर्व डेकवर खूप हिंडलों. दुपारीं ऊन पडले. रात्रीं चंद्रामुळें सर्व देखावा सुंदर दिसत होता. किती तरी दिवसांनी चंद्र-सूर्य दिसले. इतके दिवस जिकडे तिकडे कृत्रिम शोभा पाहिली. पण निसर्गाची मजा कांही अप्रतिमच असते. समुद्रावरील स्वच्छ हवेनें ह्यांना पण बरे वाटलें. आम्हांला खूप भूक लागे. बोटीवर खायला पण विविध प्रकारचें व छान असे. खायचे, मेहनत घ्यायची व लिहावयाचें असा कार्यक्रम चालला होता. अजन विशेषशा ओळखी झाल्या नव्हत्या. येथून इंग्लिश खाडी आहे. असो. चबीला लंडन सोडतांना अत्यंत वाईट वाटलें. तिचा जीव आंतल्या आंत कोंडला जात होता. रडूं धुमसत होतें. चहाच्या वेळेस कांहीं खाईना. नवीन पिढीला पाश्चात्यांचें कौतुक आहे. हा त्यांचा दोष नसून

तो शंभर नबरी इंग्रजी शिक्षणाचा आहे. आम्ही रात्रंदिवस ती देशावर प्रेम करणारी व्हावी म्हणून प्रयत्न करतों. पण दोघे आईबाप हेच काय करूं शकणार ? बाकीचें वातावरण निराळें. तेव्हां साहजिकच तिला आमचें पटत नाही. तिचें तिलाच मोठें झाल्यावर कळेल. अशा गोष्टी सांगून कळत नाहीत, अनुभवानेंच कळतील.

## २९ नोव्हेंबर

आज सूर्यप्रकाश बराच आहे. त्या मानाने थंडी पण कमी झाली. आज आदितवार, तेव्हां चर्च-प्रार्थना होणार असे बोर्डावर लिहिलें. तें पाहून चबीने प्रश्न विचारले. बोटीवर देखील प्रार्थना, देवधर्म आहे. ह्या तिच्या विचाराचा मी फायदा घेऊन आपणही प्रार्थना करावी, धर्म पाळावा, आपल्या देशावर प्रेम करावें; साहेब कसें, इंग्लंड सर्व देशांत उत्तम समजतात, त्यांचा धर्म पाळतात, त्याच्या राजावर प्रेम करतात, तसेंच आपण करायचे. सोनारानें कान टोंचले म्हणजे दुखत नाहीत. साहेबाचे पाहिलें म्हणजे मगच कळतें. आज सकाळपासून आम्ही बिस्केच्या उप-सागरांत आहोत. समुद्र विशेष खवळलेला नाही, मध्यम आहे. अद्याप कोणी आजारी पडले नाही.

## ३० नोव्हेंबर

आज दुपारी Mrs. How Martin, Birth Control च्या पुरस्कर्त्या ह्या मुबई येथील डॉ. पिल्ले ह्यांच्या निमंत्रणावरून मुंबईस आमच्याच कैसर-इ-हिंद बोटीनें जात होत्या. त्यांची भेट घेतली. जागोजागी Clinics कशी उघडावीत व नवे नवे कोणते उपाय योजावेत ह्यांची माहिती त्यांच्या-जवळून घेतली. अमेरिकेत नुकताच Foam Powder हिचा शोध लावला आहे. मला ती दाखविली. किंमत १ रुपया. वर्षभर सहज पुरेल.

हिंदुस्थानांतील बहुजन समाजाच्या चांगली ती उपयोगी पडेल. कदाचित् ह्यांना नाशिकला बोलावून डॉक्टरणी वगैरेंची ओळख करून Clinics उघडण्याचा मी प्रयत्न करणार आहे. त्या नाशिकला यायला तयार आहेत.

रात्रीं ग्रामोफोनवर नाच होता. इतकी थंडी पडली होती तरी बायका सुंदर पातळ कपडे, अंगें बहुतेक उघडीच असें घालून नाच करीत होत्या. खूप गर्दी होती. बायकांची अंगें अगदीं सडपातळ. त्यावर अगदी रेखीव असे कपडे. फारच शोभा देत होते. इतकें बारीक अंग राहतें कसें याचेंच आश्चर्य वाटतें.

## १ डिसेंबर १९३६

आज सकाळी १२॥ ला Tangier लागलें. भोंवतालीं टेकड्या, डोंगर, निळा समुद्र, त्यावरील स्वच्छ सूर्यप्रकाश छान दिसत होता. इंग्रजांची जहाजें व विनाशिका तर मधूनच डौलाने स्वतःच्या साम्राज्यपदाची द्वाही दशदिशा फिरवितांना दिसत. जिकडे नजर फेंकावी तिकडे त्यांचें साम्राज्य. P. & O. बोट त्याची, विनाशिका वगैरे सर्व त्याचें. किती हेवा करण्यासारखें त्याचें ऐश्वर्य सर्व. आमची बोट तरी मिशनरी, मास्तरणी, मिलिटरीतील लोकानी भरून चालली आहे. हें पाहून आपल्या हीन परिस्थितीचें पदोपदीं दुःख होतें.

लहान लहान जहाजातून टॅंजिअरचे लोक आपला माल, उशांच्या रंगीत जरीच्या खोळी, परड्या, हातांतल्या पैशाच्या सुदर पिशव्या वगैरे घेऊन मोडक्या इंग्लिशमध्यें मोठे मजेदार बोलत. हें पाहून गंमत वाटली.

टॅंजियर ( मोरोक्को ) हें आंतरराष्ट्रीय मालकीचें. आफ्रिकेच्या ( North West ) वायव्येला आहे. ह्याच्या भोंवतीं स्पेनच्या मालकीचा मोरोक्को आहे. टॅंजियर हा जुन्या रोम राज्याचा अवशेष आहे. शेती आहे. त्यानतर येथे पोर्तुगालची सत्ता व नंतर इंग्रजांची सत्ता झाली, व नंतर आंतरराष्ट्रीय सत्ता प्रस्थापित झाली. आम्ही इंग्लंडला जातांना हें गांव पाहण्यास गेलों होतों. त्या वेळेस तेथील लोकांचा मोहरम-प्रमाणें सण होता. रस्त्यांतून वाजत गाजत मिरवणूक निघाली. अतिशय गर्दी होती. अगदी हलतां येईना. लोक पुष्कळसे गोरेपान व गुटगुटीत दिसले. बायका खिडक्यांतून मजा बघण्यास बसल्या होत्या. मोठी मजा वाटली. असो. म्हणून ह्या खेपेस आम्ही गेलों नाहीं. बोटीवरील पुष्कळ मंडळी गेली होती.

येथें ह्यांनी खूप फोटो काढले. एका विनाशिकेचा फोटो घेतला. वाटेंत असें बंदर लागले म्हणजे मोठी करमणूक असे. नंतर ४॥ ला बोट निघाली. ७ च्या सुमारास जिब्राल्टर लागले. जिब्राल्टर हें भूमध्य समुद्राचें मोठें संरक्षक नाकें आहे. हें १७०४ साली इंग्रजांनीं घेतले. ह्यावरील सत्तेचा इंग्रजांना साहजिकच मोठा अभिमान आहे. येथें लढाई सुरू झाल्यास हिंदुस्थानचा रस्ता बंद होईल. इंग्रजांनी हें घेण्यापूर्वी येथे दहा स्वाऱ्या झाल्या. असो. आज इंग्रजाची चलती आहे एवढे खरें.

टॅंजिअर व जिब्राल्टर येथे सिंधी-पंजाबी व्यापारी भेटले. आम्हीं पैशाच्या पिशव्या व Ladies Hand Bags विकत घेतल्या. सुदर आहेत. रात्री मी व चबी बुद्धिबळाचा डाव खेळत डेकवर बसलो होतो. जवळच एक मिशनरी धुळयाला १५ वर्षे राहात असलेला येऊन खेळ पाहात उभा राहिला. तो मराठी अतिशय चांगलें बोलू लागला. नंतर खेळांत भाग घेऊ लागला. त्याच्या मराठी बोलण्याचें मोठे कौतुक वाटले. आमच्या भोळयाभाबडया अशिक्षित लोकांना जाळयांत अडकविण्याकरितां गोड बोलून भूलथापा देऊन बाटवायचे एवढयाकरितां भाषा शिकायला लागली. बोटीवरील सर्वच लोक आमच्या कल्याणाकरिता चालले आहेत. आम्ही हिंदुलोक अति सरळ, साधे, देवदेव, धर्म, जात करीत बसून आपल्या बांधवांना सोडून दिले. म्हणूनच मिशनऱ्यांनी कळवळा दाखवून त्यांना आपल्याकडे ओढले. परराज्याची कीड-उधई हिदुस्थानला लागली खरी. १५० वर्षे राज्य झाल्यावर आम्ही कोठें डोळे किलकिले करून पाहात आहोत. मिशनऱ्याला उत्तम मराठी येतें म्हणून कौतुक करूं की आम्ही मूर्ख म्हणून वाईट वाटून घेऊं! चुकलें आमचे. सर्वच चुकलें एवढें खरें. 'ज्याचा जो व्यापार तेथे असावें खबरदार' ही रामदासांची म्हण खरी. ह्यांत साहेबाचा दोष नाहीं. आम्ही कां असे निष्काळजी ?

## २ डिसेंबर

आमच्या बोटीवर एक बंगाली लंडनची T. D. झालेली मुलगी व एक अगदीं अशक्त लहानसर ५-६ महिन्यांपूर्वी लग्न झालेली गुजराथी मुलगी लंडनला नवरा बॅरिस्टरी शिकायला गेला त्याजबरोबर गेली होती.

थंडी सोसवेना म्हणून परत आली. दोघी आपल्या साऱ्या दिवसभर Lounge मध्यें बसून राहात. कारण काय थडी वाजते. खरे म्हटलें तर ह्या गुजराथी मुलीवर केवढी जबाबदारी आहे ! एक तर नवरा ४ वर्षें विलायतेंत राहणार आहे. तो दुसऱ्या सुदर सशक्त चुणचुणीत मुली पाहातो. तेव्हां त्याला ही तोंडावर प्रेतकळा आलेली निश्चल मुलगी कशी पसत पडणार. तो चागला धडधाकट व ही अशी रोगट. मी तिला अप्रत्यक्ष रीतीने सागे, पण ती कांही खेळायला फिरायला तयार नाही. बंगाली मुलगी म्हणाली, इंग्लंडला जाताना सर्व हिंदुस्थानी मंडळीत एकी असे, ह्या खेपेस नाही. मला कटाळा आला. मी म्हटले, आपण सर्वच 'साहेब' बनलों, व एकाचे तोंड इकडे तर दुसऱ्याचें दुसरीकडे असें झाले. आमचे लोक आम्हीच टाळतों. आमचे विद्यार्थी तर धूम्रपान, मदिरापान, व बोटीवरील इंग्रज कुमारिकेशी लागूलचालन करण्यांत गढले आहेत. पुष्कळ, रात्रीं Dinner Jacket घालून तोंडात Pipe धरून 'काळे साहेब' झाले आहेत. पण उद्यां हिंदुस्थानांत गेल्यावर नोकरी मिळाली नाही—No Vacancy अशा पाटचा दिसल्या म्हणजे कळेल. एकंदरींत आमच्या समाजाचा विचका झाला आहे एवढें खरे.

शिवाय बोटीवर पुष्कळ आधुनिक फॅशनेबल कुमारिका आहेत. त्यांचीही वागणूक बघावी. सारखे सावज गाठण्याच्या शोधात असतात. त्यांचें तें अभिनय, ताठ छाती करून लोकांचे डोळे आकर्षण करण्याची पद्धत, ते रंगीत केंस, ती नखें, ते हिडिस रंगलेले ओठ, पुरुषांशी बोलण्याची उत्सुकता ! बाकी बोटीवर खूपसे गोरे अविवाहित खलाशी आहेतच. त्यांची सोय नको कां कांही ! नुसत्या नांवाच्या कुमारिका. चित्त थारी नाही. आम्हीं हिंदुस्थानी लोक नेहमीच वाईट अर्थ घेतो असे कांही म्हणतात; पण नीट जर पाहिलें तर ह्या गोडगोड बोलण्याचा, चाळे करण्याचा, अर्थ दुसरा तिसरा कांहीं नसून 'कामुकच' आहे. ह्यांत तिळमात्र शंका नाही. सामाजिक बंधनें नसल्यामुळे वाटेल त्यानें वाटेल तें करावें येथें. असो !

टँजिअर सोडल्यापासून आम्ही भूमध्य समुद्रांत आहोंत. आज समुद्र किती तरी शांत होता. त्यामुळें फारच सुरेख दिसत होता.

## ३ डिसेंबर

कालचा समुद्राचा शांतपणा जाऊन आज त्यानें रौद्ररूप धारण केलें होतें. सागरावर कोणी भरंवसा म्हणून ठेवतां कामा नये. आजचें त्याचें रूप पाहून जीव गर्भगळित होत होता. आमचें जहाज ह्या अफाट सागरांत एकाद्या खेळांतल्या होडीप्रमाणें हेलकावे खाऊं लागलें. नेहमीं माणसानें फुललेला डेक, आज अगदी खालीं पडला व प्रत्येक जण केबिनमध्यें जाऊन बसला. असें मार्से Marseilles पर्यंत झालें. वारा इतका जोराचा होतां की, त्याचा 'सू' आवाज कानठळी बसवीत होता. त्यामुळें जहाज मार्सेच्या किनाऱ्यावर न जातां समुद्राच्या मध्यभागीं थांबलें. सर्वांची निराशा झाली, कारण तेथें आम्ही सातला पोहोंचलों असतों व आम्हांला खालीं उतरायला मिळालें असतें. असो. रात्र तशीच काढली.

## ४ डिसेंबर

सकाळी जहाज किनाऱ्याला लागलें. आम्ही चहानंतर ११ च्या सुमारास ट्रॅमनें गांवांत गेलों. पुनः आठ दिवसांनी पहिल्याप्रमाणें दुकानें बघत भटकायला मिळालें म्हणून मजा वाटली. नाताळ जवळ आल्यामुळें दुकानें छान सजविलीं होतीं. मुलांची खेळणीं तर फारच सुबक तऱ्हेनें मांडलीं होतीं. १२॥ वाजतां ट्रॅमनें जेवावयास जहाजावर आलों. पुनः ३ वाजतां गांवांत गेलों. ५ वाजतां Cafe मध्यें कॉफी घेतली. कारण आतां ही मजा शेवटचीच होती. नंतर ६ ला बोटीवर आलों. रात्रीं जेवणानंतर जवळपासच हिंडलों.

## ५ डिसेंबर

आज सूर्यप्रकाश फारसा नाही. वारें सुटलेंच आहे तरी पण समुद्र चांगला आहे. सकाळीं ७ ला मार्सेहून बोट सुटली. आदल्या रात्रभर बोटींत कोळसा घेण्याचें काम चाललें होतें. त्यामुळें सारखा आवाज व गडबड होती. आज रात्रीं नाच झाला. मार्सेला श्री. ना. म. जोशी चढले.

## ६ डिसेंबर

आज दुपारी ४ वाजतां Stromboli बेट लागलें. हें एका ज्वालामुखी डोंगरावर आहे. त्यांतून थोडासा धूर येत होता. डोंगराच्या पायथ्याशीं घरें व वस्ती दिसली. खालीं अफाट दर्या वर ज्वालामुखी पर्वत, येथें लोक कसें राहात असतील? पण ज्याचा त्याला स्वदेश प्रियच आहे. स्ट्रँबोलीच्या लोकांना आपला देश सोडून चला म्हटलें तर ते येतील का? असो, हृयांनीं त्यांचा फोटो घेतला.

संध्याकाळी ६ ला एका बाजूस सिसिली व एका बाजूस इटली लागली. दिव्यांचा चकचकाट दुरून छान दिसला. शिवाय जमीन दिसली कीं आनंदच होई. एकसारखें पाण्यांत राहून माणसाला कटाळाच येतो. बोटी-वरचीं माणसें सारखी डेकवर येऊन शोभा बघत राहिली.

## ७ डिसेंबर

आज रोजचाच कार्यक्रम. विशेषसें कांहीं घडले नाही. खावें, प्यावें, खेळावें, असे चाललें होतें.

## ८ डिसेंबर

आज समुद्र फारच संथ होता. आतांशी रोज ४॥ वाजतां सूर्यास्त होई. समुद्रावरील रविराजाचें गृहगमन अतिशय रमणीय दिसतें. सागराच्या लीला, सूर्यास्तानंतरचे एकापेक्षां एक मनोहर रंग, परमेश्वराच्या अगाध लीलेचें कौतुक करण्यात मन गुगवून सोडतात. आणि वाटतें, खरेंच देवा, हृया तऱ्हा तू केव्हां व कशा केल्यास? समुद्र संध्याकाळपर्यंत कसा शांत होता; पण लागलीच सागराची लहरी स्वारी खवळली. कसा अगदीं एकाद्या नाठाळ मुलासारखा आहे! एकाद्या दिवशीं असें नाठाळ मूल शांत दिसलें व एकाद्यानें म्हटलें कीं, कसें छान गरीब मूल आहे. त्याबरोबर आईनें म्हणावें, 'कांहीं नावाजूं नका. दाखवील आतांच.' तद्वत् सागराचें आहे. त्याच्यावर कोणीं विश्वासू नये. रात्रीं फारशी नाहीं तरी पण चांगलीच बोट हलली. लाटा किती तरी उंच उसळत होत्या. केबिन-

च्या खिडकीवर उसळी मारून जात. पण एकंदरीत सागराचीं हीं बदलतीं रूपें बघण्यात तासन् तास वेळ केव्हाच निघून जातो. पाण्याच्या खळखळाटा-बरोबर मन आनंदलहरीत बहरून जाते व हृदयांतील काव्य उचबळून येतें. लाटांच्या तालावर हृदयातील गान न कळत बाहेर पडलें. आणि तें कोणाचे तर त्या जगच्चालकाचें! मी तरी त्या तालाबरोबर 'प्रभुकीर्ति गान भरूनि धवल सृष्टि गातसे' असेंच वरचेवर म्हणे. आणि ते म्हणतांना जीव परमेश्वराच्या विचारातच गढून जाई. कोणी किती जरी म्हटले तरी देवाशिवाय दुसरें कोणी नाही आणि त्याचें स्मरण रोज घडो, त्याला कोणत्याही स्थितीत न विसरो, एवढे झाले म्हणजे जो अत्यानद मनाला होतो तो दुसरा कशांतच नाही. असो.

## ९ डिसेंबर

आज ४॥ लाच Port Said लागले. येथेही जहाजावर कोळसा घेतला. आमच्या केबिनच्या खिडकीजवळूनच कोळसा घालीत. आता पौर्वात्य देश लागला. मार्सेला कोळसा घालतांना गोरे हमाल कांचेकडे बघत नसत, कारण आतमध्ये माणसे असतील म्हणून. पण आता आमचे लोक लागले व ते खुशाल कुतूहलानें आत कोण काय करतें हे पाहात व हंसत. अर्थात् हा शिक्षण नसल्याचा परिणाम. कामाशिवाय उगाच बघत बसणे, दरवाजाचे पडदे वर करून बघणे, दुसऱ्याच्या घरांत विचारपूस न करतां वाटेल तिकडे जाणे, ही रीत नसण्याची लक्षणें आहेत. व्यर्थ नसत्या लोकांच्या उठाठेवी करणें वगैरे गोष्टी युरोपिअन देशांत मुळीच दिसत नाहींत. कोणी कांहीं करो. असो. ह्या गोष्टी शिक्षणानेंच येणार.

आम्ही चहा घेऊन ८। ला बाहेर पडलों. Simon Arts हें एक मोठें इंग्लिश पद्धतीचें दुकान आहे, तेथें गेलों. पण आतां ह्या दुकानांत मजा वाटेना. लंडन, पॅरिस येथील इतकी सुदर सुंदर दुकानें पाहिली, त्यापुढें हें काय वाटणार. पोर्ट सैयदची विकणारीं माणसे. अगदीं पंड्यासारखी मागें लागत. अगदी हंसूं येई. हिंदुस्थानी आम्ही लोक तेव्हां कोण राम राम म्हणे, तर मुलीला कोण बाबा हाक मारी 'तर या बाई आमच्या दुका-नांत' असें कोणी म्हणे. असो. घरें वगैरे पुष्कळशीं नवीन तऱ्हेचीं दिसलीं.

रस्ते मोठाले आहेत पण घाणेरडे. नतर Ferdinand De Lessepes चा पुतळा पाहून ९। ला जहाजावर आलो कारण ते ९॥ लाच सुटणार होते. ए डेकवर खुर्च्या टाकून सर्व मंडळी बसली. बोट सुटली. आजचा सर्वच प्रवास मोठा रमणीय झाला. कारण आम्ही आतां सुएझ कालव्यातून चालली होतों. तेव्हा दोन्ही बाजूनी जमीन दिसे. बगले, मोटारी, आगगाड्या असे वरचेवर दिसे. जहाज ताशी ८ मैल ह्या वेगाने चाले. मधून मधून कालव्याच्या कामगार लोकाचे सुदर टुमदार बगले व क्लब वगैरे दिसत. एकदरीत रात्री १० पर्यंत जमीन दिसली व तेथून उघड्या समुद्रांत म्हणजे (Red Sea) ताबड्या समुद्रात आम्ही आलो आमच्या बोटीवरच आतापर्यंत एक आफ्रिकन मनुष्य होता. तो Harward University चा पदवीधर होता. आमच्या टेबलावर तो जेवायला असे किती हंसतमुख (हसे वरकरणी असे नव्हे पण त्याचे चेहऱ्यावर अंतःकरणाच्या सात्त्विकतेचे पडसाद उठत, आतील प्रेमळ हृदयाचे प्रतिबिंब चेहऱ्यावर उमटे), रग काळा म्हणूनच ह्या लोकाना रानटी समजणे म्हणजे परमेश्वराच्या कृतीलाच हंसण्यासारखे आहे. हा म्हैसूरच्या Y. M. C. A. च्या Conference ला चालला होता. आपल्या चागुलापणाने तो पुष्कळाचा आवडता झाला होता. आणि खरेच अशा तऱ्हेने माणसे शुद्ध प्रेमभावानें एकमेकांत मिसळली तर जगात युद्धाच्या भावना राहतील का ? जो अंतरीचा निर्मळ आहे, त्याच्या वरच्या रंगाकडे काय पहायचें. पण आजकाल गोऱ्या रंगाचा वरपक्ष आहे. आणि म्हणूनच ह्या काळ्या रंगाला भयंकर जाच होत आहे. तो आज गेल्यामुळे आम्हाला कसे सुने वाटलें. सारख्या परिस्थितीच्या देशांतील लोक भेटले म्हणजे अशी ही सहानुभूति वाटते.

आमच्या टेबलावर आणखी एक स्विस् गृहस्थ आहेत. ते बिहारमधील धरणीकंपांत नुकसान झालेल्या लोकाना घरेदारे बांधण्यांत मदत करण्यास जात आहेत. व्हाइसरॉयांचा फंड व कॉंग्रेसचा फंड ह्या कामांत ते आणखी तिघे इंग्रज व बाबू राजेंद्र प्रसाद असे मिळून पांच जण आहेत. मला राहून राहून मजा वाटते ती ही की ज्यांना आमची भाषा येत नाही, आमची पद्धति माहीत नाहीं, असे आम्हाला काय घरें बांधून देणार ? हे गृहस्थ स्वतः चांगले सुस्वभावी आहेत. पण आमचें आम्ही तें करूं शकणार नाहीं का ?

परक्या लोकांनीं कां आमचें करावें ? एकेक जण पाहावा तो कोणत्या ना कोणत्या कामाकरितां आमच्या देशांत चालला; कारण काय तर आमच्या कल्याणाकरितां ! आमचें आम्ही कधीं करणार तेव्हां खरें.

## १० डिसेंबर

आज तांबडा समुद्र लागल्याबरोबर लागलीच जहाजाच्या कामकरी वर्गांत Stewards च्या पोषाखांत एकदम फरक पडला. शिस्तीचें व तरतरीत-पणाचें खरेंच मोठें कौतुक वाटलें. ह्यांच्यांत आळस 'राहूं द्याहो, कोण बदलतो आतां' असें रडगाणें नाही. पांढरे म्हणजे एकजात सगळ्यांचे स्वच्छ पांढरे कपडे. अशा शिस्तीच्या लहानसहान गोष्टीच घेतल्या म्हणजे मग मोठ्या कामात त्याचा उपयोग होतो. शिस्त ही कशी त्यांच्या हाडीमांसी खिळलेली आहे. ह्याला कारण त्यांची थंड हवा असेल. पण ती आपण आपल्या उन्नतीकरितां जास्त मेहनत करून आणली पाहिजे, ह्यांत मुळीच संदेह नाही. तसेच गोऱ्या बायकांतही लागलीच फरक कालपासून दिसला. आतां प्रत्येकीचे रंगीबेरंगी रेशमी किवा सुती कापडाचे कपडे आले. मोजे, बूट जाऊन त्या जागी Sandals आल्या. गोरीपान अगें जास्त उघडी दिसू लागली. आतां मोकळेपण जास्त जास्त वाटू लागलें. तर ताठरपण दर गोष्टींत दिसू लागलें ! (Please) अदबीनें मागण्याची पद्धत जाऊन थोडी अरेरावी आली. तिकडचें सर्व अडचणीचें जीवन म्हणजे स्वतःचें स्वतः करण्याचें जाऊन आतां राजासारखें ऐश्वर्य भोगण्याचे दिवस आले. मुख्य वाईट वाटतें तें नोकरांना ऐटीनें मागण्याचें. आमचे लोक पण तसेंच करतात. तिकडे, दीडदमडीच्या पण गौरवर्णाच्या व नटव्या मोलकरणींस आम्ही मोठ्या अदबीनें Please म्हणत असूं. पण तेच आमचे गरीब बिचारे नोकर त्यांना कोण असें म्हणतो ! असा फरक आमचा आम्हीच करणें म्हणजे किती वाईट ! तसेंच जे गोरे तिकडे हॉटेल रेस्टॉरंटमध्यें अगदी चूप बसून शांतता ठेवतात तेच आतां जेवण्याच्या खोलीत वाटेल तशी गडबड करूं लागले. हा सर्व राज्यपदाचा परिणाम असेंच नाहीं का ?

आज रात्रीं नेहमींप्रमाणेंच नाच चालला होता. १० वाजतां Wireless. राजा एडवर्ड हा Miss Simpson हिजशी लग्न करणार व त्याकरितां

स्वखुषीनें तो राज्यत्याग करीत आहे. त्या बाईचा नाद सोडावा किंवा राज्य सोडावें अशीच अट होती, तेव्हां बाई सोडवेना! मग राज्य सहाजिकच सोडावें लागलें, हें वर्तमान ऐकल्यावर आम्हां दोघांना अतिशय वाईट वाटलें. कांहीं सुचेना. तो नात्यागोत्याचा थोडाच. पण कोणाचेंही मनस्वी नुकसान झालें म्हणजे सर्वसाधारण मानवी अंतःकरण द्रवलेंच पाहिजे. राजा देशत्याग करून जाणार म्हणून जीव हळहळला. मला वाटलें अगदी राजास जाऊन सांगावें की तू जाऊं नकोस म्हणून. भलत्याच्या प्रेमांत पडलें म्हणजे केवढा अनर्थ माजतो! Miss Simpson व राजाचा राजसंन्यास इतिहासांत अबाधित राहील एवढे खरें. अशी वाईट गोष्ट व्हायला नको होती. असो. दुःखें ही राजापासून सर्वत्राला आहेत एवढें खरें. होणारें तें होणारच, त्यांत ब्रह्मदेव आला तरी बदल व्हायचा नाही. राज्यपद लाभून देखील कपाळीं सुख लागण्याचें नव्हतें. देश, मायेचीं माणसें ह्या सर्वांस एका Miss Simpson करितां मुकावे लागलें. त्या रात्री ही अशी दुःखद वार्ता समजली, पण इग्रजांच्या नाचांत कांही खंड म्हणून पडला नाहीं. कोणाचाही जीव गेला तरी स्वसुखांत व्यत्यय न येऊं देणारे इंग्रज कांही आपला कार्यक्रम सोडायचे नाहीत. एकाच्या चेहऱ्यावर कांहीं दुःखाची छटा नाही. इंग्रज अत्यंत हिशोबी. त्यांची मतलबाशी गांठ. खावे, प्यावें, नटावें, मुरडावें, मजा करावी. इकडे स्मशानांत मनुष्य जाळून आले, तर लागलीच हांसून नाचायला जातील. इंग्रज म्हणे आपलें दुःख लोकांस दाखवीत नाहींत. ज्या मनास विकार नाहीं तें मानवी मन कसलें! त्यांच्या मनांत उघड उघड फक्त श्रृंगार रस चांगला दाखवितां येतो. इंग्रज हिंदुस्थानी लोकाप्रमाणें भावनावश होत नाहीत म्हणूनच मायदेश सोडून केवळ स्वसुखाकरितां गणगोत सोडून पृथ्वीच्या पाठीवर ते वाटेल तिकडे जातात. असो. हिंदुस्थानांत अपूर्व स्वार्थत्याग, सात्त्विक प्रेम हे अत्यंत उत्तम असें दृष्टीस पडतें. राम वनवासाला गेल्यानंतर भरताला बंधुप्रेमामुळें राज्यग्रहण करवेना. कोणीकडे तें अलौकिक प्रेम व कोणीकडे इंग्रजांचें बेगडी, स्वार्थी प्रेम! पैसा, मानमरातब ही फक्त सुख समजल्या जाणाऱ्यांना अद्वितीय स्वार्थत्यागाची काय कल्पना?

## ११ डिसेंबर

आज समुद्र फारच संथ होता. पण तांबडा समुद्र लागल्यापासून उष्मा बराच वाटू लागला. त्यामुळे हिडण्या फिरण्याचा साहजिकच थोडा कंटाळा येई. हवेचा एकदम किती परिणाम होतो! इंग्लंडमध्यें वाटेल तेव्हां हिडावे; सारखे उभे असलो तरी थकवा वाटायचा नाही.

## १२ डिसेंबर

आज शनिवार, जहाजावर खेळाच्या Tournaments सुरू आहेत, आम्ही कोणीच भाग घेतला नाही. ह्या घटकेस आम्हाला एकच ध्यास लागला आहे व तो म्हणजे आपला देश कसा सुधारेल हाच. अर्थात् आतां हातून काम किती होईल हें पाहायचें. स्वतःची, नातलगांची, इष्ट-मित्राची सागून, पैसे देऊन जेवढी सुधारणा करता येईल, जेवढें मिनिट उपयोगाला लागेल तेवढें करणारच. ह्यापूर्वीही आम्ही कधीच वेळेचा दुरुपयोग केलेला नाही व ह्यापुढे तर नाहीचनाही करणार.

आज रात्री Father Elwin ह्यांचे The Aborigines of an Indian Village ह्या विषयावर व्याख्यान झाले. ४०-५० मंडळी आमच्या जेवणाच्या जागी जमली. व्याख्याते अगदी तरुण, सशक्त असे आहेत. त्यानी मध्यप्रांतांतील बस्तर संस्थानाजवळील गोंड लोकाची करुण कहाणी सांगितली. थोडक्यात म्हणजे विनाशेपटीची विद्याविरहित ती जनावरें आहेत, त्यांच्याकडे आम्ही गोरे सहृदयतेनें पाहातों, लोक रक्त-पितीनें, भुकेनें, तऱ्हतऱ्हेच्या रोगानें पछाडलेले आहेत, उंदीर खातात. नुसता डाळभात ज्या जागी मिळतो ती जागा स्वर्ग अशी त्याची कल्पना! अति-शय अज्ञानी लोक ते. मजा ही कीं आम्हाला ज्यांची कांही काळजी नाहीं, माहिती नाही अशा लोकांत जाऊन, त्याची भाषा शिकून, त्यांना जो मनुष्य आपलेंसे करून घेतो त्याचें कौतुक किती करावें? खरें म्हटले तर इग्रजांचा देश किती निरोगी, तेथें जीविताला कसला धोका नाही. अशा देशांतील तरुण मनुष्य परक्या रानटी देशांत रोगाच्या माहेरघरांत येतो, त्यांच्या चरित्राचें पुस्तक छापतो, व आम्हांलाच आमच्या लोकांची माहिती हवी असेल तर आम्हीं ह्याच पुस्तकांचा अभ्यास करायला विला-

यतेंत जायचें, ह्यापेक्षां आणखी लाजिरवाणी गोष्ट कोणती! साहेब येतो, जन्मचे जन्म ह्या कामात घालवितो, अर्थात तें केवळ परोपकार बुद्धीनें करतो असें नव्हेच नव्हे, पण एकंदर भगीरथ प्रयत्नांची कमाल आहे की नाही! व्याख्यात्यांचा एकेक शब्द माझ्या अंतःकरणांतील मृदु भावना थरारून सोडीत होता. गोरा श्रोतृसमाज गोंडाच्या रानटीपणाला वाक्यागणिक हसत होता. त्यांचें हसें माझा पारा चढवीत होतें. माझे रक्त उसळू लागलें व एकदा वाटले उठून जावें येथून. मिशनऱ्याची ही कीड आमच्या देशाला लागली आहे खरी! असो. व्याख्यानानंतर प्रश्नोत्तरें झाली. मीच पहिल्यांदा उठले.

"May I know what was the condition of those
"people before the British Rule?
"Were they happy, had they enough to eat? Were
"they literate?"

Yes, was the answer. And Now if my people are in this pitiable state, and if they eat rats and they are not educated, they are not to be blamed, but the Govern ment, which keeps them down?

I was touring in many countries for all these six or seven months and I have seen in every corner even in a fierce mountain or a jungle that people get compulsory education and enough to eat.

My country is unfortunate, where millions are starving now!

ह्यानंतर ह्यांनी पण प्रश्न विचारले. रा. एन्. एम्. जोशी यांनीं पण विचारले. नंतर पुष्कळ बोलाचाली झाली. व रात्री अकराला आम्हीं केबिनमध्यें गेलों.

पण हिंदुस्थानच्या भीषण परिस्थितीचें चित्र सर्व तऱ्हेनें डोळ्यांपुढें उभें राहिलें, व डोळ्यास डोळा म्हणून लागेना. खरें म्हटलें तर आपल्यापुढें कामाचा ढीग आहे असें असून आपल्याला जाणीव कशी होत

नाहीं ? आपण जिवंत माणसें आहोत कां प्रेते आहोंत; लोक स्वत:च्या देशाची उन्नति करून लोकांची कामे करायला लागले व आपण कां असे ? असो. अशा तळमळींत रात्र कशी तरी काढली.

## १३ डिसेंबर

आज सकाळी ५ ला एडन लागले. आम्हीं ७। ला गांवांत गेलों. पायीच हिंडलो. आमचें दुर्भिक्ष्य दिसू लागले. किती जमीनअस्मानचा फरक पाश्चिमात्य व पौर्वात्य देशांत ! न शिकलेले, वेडे, बावळे, गरीब, काळे असे आमचे लोक बिचारे कसे असहाय्य फिरतांना पाहून काळीज तुटलें, गरिबी वाईट एवढेंच खरें ! कोणीकडे पाश्चात्यांचे हुषार, संपन्न देश, व कुठें आमचा !

आज रात्री रा. ना. म. जोशी ह्यांचें "Life in the Indian Legislature Assembly" ह्या विषयावर Mr. Elwin ह्यांच्या अध्यक्षतेखाली मोठें सुंदर असें व्याख्यान झालें. श्रोतृसमाज पुष्कळच लोटला होता. इंग्लिश लोक पुष्कळ व आपले थोडे. तेव्हां सांगणें मोठे कठिणच; पण त्यांनीं फारच शिताफीनें सर्व सांगितले.

रा. जोशी किती गंभीर वृत्तीचे. कधीं कोणाला खोचून न बोलणारे; कांही विचारण्यास गेलें असतांना नीट सल्ला सांगणारे असे प्रति धर्मराज आहेत. त्यांना मी नेहमी पुष्कळ माहिती विचारी, व आपल्याप्रमाणें शांत डोकें ठेवण्याचा प्रयत्न मी करीन असें त्यांना मी म्हणे. समाजकार्य करतानां राग आवरला पाहिजे व हातानें खूप काम केलें पाहिजे, आणि हें तत्त्व त्यांच्या स्वत:वरूनच नीट मनावर ठसते. त्यांचें भाषण किती छान व गंभीर विचारांचें होतें. मनुष्य शांत, निंदा न करणारा व स्वार्थत्याग करून काम करणारा असा असला म्हणजे तो सर्वांचाच आवडता होतो.

## १४ डिसेंबर

आज Deck Games च्या Tournaments होत्या. चबीनें Deck Tennis मध्यें भाग घेतला होता. पहिल्या एकदोन सेटमध्यें ती चांगली खेळली; पण अखेरच्या डावांत ती हरली. तिला जरा वाईट वाटलें. मी

पुन: खेळणारच नाही आई, वगैरे म्हणाली. पण इंग्रजांचें उदाहरण तिला सांगून समजूत पटवली. चढेल तो पडेल हे तत्त्व तिला सांगितलें.

आज सकाळपासूनच दर्या खवळला होता. वादळ झालें होतें. तरी पण आम्ही आजारी पडलों नाही. सध्याकाळी जास्तच जोर वाढला. रात्री तर काही विचारायलाच नको. झोप येईना मुळी. समुद्र खवळला म्हणजे केबिनमध्यें निजणे कठिण असतें. असो. आज रात्री Mrs. How Martin ह्यांचें रा. ना. म. जोशी ह्याच्या अध्यक्षतेखाली 'Family Hygiene in India' ह्या विषयावर व्याख्यान झाले. जहाज हालत असल्यामुळें २५–३० च लोक जमले. कारण बरेच आजारी होते. व्याख्यात्यांनी हिंदुस्थानच्या वाढत्या लोकसंख्येचें व त्यामुळे होणाऱ्या बालांच्या व आयांच्या मृत्यूचें दारुण चित्र रेखाटले. बालविवाह, पडदा व व्यायाम न घेणे ह्या गोष्टीमुळेंच असा अनर्थ ओढवतो. आमच्या डोळ्यांत पाश्चात्यांच्या समक्ष अंजन तिनें घालायचें; केवढी वाईट गोष्ट ही! पण काय करणार? मी चूप बसलें, कारण मला तिच्याचकडून काम करून घ्यावयाचें होतें. असो. एक मुसलमान गृहस्थ उठले व म्हणाले कीं, 'हिंदु लोक धर्मवेडे आहेत, तेव्हां संततिनियमन त्यांच्यांत येऊं देतील काय? मीं उठून उत्तर दिलें हो. मी अगदी जुन्या मताच्या लोकांत ह्या गोष्टीचा पुष्कळ प्रचार केला आहे व ह्या गोष्टीस अगदीं जुन्या सास्वांची सुद्धां संमति आहे. आतां आम्हांला फक्त पुष्कळ Clinics हवी आहेत. लोकमत जागृत झालेलें आहे. हिंदुस्थानला संततिनियमन कृत्रिम उपायांनी म्हणा किंवा आत्मसंयमनानें म्हणा केलें पाहिजे ह्यांत मुळीच संदेह नाही.

## १५ डिसेंबर

आजही वादळ आहेच; पण एकदर बरें आहे. एडन सोडल्यापासून आम्ही अरबी समुद्रांत आहोंत. दुपारी मुलांच्या Poop Deck वर Children's Games झाले. Potato race, Potato and Spoon race वगैरे झाल्या. अगदीं लहान मुलांनाही खेळांत घेतलें होतें. त्याची फारच मजा वाटली. चबीनें पण भाग घेतला होता. नंतर पहिल्या नंबरांना बक्षिसें वाटलीं. त्यानंतर ५ वाजतां मुलांची पार्टी झाली. मुलांचा Deck, जेवणाची खोली

निशाणांनीं, रंगीबेरंगी कागदांनी व माळांनीं सुशोभित केली होती. Father Christmas केला होता त्यानें पोतेभर बक्षिसें वांटलीं. हे बघत असतांना मन विषण्ण झाले. म्हटलें राज्य असल्याशिवाय मजा नाहीं. बोट त्यांची, लोक त्यांचे, सण त्यांचा, मग मजेला काय तोटा आहे? असो. यूरोपला गेल्यापासून दर क्षणी हिंदुस्थानच्या भीषण परिस्थितीचें अतोनात दुःख होई. हिंदुस्थान चटकन् सुधारावा व म्हणून त्याच्याकरितां काय करूं न् काय नाही असें होई. कांही थोडे तरी हातून होवो एवढेच मागणें आहे. आज रात्री Fancy Dress Ball झाला. जेवणाच्या खोलीत फारच मजा आली. प्रत्येकाला कागदाच्या तऱ्हतऱ्हेच्या टोप्या, व वाजविण्याच्या नळचा आणि खेळणी दिली होती. आम्हा दोघाशिवाय सर्वांनी टोप्या घातल्या, सर्व जण त्या नळचा जोराजोरात वाजवीत होते, व एकच गल्ला सुरू केला होता. प्रत्येक जण आनदांत होता. नाचणारी माणसें गमती गमतीच्या पोषाखांतच जेवण्यास आली होती. नंतर नऊ वाजतां मुलांच्या Deck वर Orchestra सुरू झाला. सर्व माणसे आज तिकडे लोटली होती. आम्ही दोघी नाच पाहण्यास वरचेवर जात असू. पण आज हेही आले होते. इंग्रज तरुण तरुणीचे पोषाख अगदी मजेचे होते. एकीनें मारवाडीणबाईचा,तर एकीनें सुदर बुट्टयाचा बनारसी शालू नेसून बंगाली नववधूप्रमाणें पोषाख केला होता. तिच्याच जोडीला एक तरुण सुंदर धोतर व सद्रा घालून बंगाली झाला होता. किती जोडें संदर दिसलें तें! आमच्यांत असे सुरेख बधूवर थोडेच! एक मुलगी माझी जरीची हिरवी मंदिली साडी नेसली. ती पण किती सुरेख दिसली! एकेकीचीं सुंदर शरीरें व त्यांवर सुदर कपडे. मग शोभा काय विचारावी! कांहीं जणी मुसलमानी, टर्की अशा बेगमांप्रमाणें कपडे ल्याल्या. कांहीं म्हटलें तरी पौर्वात्य कपडे मोठे रमणीय दिसतात. त्यांत स्त्रीचा नैसर्गिक सुंदरपणा दिसतो. "They look graceful." असें इंग्रजच म्हणत. एक पुरुष गलेलठ्ठ बैरागी, तर दुसरा अरब, तर एक खलिफा झाला होता. म्हटलें ह्या तऱ्हतऱ्हेच्या पोषाख असणाऱ्या देशावर इंग्रजांचें स्वामित्व आहे ना? सर्व देश यांचे, ह्यांचा जिकडे तिकडे वरचष्मा. त्यांचें उत्तम शरीर, रंग, रूप त्यांना आज काय कमी आहे. तेव्हां नाच वगैरे विलासाचे प्रकार हे त्यांनाच शोभायचे. आम्हांला काय त्याचें. आमचा आनंद दुःखमिश्रित.

इंग्रजांचा खरा. त्यांच्याजवळ आज साम्राज्यपद आहे. असो. असा किती तरी वेळ हा मनोहर नाच झाला. ज्या मुली पुष्कळ वर्षे हिंदुस्थानांत राहिलेल्या आईबापांच्या त्यांना अस्सल इंग्रज कशाला विचारतात? आमचे काळे नाचायला उत्सुक असतातच. त्यानी ह्या हताश कुमारिकांना हात दिला, व नाच करून परस्त्रीच्या अंगाचा सुखद स्पर्श करून घेतला, व आपली हौस पुरविली. कारण हिंदुस्थानात असे चाळे नोकरी नसतांना थोडेच करायला मिळणार!

नंतर अल्पोपाहार झाला. खूपच मजा वाटली. आम्ही खूप केक्स् व आइस्क्रीम खाल्लें. चबीला फारच गंमत वाटली. ज्यांचा पोषाख नावीन्य पूर्ण वाटला अशाना बक्षिसें वांटलीं.

इंग्लिश लोक स्त्रियाच्या सुखद स्पर्शात व वाद्याच्या लहरीत रमले होते. होय, त्यांतही एक मुसलमान जोडपें होते. घरी पडदा. तेव्हा इंग्लड-सारख्या स्वतंत्र देशांत दोघांनाही मोकळें मैदान वाटत होते. त्यांच्या पत्नी युरोपियन पोषाख करीत. भाषा इंग्लिश अगदी. दोघेही धूम्रपान करीत. आज ते अनेक स्त्रियांशी व पत्नी अन्य पुरुषांशी नाचल्या. इंग्लंडला जाऊन एवढेंच का शिकण्यासारखे होतें? आणखी एक आपले जोडपे आपापसांतच नाचलें. ही बाई विलायतेत असतांना आठवड्यातून दोनदां Dance Lessons घ्यायला जाई. हिंदुस्थानांत तेवढ्याकरिता Radio Club किंवा ताज-महाल हॉटेलमध्यें जात जाऊ असें त्या म्हणत. ह्या बाई पण धूम्रपान करीत असत. ह्याच गोष्टी इंग्लंडमध्यें शिकण्यासारख्या आहेत काय? शेवटीं Folk Dance झाला, फारच मजा वाटली. कसे चुटचुटीत सर्व. एकेकांची बांधेसूद अंगें बघत बसावीत अगदी. ११॥ ला निजण्यास गेलों.

## १६ डिसेंबर

आजही बोट हालतच आहे. इतके दिवसांच्या वादळामुळें बोट गुरुवारीं १७ तारखेस न पोहोंचतां शुक्रवारीं पहांटे ४ ला पोहोंचणार असें समजलें. पुष्कळांना वाईट वाटलें. हिंदुस्थानचा वीट वाटणारे कांही विद्यार्थी म्हणाले, आम्हांला आठ दिवस लांबले तरी आवडेल. देश-प्रेमाचा उत्कृष्ट नमुना आहे! साहजिक आहे, पुष्कळ वर्षे यूरोपमध्यें काढलीं, तेव्हां आतां

आपला सतरा घोटाळयांचा देश कसा आवडणार त्यांना? शिवाय आमच्या देशात सतरा तऱ्हेची बंदी!

रात्री Mr. Ceresole (स्विस गृहस्थ) ह्यांचे डॉ. मुकर्जी ह्यांच्या अध्यक्षतेखाली 'Peace in Bihar' ह्या विषयावर व्याख्यान झालें. पाश्चात्यांना स्वत.चे राजासारखें आहे. तेव्हां पौर्वात्यांनी भुके कंगाल राहून शांतता प्रस्थापित करावी. काय न्याय आहे पण! ते कधीं तरी शक्य होईल का? पोटांत भुकेनें कल्लोळ झाल्यावर मूल रडून आईला हैराण करणार नाही काय? मला कांही व्याख्यान पटलें नाही. 'गुळाचाच गणपति आणि गुळाचाच नैवेद्य.' आणि आम्ही गाढव. हें सर्व ऐकल्यावर हे बोलायला उठले. बिहारच्या धरणीकंपाची करुण कहाणी सांगितली. कारण आम्ही धरणीकंपाचे वेळी बिहारमध्येंच होतो. त्या वेळचें इंग्रजांचें काम फारच उत्तम झाले. स्वतःकडे न बघतां त्यानी आमच्याकरिता अतोनात कष्ट केले. त्याबद्दल ते स्तुतीस योग्य आहेत. पण आम्ही असे कां? ह्याचे कारण आम्ही लोकाच्या बोडल्यांनी दूध पितों. आमच्या पायावर आम्हाला जोंपर्यंत उभे राहूं देत नाहींत तोंपर्यंत आम्ही असेच शेळचा-मेंढचा राहणार. नंतर Mr. Elwin, Mr. Ceresole, Mrs. How Martin ह्यानी स्वतःच्या पैशाने आमची कामगिरी चालविली त्याबद्दल कांही वक्त्यानी त्यांचें मनःपूर्वक अभिनदन केलें.

## १७ डिसेंबर

आज सर्व दिवसभर तऱ्हेतऱ्हेच्या विचारांनीं मन अस्वस्थ होतें. दिवसा बांधाबांध केली. मग दुपारभर कोणाला आपला पत्ता दे, कोणाचे घे, असें चालले होतें. आतां मायदेशाचा किनारा दिसायला केवळ कांहीं तासांचाच अवकाश होता. कदाचित् आपली कांही माणसें येतील, मग किती आनंद होईल वगैरे विचार मनाला आनंदवीत होते. तरी पण एक वेळ असें वाटे की, गरीब हीन स्थितीतील माणसानें संपन्न ऐश्वर्याच्या शिखरावर असलेल्या देशांत जाणें म्हणजे मन जास्ती दुःखी करण्यासारखें आहे. घटकाभर लोकांकडले ऐषाराम, मजा वगैरे करून मन लालचावतें. मग आपल्याकडील सामाजिक गोधळ, रूढि व सतरा भानगडी जास्तच भीषण वाटूं लागतात;

व अशा विचारानें दोन्ही खंडांतील फरक जास्तच जाणवूं लागतो, व मनाची शांतता अगदी ढासळून जाण्याच्या बेतांत आली असें वाटूं लागतें. असो. आज रात्री तर सुख-दुःखमिश्र विचारानें मुळींच डोळयास डोळा लागेना. सारखें उठून पोर्ट होलमधून आपल्या देशाची कांही चिन्हें दिसतात कां म्हणून पाहावें. रात्र अशीच गेली. पहांटेच्या मंजुळ व थंड वाऱ्यानें श्रांत जिवाला जरा आराम पडून डोळा लागला व सकाळींच आपलें जहाज मुबईच्या–माझ्या देशाच्या–किनाऱ्याला थडकलेलें दिसले. जिकडे तिकडे 'माझें, आपलें' आहे हें सर्व. असा आत्मीय भाव वाटू लागला. फारा दिवसांनी सासरहून माहेरीं गेल्यावर कसे सर्व पूर्वसंवयीचें दिसतें व मोकळेपणा वाटतो, तद्वतच मायदेशाचें वाटले. आणखी त्यांत आपली आई गतधवा असली, अडचणीत असली, आजारी असली तर तिचें किती किती प्रेम वाटतें. तसेंच माझें माझ्या देशावरचे प्रेम किती तरी वाढले.

असो. नतर कपडे वगैरे करून पहाटेच मी खाली उतरलें व कोणी आलें कां म्हणून पाहायला गेलें. बरीचशी नातलग मंडळी आम्हांला भेटायला आली होती. सर्वांना प्रेमभरानें पाहून, बोलणें चालणें चाललेच होतें. सगळी जागा उतारूनी व त्यांना भेटायला आलेल्या माणसांनी फुलून गेली होती.

पुष्कळ वर्षांनी मुलगा शिकून आला होता. त्यावर प्रेमळ हिंदुस्थानी मातृहृदयाचा अश्रूंचा वर्षाव होत होता. कोठें परक्या गांवीं हालअपेष्टांत मुलगा पडला होता असें वाटून जीव व्याकुळ होत होता बिचारीचा. मुलगा नीट परत यावा म्हणून किती उपवास, नवस-सायास तिनें केले असतील!

भोळ्या विचाराचें मन! तेथें मुलें किती तरी आनंदांत असतात, ह्याची तिला काय कल्पना. ती मात्र घरी मुलाच्या आवडीचा पदार्थ केला कीं, मुलाच्या आठवणीवाचून तिला घास गिळवत नसेल.

पुष्कळशा हिंदुस्थानी स्त्रिया पतींना स्वागतार्थ भेटण्यास उत्सुक झाल्या होत्या. हिंदुस्थानी स्त्रीचें प्रेम डोळयांत, चेहऱ्यावर दिसतें. किती विनयशील, किती गर्भित अर्थ असतो त्यांत. मनाची साक्ष मनच देतें. तोंडानें Darling, Dear चा वर्षाव करण्याचीच जरूर आहे का त्याला! फारा दिवसांनीं भेटल्यानंतर मूकप्रेमांतच सर्व आहे. प्रेम करण्याची प्रत्येक देशाची पद्धत निराळी असते. तें बोलूनच दाखवायला हवें असें थोडेंच आहे.

असो. आम्हांला मात्र यूरोपनें 'आपल्या देशावर अत्यंत प्रेम करा स्वदेशी वापरा' असा धडा शिकविला.

आम्ही असेच निर्माल्य होऊन पायदळी तुडविले जाणार का ?

'नाहीं' 'नाही' म्हणून माझें मन आंतून सांगत होतें.

## १८ डिसेंबर १९३६ : मुंबई बॅलर्ड पिअर

बॅलर्ड पिअरवर बोट धडकल्याबरोबर प्रथम आपल्या मंडळीना भेटून नंतर Breakfast साठीं पुनः बोटीवर परत आलों. आपल्या एकाद्या मित्राला किंवा नातलगाला देखील आज बोटीवर Breakfast मिळण्याची सोय होती. बोटीवरील सामान खालीं उतरविणें, नंतर Customs Duty वगैरे भानगडी. ह्या सर्व गोष्टीना खूपच वेळ लागणार होता.

Breakfastच्या वेळेस Press Reportersची Mr. N. M. Joshi, Mrs. How Martin वगैरेंभोंवती गर्दी झाली. माझ्याही मुलाखतीस कांही जण आले. Times of India च्या Reporter नें माझी मुलाखत घेतली व तारीख १९ डिसेबर १९३६ च्या Times मध्यें खालील मजकूर प्रसिद्ध झाला :—

"Mrs. Sarojini Deshpande who attended the International Council of Women's Conference held in October last at Dubrovnik, Yougoslavia, returned to India by the mail steamer. She toured Europe visiting France, Italy and Switzerland, delivered lectures in London and Paris, dealing with the progress of Indian women in the social and political spheres. She said, she was greatly impressed with the progress of women in European countries. She intends to devote herself to the cause of women in India. She is keenly interested in the problem of pure milk supply which is so essential for the well-being of children."

ह्यांना, सांगली संस्थानाधिपतींनी, विजेच्या कांहीं कामासंबंधीं सागलीस येण्यास आमंत्रण यूरोपमध्यें असतांनाच दिलेलें होतें. त्यांची अधिकारी मंडळी पण आम्हांस सांगलीस नेण्याकरितां धक्क्यावर हजर होतीच. त्यांना ताबडतोब येतो असे आश्वासन देऊन त्यांची रवानगी केली.

ह्या निमित्तानें एकदोन दिवसांनीच आम्ही सांगलीस गेलों. ह्यांनीं आपलें काम व मी माझीं सामाजिक कामे तेथें केलीं.

एक दिवस श्रीमंत राणीसाहेबांच्या अध्यक्षतेखालीं स्त्रीसमुदायापुढें 'यूरोपपासून आपण काय शिकावे?' ह्या विषयावर माझें व्याख्यान झालें.

नंतर पुढेंही नाशिक, कलकत्ता वगैरे गांवी पण मीं ह्याच विषयावर स्त्री-पुरुषांच्या सभेंत व्याख्यानें दिली.

---

# यूरोपच्या अंतरंगांत

भाग दुसरा

विलायतेंत असतांना 'केसरीं'त
प्रसिद्ध झालेले माझे लेख

# माझ्या प्रवासांतील अनुभव

## आगबोटींतील दृश्य पाहून सुचलेले विचार

### कैसर-ई-हिंद-बोट, ता. २८-५-१९३६

अलीकडे यूरोपमध्ये शिक्षणाकरिता, सुट्टीनिमित्त, किंवा धंद्याकरिता जाण्याची एक साथच पसरली आहे. तेव्हा बोटीवरील माहिती अनेकांनी अनेक वृत्तपत्रें, मासिके ह्यातून दिलेली आहे, ती नव्याने आणखी काय मिळणार ? तथापि व्यक्तिगत निरनिराळे विचार असतात. म्हणून वाचकापुढें मी आपले बोटीवरील विचार मांडीत आहे.

बोटीवर आम्ही पुष्कळच काळे आदमी आहोत. पंजाबी, महाराष्ट्रीय बंगाली, मुसलमान, सिंधी वगैरे जातीच्या लोकांचा बराच भरणा आहे. हल्लीं लाहोरच्या मिसेस दत्त या अमेरिकन मिशनरी बाईंनी, आपल्या हिंदी बायका व विशेषतः विद्यार्थिनी यांना यूरोपमधील सुप्रसिद्ध गावें दाखवून आणण्याची एक ३ महिन्यांची सफर गेल्या ३ वर्षांपासून सुरू केलेली आहे. यंदा ह्यांत १८-२० मुली आहेत. दर मुलीमागें १८५० रुपये खर्च येतो. त्यांत सर्व नियोजित जागीं राहाणें, खाणे, गाडी, मोटारी वगैरे गोष्टींचा समावेश होतो.

पुष्कळसे उच्च शिक्षणाकरिता जाणारे व आमच्यासारखे सुट्टीनिमित्त सहकुटुंब सहपरिवार जाणारे लोकहि बोटींत आहेत. त्यामुळें परकेपणा कसा तो मुळीच वाटत नाही. शिवाय शागीर्दामध्ये मुंबईचे गोयानीज, इतर नाविक नोकर, रत्नागिरीचे कोंकणे हे असल्यामुळे आम्ही मुंबईंतच आहोंत असा भास होतो. खलाशी लोक येऊन मराठीत आपलेपणानें आमची विचारपूस करतात. त्यामुळे देश सोडून दूर जाऊं लागलों अशी हुरहूर वाटत नाही.

आम्हांपैकी पुष्कळांना एडनपर्यंत बोट लागली व पैसे खर्च करून कोठें धोक्यांत पडलों असें वाटू लागले. 'ही माझी शेवटचीच खेप' 'यापेक्षां आपण आपले आलों तसे परत जाऊं' असे उद्‌गार पुष्कळांनी काढले. आम्ही आजाऱ्यासारखे तळमळत पडून राहिलों. आमचे राज्यकर्ते कशा

एवढ्या खेपा करतात असे वाटूं लागलें. कोणत्याही परिस्थितींत आनंदानें राहावयाचे ही त्यांची वृत्तीच. बोट लागायला लागली तर डेकवर खुर्चीवर पडून राहिले म्हणजे बरें वाटते. केबिन अत्यंत गरम व लहान असल्यामुळें जीव गुदमरतो म्हणून तेथे कामाशिवाय जाऊंच नये मुळी. आजारी असतांना आपल्याला सर्व कांही डेकवर मिळते ! तेव्हां कांहीच त्रास पडत नाहीं. रात्रीं तेथें निजू पण देतात. पहांटे ५ वाजतां उठून केबिनमध्यें जावें लागतें, कारण त्या वेळी डेक धुवायचा असतो.

येथे कोणत्याही तऱ्हेचा मज्जाव व त्रास नाही. वाटेल ते कपडे आपण घालावेत. स्वतः धुण्याची सोय आहे. अन्नही मागू त्याप्रमाणें शक्य तितके मिळते. कोठवळे आमच्या सुखसोयीकरितां अत्यंत खबरदारी घेतात. नोकर-चाकर अत्यंत आदबीनें वागतात. घर सोडलें म्हणून एकादी गोष्ट कमी पडली असे तर वाटत नाहीच, पण घरच्यापेक्षां दसपट जास्त सुखसोयी आहेत. खावयाला तर किती नानाविध पदार्थ मिळतात. तऱ्हेतऱ्हेची फळे, सर्व प्रकारच्या भाज्या, थंड पेये एक ना दोन, सर्व राजशाही थाट दिसतो.

बोटीवर एवढी माणसे, पण आंघोळीला मोरीची किंवा संडासाची, कधीच अडचण पडत नाही! कीं कधी थांबावे लागत नाही. स्वच्छता तर किती अवर्णनीय. दर माणसागणिक आंघोळीचें टब धुऊन नवे पाणी घालन जमीन स्वच्छ पुसून तयार असते. नोकर सारखी झाडपूस, पॉलिश करीत असतात. कुठेही घाण दिसायची नाही. शिवाय सर्व काम चुपचाप चालतें. नोकरांना हांका मारणे, ओरडणें कधीच ऐकलें नाही. मजसारख्या घर चालविणाऱ्या बायकांना खरोखर येथे किती तरी शिकण्यासारखे आहे. मला वाटते येथील लोकांच्या हाताखाली राहून घर कसें उत्तम ठेवायचें, नोकरांकडन सुव्यवस्थित काम कसें करवून घ्यायचें, घरांत पाहुणे जास्ती आले तरीही टापटीप कशी नेहमीसारखीच राहूं द्यायची वगैरे गोष्टी शिकण्यास मिळतील तर किती छान होईल ! प्रत्येक जण कसा धांवत पळत शिस्तीनें काम करतो ह्याचें कौतुक वाटतें.

आणखी एक गोष्ट येथे प्रामुख्याने दृष्टोत्पत्तीस येते ती, ही की, आमच्या राज्यकर्त्यांच्या अंगांतील जोम व तरतरी. म्हातारे, तरणे, स्त्रिया, मुलें सकाळी एका तऱ्हेचे कपडे तर दुपारीं दुसरे तर रात्री तिसरेच. इतके वेळां

कपडे बदलण्याचा त्याना कंटाळा नाहीच. शिवाय सारखे आपले खेळत असतात. आळसाने पडून राहणे, वाकडे तोंड करून घरची आठवण होते म्हणून रडगाणे गात बसणे हे जसे त्याच्या गावीही नाही. सगळे कसे हंसतमुख, टवटवीत, खेळाडू वृत्तीचे दिसतात. स्त्रियाची तर कपडे घालण्यात व सौंदर्य दाखविण्यात जणू काय चढाओढच लागलेली दिसते. खूप पैसा मिळवावयाचा व त्याचा उपभोग घ्यावयाचा हेच प्रत्येकाचें ब्रीद असे त्यांच्या वागण्यावरून दिसते. एवढे त्याजकडून होते कसे हेच एक कोडे वाटते. अर्थात् ते चांगले की वाईट ह्याचा माझ्यापुढे मोठा प्रश्न पडला आहे. आधिभौतिक सुखाकरिता मनुष्य झटू लागला तर तो सुखी; की जग हे नश्वर आहे, संसार, कनक व काता ह्यापासून अलिप्त राहावे, साधेपणाने वागावे असे हे पारमार्थिक वागणें चांगले, ह्याचे माझ्या मनात द्वद्व चालले आहे ते काहींही असले तरी मनुष्याने पैसा मिळविण्याची अतोनात खटपट केली पाहिजे, ऐहिक उपभोगही घेतले पाहिजेत, व परोपकारही केला पाहिजे, म्हणजे स्वार्थ व परमार्थ दोन्ही साधले जातील.

बोटीवरील आम्हां पुष्कळशा हिदुस्थानी लोकांची वृत्ति एकलकोंडेपणाची दिसते. आरामखुर्चीवर बसून हातात एकादी बर्ट्रांड रसेल नाही तर एच. जी. वेल्सची कादंबरी घेऊन सकाळपासून संध्याकाळपर्यत बसणाऱ्यांची संख्याच जास्त दिसते येथें आपले विद्यार्थी २५-३० तरी आहेत. पण आगबोटीची व इतर नवीन उपयुक्त माहिती खलाशांकडून किंवा आगबोटीवरील अधिकाऱ्याकडून मिळविण्याची जिज्ञासा फारच थोड्यांत. डिग्री कशी मिळेल, परत आल्यावर मान, नोकरी व सहजासहजी पैसा कसा मिळेल, या चितेंत ते चूर असतात. शिवाय प्रामुख्याने, नट्टापट्टा करून गोऱ्यांचे धूम्रपान, मदिरापान, मुली आणि स्त्रिया ह्याच्या पुढे पुढें करणे, याचा श्रीगणेशा बोटीवरच घेण्याचा तरुणाचा उपक्रम पाहून मन अत्यंत उद्विग्न होते. कित्येकाशी संभाषण केल्यावरून रसेलच्या नवनीतीचे हे पुरस्कर्ते आहेत हे पाहून देश कोणत्या थराला जाणार आहे ह्याची काळजी वाटते. पुराणकालांतील सर्व मोहांपासून अलिप्त राहणारे विद्यार्थी कोणीकडे व आजचे विषयलोलुप विद्यार्थी कोणीकडे, ह्या गोष्टीचा समाजकार्यकर्त्यांनीं विचार केला पाहिजे.

आमच्या बोटीवरच्या हिदुस्थानी मुली बी. ए., एम. ए. पर्यंत शिकलेल्या आहेत. पण त्यांचा वेळ नट्टापट्टा करण्यात जातो. खेळ, एकमेकांत मिसळणे वगैरे कमी. येथे एक गोष्ट सागावीशी वाटते, ती ही की, पाश्चात्याचे सौदर्य दाखविण्याचे उपक्रम आमच्यात सर्रास रूढ झाले आहेत. ते तर दूर करणे कठिणच, तरी पण ह्या गोष्टी जितक्या लवकर आम्ही घेतो तितक्याच त्याच्या चागल्या का घेत नाही ह्याचे मोठे सखेदाश्चर्य वाटते.

आमच्या ह्या दूरवर निघालेल्या कुमारिकाना पाहून ज्याचे चार पावसाळे जास्त गेले आहेत अशानी आमच्या सारखेच आश्चर्य प्रकट केले, व ह्या शोभेच्या बाहुल्या हिदुस्थानातील क्षणोक्षणी जास्त दारिद्रचात रुतणाऱ्या तरुणाच्या पत्नीपदास कशा योग्य होणार याची त्याना धास्ती वाटू लागली सुधारणाचे चक्र सुरू झाले आहे खरे; ते पुरे झाल्याशिवाय थोडेच थाबणार आहे!

आपला देश, लोक, चाली, धर्म, वाईट असल्या विचारांचे तरुण पाहून मनाला उद्विग्नता आली, व काय केले असता ही परिस्थिति बदलेल हाच विचार सारखा मनात घोळू लागला.

  

# पॅरिस येथील स्त्रियांची सभा

## लंडन, ता. २३-७-१९३६

पाश्चात्यांच्या देशांत प्रत्येक ठिकाणी, म्हणजे हॉटेलें, रेस्टॉरंट्स् फोटो काढण्याच्या जागा, लिफ्ट चालविण्याच्या जागा, मोठी दुकानें, दवाखाने अशांतून स्त्रियाचा भरणा अतिशय दिसतो. स्त्रियाचें प्रत्येक क्षेत्रांतील हें आक्रमण येथें प्रत्यक्ष येऊन पाहिल्याशिवाय कळावयाचें नाही.

जिकडे पाहावें तिकडे बायकाच बायका दिसतात. अर्थात् त्यांच्या परिषदा म्हणजे त्यांत तऱ्हेतऱ्हेच्या धंद्यांतील प्रमुख स्त्रिया असावयाच्या. आपल्याकडील बायकांना त्यांच्या परिषदेची माहिती मनोरंजक वाटेल म्हणून देत आहें.

धंदेवाईक स्त्रियांची परिषद पॅरिस येथें ता. २६ जुलै ते १ ऑगस्ट १९३६ पर्यंत भरणार आहे. तिची तयारी अत्यंत जोरानें होत आहे. व्याख्यात्यांमध्ये इंग्लिश बायकाही पुष्कळ आहेत. कुमारी लिलिअन बले ह्या 'ओल्डव्हिक अ‍ॅण्ड सॅडलर्स वेल्स' ह्या कंपनीच्या मॅनेजर आहेत. कुमारी कॅरोलीन हॅजलेट ह्या इलेक्ट्रिकल इंजीनिअर आहेत. कुमारी लीना फिलिप्स ह्या न्यू यॉर्क येथील वकील आहेत. अध्यक्षपद त्यांनीच स्वीकारलें आहे. परिषदेचा मुख्य हेतु स्त्रियांची आधुनिक कालांतील जगांतील कामगिरी हा आहे. फरान्सच्या मत्रिमंडळांतील दोघी स्त्रिया सभेस हजर राहाणार आहेत. एक शिक्षणखात्याच्या अंडरसेक्रेटरी आहेत, आणि दुसऱ्या मजूरपक्षाच्या अमेरिकेंतील सेक्रेटरी आहेत. सर्व सभासदांची व्यवस्था करण्याचें काम कुमारी मॅडलीन टिसो ह्या बाईकडे आहे. त्या धंदेवाईक स्त्रियांच्या क्लबाच्या अध्यक्ष आहेत. व्याख्यात्यामध्ये बँकेच्या चालक, डॉक्टरणी, वकिलिणी, मुत्सद्दी, व्यापारतज्ज्ञ, नॉर्वेमधील पार्लमेंटच्या एक सभासद, झेकोस्लोव्हाकियाच्या एक सेनेटर, पोलंडमधील बँकेच्या एक चालक व इटलीमधील नॅशनल विमा कंपनीच्या आंकडेशास्त्रज्ञ अशा स्त्रिया आहेत.

मध्यंतरी लंडन येथील Institution of Electrical Engineers मध्ये Overseas Visitors करितां संमेलन भरले होतें. मी तेथें गेलें होतें. त्या वेळेस अध्यक्षांनी येथें विजेची प्रगति किती झपाट्यानें झाली ह्याचे वर्णन केलें व त्याचें सर्व श्रेय बायकांना दिलें. दुकानामधला माल खपविणाऱ्या बायका, विजेच्या यंत्राची प्रत्येक घरामध्यें किती आवश्यकता आहे हें उत्तम तऱ्हेनें समजावन सांगत. त्यांची ती गोड बोलून सांगण्याची पद्धत, तीं हंसरीं तोंडें, मालाचा खरेपणा व उपयुक्तता ह्या सर्व गुणांमुळें वीज आपल्या शीघ्र गतीनें सर्व घरांत सर्वत्र शिरली.

स्त्रियांची ही कामगिरी व वरील परिषदेच्या व्याख्यात्यांच्या डिग्ऱ्या व हुद्दे बघून मति गुग होऊन जाते. इंग्रजांनी निसर्गावरती जय मिळविला, त्याचप्रमाणें त्यांच्या बायकांनीही पुरुषांवर जय मिळविला आहे. अर्थात् तो चांगला कीं वाईट हा मोठा वादग्रस्त प्रश्न आहे. ईश्वराचा हेतु, स्त्रियांना जन्माला घालण्यांत निराळा दिसतो. निसर्गाविरुद्ध ही स्त्रियांची कामगिरी होत आहे असें दिसतें. पुरुषांच्या बेकारीला कारण, थोड्या अंशीं कां

होईना पण ह्या स्त्रियाच होत आहेत. बायकाना आर्थिक स्वातंत्र्य दिल्यानें गृहस्वास्थ्य बिघडेल ह्यांत तिळमात्र शंका नाही. कदाचित् माझे हे विचार माझ्या पुष्कळ भगिनीस पटणार नाहीत

हिंदुस्थानांतल्या सुशिक्षित कुमारिकाच्या वाढत्या सख्येकडे पाहतां हिंदुस्थानही अशा परिषदा लवकरच घडवून आणील असे वाटते.

  

# लंडन येथील सर्व-धर्म-परिषद

## लंडन, ता. २१ ऑगस्ट १९३६

लंडन येथे क्वीन्स हॉलमध्यें जागतिक सर्व धर्म परिषदेच्या अधिवेशनास ता. ६–७–१९३६ ला सुरुवात झाली. परिषदेचे काम १८ तारखेपर्यंत चाललें होतें. तिचे मुख्य हेतु खालीलप्रमाणे आहेत.

१. विश्वबंधुत्वाला चालना देणे.

२. कोणताही एक विशिष्ट धर्म चांगला असा वाद करावयाचा नाही, किंवा जगभर एकच धर्म प्रस्थापित करावा असा पण हेतु नाही. तरी पण प्रत्येकाला विश्वबंधुत्वांत स्वतःच्या धर्माबद्दल पूर्ण मुभा असावी.

३. ज्यामुळें राष्ट्रें युद्धे करण्यास प्रवृत्त न होतील व निराळे धर्म असूनही जगांत एकी होईल असाच ह्या सभेंत खल व्हावा.

ह्या अधिवेशनास जगांतील सर्व भागांतील विद्वान, धर्मशास्त्रज्ञ, तत्त्ववेत्ते, असे प्रसिद्ध स्त्री-पुरुष जमले होते. ख्रिश्चन, ज्यू, हिंदु, मसलमान, जपानी वगैरे लोकांचा भरणा सभासदांमध्यें होता. हिंदुस्थानतर्फें बडोद्याचे नरेंद्र सयाजीराव गायकवाड अध्यक्ष आणि सर सर्वपल्ली राधाकृष्णन, प्रो. महेंद्रनाथ सरकार, सर अबदुल कादिर, आगाखान वगैरे सुप्रसिद्ध मंडळी सभासद होती. खालील विषयावर चर्चा झाली.

सर्वश्रेष्ठ पारमार्थिक ध्येय, धर्माचा मुख्य पाया, हिंदुधर्माचा दृष्टिकोन, मुसलमानी धर्म व विश्वबंधुत्व, प्रार्थना व आध्यात्मिक अनुभव.

तारीख ६ जुलैला रात्री ८ वाजतां बडोद्याच्या नरेंद्राच्या अध्यक्षते-खाली 'सर्वश्रेष्ठ पारमार्थिक ध्येय' ह्या विषयावर तिघांचें व्याख्यान झालें. ख्रिस्ती दृष्टिकोन—रेव्हरंड कॅनन् बॅरी, यहुदी दृष्टिकोन—रब्बी डॉक्टर इस्राएल माटक, व हिंदु दृष्टिकोन—सर राधाकृष्णन् यांनी मांडला.

क्वीन्स् हॉलमध्ये दोनचार हजार लोक बसण्याची सोय आहे. व्यास-पीठावर राजे गायकवाड, सर राधाकृष्णन् व पाश्चात्य धर्मवीर बसले होते. त्यांच्या मागे जागोजागचे सभासद होते ऑर्गनच्या मधुर लहरींनी सर्व वातावरण कसे गंभीर वाटत होते.

श्रोत्यांमध्ये आजीबाईचाच भरणा जास्त दिसला. येथील तरुण पिढी धर्माच्या भानगडीतच नाही मुळी. ती रंगली आहे फॅशन मेकअपमध्ये व रसेलच्या नवनीतीची दीक्षा घेण्यात. त्याना थोडेच धर्ममार्तंडांचें पुराण आवडणार आहे? तरुण पिढीपुढे धर्माचे कांही तरी द्योतक दिसतें आहे काय? आमच्या हिंदुस्थानात कोठें मारुतीचे देऊळ दिसले तरी हात जोडण्याची सहज प्रवृत्ति होते. पण येथे सर्व बाजूंनी फॅशनची दुकाने, नटनटीचे बीभत्स फोटो असेंच दिसतें. त्यामुळे इंग्रज बाळांना धार्मिक शिक्षणाचा गंध तरी आहे किंवा नाही असा माझ्यासारख्या धर्मवेडीला मोठा प्रश्न पडतो.

## श्रोत्यांची खूप गर्दी

सर राधाकृष्णन्सारखा कसलेला पंडित बोलणारा असल्यामुळें हिंदुस्थानी स्त्री-पुरुषाची खूप गर्दी लोटली होती. आमचे विद्यार्थी आज संध्याकाळच्या—सिनेमा इत्यादिकाच्या मजेला फांटा देऊन इकडेच वळले होते, तें पाहून सात्त्विक अभिमान वाटला. सभा रात्री आठला म्हणजे बरोबर आठाला सुरू झाली. व्याख्याते व श्रोते अगदी तयार होते. खरें पाहिलें असतां प्रत्येकाला कामावरून घरीं जाण्यास ६—६॥ तरी होतात व यानंतर रात्रींचें जेवण उरकून बरोबर आठला व्याख्यानास जावें लागलें. रात्रीं घरीं गेल्यावर दहा अकराला कोणी जेवूं घालील अशी आशाच नको. असें असतांना सुद्धां यंत्राप्रमाणें वेळेवर काम सुरू झालें.

सकाळपासून सभेच्या बैठका चालू असल्यामुळे, या वेळी बडोद्याच्या

अधिपतींनीं अध्यक्षस्थान स्वीकारले नाही. ते नुसतेच बसून होते. तेव्हां त्यांच्या जागी लॉर्ड स्नेल हे विराजित झाले.

अध्यक्षांनी नरेशांची उत्तम राजे म्हणून स्तुति केली. राज्याचे उत्तम पालन करणारा, स्त्रीदाक्षिण्य दाखविणारा, शिवाय विद्वान् लेखक व सामाजिक कार्य करणारा अशी त्यांची स्नेल यांजकडून स्तुति ऐकल्यामुळे मनाला समाधान वाटले. त्यानंतर अध्यक्षांनी सर्वांना एक मिनिटभर ईश्वराचें ध्यान करण्याकरिता अगदी स्तब्ध उभें राहण्यास सांगितलें. त्याबरोबर सर्व जण सैनिक धर्तीप्रमाणे अगदी गुपचुप उभे राहिले. त्यांच्या शिस्तीचे कौतुक वाटले.

नंतर ऑर्गनच्या सुरावर सगीत प्रार्थना झाल्यावर रेव्हरंड बॅरी ह्यांच्या व्याख्यानास सुरुवात झाली. त्याचा आवाज अगदीच रेंगाळत बोलल्यासारखा होता, व सांगण्याची पद्धत कटाळवाणी त्यामुळे श्रोत्यांना जांभया येऊं लागल्या.

## अनेक धर्म कां पाहिजेत?

त्यानंतर रेव्हरंड माटुक हे आपली यहुदी बाजू मांडण्यास उठले. गवई जसा एकेक तान घेऊन श्रोत्यांना आळवीत असतो तसा ह्यांनीं एकेक मुद्दा सांगून श्रोतृवृंदास डोलविलें. व्याख्यात्याच्या अंगांत असणारे सर्व गुण त्यांच्यांत होते. मधून ते हसवीत तर मधून अगदी गंभीर करून सोडीत. ते म्हणाले, 'बागेंत जर एकाच रगाची फुले असली तर रंगवैचित्र्य नसल्यामुळे शोभा दिसणार नाही. सृष्टीमध्यें परमेश्वरानेंच जर विविधता उत्पन्न केली तर तोच नियम धर्माला का लागू नाही? निरनिराळे धर्म अवश्य हवेतच. डार्विननें माणसाची उत्पत्ति माकडापासून झाली असा सिद्धांत केला, तरी पण कोणाचा पूर्वज सुदर व श्रेष्ठ हें सांगणें कठिण, तद्वतच धर्म कोणाचा चांगला हेंही ठरविणे कठिण.

आतां राहिलें हिंदुधर्माचें तत्त्वज्ञान सांगण्याचें काम व तें म्हणजे सर राधाकृष्णांचें, कीं ज्यांनी आपला सारा जन्म त्याचीं पारायणें करण्यांत घालविलीं, अमेरिकेंत, यूरोपमध्यें कीर्ति मिळविली व ह्या घटकेस ऑक्सफर्ड युनिव्हर्सिटींत गोऱ्या बाळांना हिंदुधर्मामृत पाजण्याची मोठी कामगिरी

शिरावर घेतली, त्या हिंदमातेच्या रत्नाला पाहून धन्यता वाटली. ते उठल्यावर आम्हीं टाळचांचा गजर सुरू केला.

## राधाकृष्णन् यांचे उपदेशामृत

ह्या आधुनिक व्यासाचे परकीयाच्या भाषेवरील दाडगे प्रभुत्व पाहून कौतुक वाटले. त्याचा एकेक शब्द व वाक्य सादारण माणसाला समजणे कठिण व विचारही अत्यत गहन. ते म्हणाले, " हल्ली सिनेमा, रेडिओ ह्या-सारख्या शास्त्रीय शोधांनी मनुष्यप्राणी एकमेकांच्या निकट सान्निध्यांत येऊ लागला आहे. तरी पण मनाची एकी न होतां सगळीकडे अस्वस्थता उत्पन्न झाली आहे. प्रत्येक बलवान् राष्ट्र दारूगोळा वाढवून लढाईस सज्ज आहे. फक्त ठिणगी पडण्याचाच अवकाश आहे. ह्या अस्वस्थतेचें मूळ काय तर परकीयानी जित राष्ट्राची चालविलेली लूट, राजकीय अशांतता व जातिद्वेषाचें बीज. ह्या तिन्ही गोष्टीचें उच्चाटन केल्याशिवाय शातता प्रस्था-पित होण्याची आशाच नको. ती कशी व्हावयाची तर मनुष्यमात्रास पार-मार्थिक व धार्मिक शिक्षण हवें. मन सुसस्कृत, उच्चध्येयवादी झाले, आप-परभाव राहिला नाही तरच तें साध्य होणार. मनुष्याला देवाधर्माचे शिक्षण मिळाल्याने तन्मयता प्राप्त होऊन तो स्वर्गसुखाचे घुटके घेऊं लागतो. एक-मेकांबद्दल आत्मीय भावना इतकी वाढते की द्वेषभाव तो पार विसरून जातो. जातिद्वेषाचें भूत त्यापुढे थैमान घालीत नाही. स्वत: दु:ख सोसून दुसऱ्यांना सुखी करण्यांत त्याला अत्यंत आनद वाटतो.

" तसेंच बहुजनसमाजाची अशी समजूत होते कीं, ज्या धर्मांत आपण जन्मलों तोच चांगला. (हें खरेंच) तथापि ह्या, धर्मवेडाच्या भरांत पर-धर्मीयांचीं उणींपुराणी कोणी काढू लागला, जगभर अमकाच एक विशिष्ट धर्म असावा असा प्रयत्न कोणी करूं लागला तर तें समासस्वास्थ्यास धोक्याचें होईल.

" अशा सभांमधून आम्हांला तऱ्हतऱ्हेच्या धर्मांचे लोक भेटतात. प्रत्येकाच्या धर्माच्या उच्च मूलभूत तत्त्वावर विचारविनिमय होतो. अशामुळें मत्सरभाव विसरण्याची प्रवृत्ति होते व मनुष्याची संकुचित वृत्ति कमी होते."

अशा तऱ्हेच्या सरसाहेबांच्या अमोघ ओघाचे चार तुषार माझ्या कानावर उडाले. ते मी वाचकांपुढे सादर केले.

## राष्ट्रसंघासारखाच धर्मसंघ !

ह्याप्रमाणें ऐहिक सुखांत दिवसरात्र मग्न असणाऱ्यांना व स्वसुख हें ज्यांचे सतत ध्येय आहे अशाना ह्या आधुनिक ऋषिमुनींनी धर्मगीतें ऐकविली. पण ज्याप्रमाणें जगात वरचेवर लढाया न व्हाव्यात, आपापसांत तंटे मिटविता यावेत म्हणून राष्ट्रसंघ निर्माण केला व त्याला धाब्यावर बसवून इटालीने आपली आसुरी लालसा ॲबिसीनियाला तुडवून तृप्त केली, त्याप्रमाणें जोपर्यंत एक राष्ट्र आधिभौतिक सुखांत निमग्न व दुसरे हरि हरि करून पारमार्थिक विचारात तल्लीन आहे, तोपर्यंत धर्मसंघ स्थापन केला तरी त्याचीही स्थिति राष्ट्रसंघाप्रमाणेंच होईल अशी भीति वाटते.

ह्याप्रमाणे सतत १५ दिवस सभा भरल्या. परिषदेचें सर्व श्रेय वृद्ध धर्मजिज्ञासु सर फ्रॅन्सिस यंग हजबंड ह्यांनाच आहे. ते हिंदुस्थानांत जन्मल्यामुळें त्यालाच आपला देश समजतात. ज्या हेतूकरितां येथे सर्व-धर्म-परिषद भरली, तो हेतु सफल व्हावा म्हणून जागोजागी स्त्रीपुरुषांच्या संस्थामधून ह्या विषयावर चर्चा व्हावी अशी त्यांनीं सर्वांना विनंति केली.

प्रो. महेंद्रनाथ सरकार, प्रो. दासगुप्त ह्यांनींही आपापल्या परीनें हिंदुधर्माचें विवेचन उत्तम तऱ्हेनें करून परिषदेत कीर्ति मिळवून हिदुस्थानचें नांव राखले. गांधीजीनाही परिषदेचे निमंत्रण होतें. परंतु त्यांनीं तें नाकारलें असें ऐकतें. कारण ते म्हणाले की, जोपर्यंत काही राष्ट्रे दुसऱ्या राष्ट्रांना गुलामगिरीत वागवितात, व त्यास आपले अंकित समजतात, तोंपर्यंत अशा परिषदेपासून फायदा व्हावयाचा नाही !

  

# वैवाहिक जीवन सुखी कसें करावें

लंडन

जून १९३६.

लाडके विमल,

तू विवाहाने बद्ध झाल्याची तार ही आतांच मिळाली. वाचून किती तरी मनोविकारांनी मनांत दंगल उडविली. कालिदासाची 'अर्थोहि कन्या परकीय एव' हीं वाक्ये आठवून खरोखरीच कंठ दाटून आला. मी शाकुंतल शिकत असतांना त्या शकुंतलेच्या सासरी जाण्याच्या वेळच्या वर्णनाच्या दोनचार कवितांचा अर्थ समजावून घेत असतांना देखील डोळ्यांतून पाणी येई. हृदय सद्गदित होई. पण आज त्याचा खराखराच अनुभव आला. मुली लग्नाला उपवर झाल्या म्हणजे आम्हां मोठ्या माणसांना कधीं त्या एकदां सुस्थळी पडतात असें वाटते. आणि एकदा त्या गेल्या परघरीं म्हणजे पुनः सुचतही नाही. कितीही सुधारणावादी आम्ही असलो, तरी वेळेवर मुलगी पिवळी व्हावी हेच बरें असें अखेरीस वाटू लागतें.

शिकलेल्या व मोठ्या मुली, ह्यांचा फार बिकट प्रश्न समाजापुढें उभा आहे. अमक्या एका विशिष्ट तऱ्हेचेंच घर हवें असा हट्ट धरून बसलेल्यांना ते कोठून आणून द्यायचें! शिवाय राक्षसी हुंडा आपला आ करून बसलेलाच आहे. त्याची तहान कोठवर भागवावयाची? दहा माणसांचें, नणंदा जावांचें, जुन्या पद्धतीचें घर नको, इंपीरिअल सर्व्हिसचाच नवरा हवा इतर नको. असे किती तरी नको आहेत. एकादे वेळेस असा विचार येतो कीं ह्यापुढे इतक्या मोठ्या मुली वाढवून घरांत ठेवायच्याच नाहीत मुळी. त्यांना शिग फुटण्याच्या पूर्वींच त्यांचें लग्न करून टाकायचें. नाही तरी लग्न हा सट्टाच नव्हे का? सर्व गोष्टींत त्यांतल्या त्यांत लग्नांत तरी नशिबावरच हवाला असतो.

नशिबानें तुला तरुण, कुलीन, विद्वान् असा वर मिळाला, एक केंसभर देखील उणीव परमेश्वराच्या कृपेनें राहिलेली नाहीं. तूही सुशिक्षित पदवीधर, उच्च कुळांतली, सुदृढ, सुरेख सर्व कलांत निपुण अशीच आहेस.

तेव्हां दोघेंही एकमेकांना अत्यंत अनुरूप मिळालांत. खरें पाहिलें असतां हिंदुस्थानी स्त्रीला शोभणाऱ्या एका तरुण वीराची सहधर्मचारिणी होण्याचें भाग्य तुला लाभलेले आहे. सर्व सुखांत व ऐश्वर्यात हुरळून जाऊं नकोस. वैवाहिक प्रातांत पाऊल टाकतांना केवडा तोडून आणण्यासारखें आहे. हाताला काटे बोचतील, भळभळा रक्त येईल, एकादा कृष्णसर्प दिसेल. ह्या सर्व दालनांतून शांतपणानें वाट चालून गेल्यास संसाराच्या नंदनवनाचें अत्युच्च शिखर मिळेल. स्वातंत्र्य, हटवादीपणा, आणि शिक्षणाच्या फाजील ऐटी, इकडे फारसे लक्ष देऊं नकोस. अगदीं नव्या वातावरणात तू जात आहेस. संभाळून जपून जा हं.

तुमचा विवाह रजिस्टर व वैदिक पद्धतीनें झाला हें वाचून फारच बरें वाटले. रजिस्टर विवाहामध्ये काडीमोडासारखे अनिष्ट विचार मनांत कधीं काळी न कळत तरी उद्‌भवतील. आपल्या वैदिक संस्कारांत एकमेकांचें त्यांतल्या त्यांत हिंदुस्थानी स्त्रीचे, उच्च-उदात्त प्रेम वृद्धिगत होईल, अशीच आपल्या वेदवाक्याची जादू आहे. आणि खरोखरी असे वाटते की हे लग्न-विधीचे मंत्र वधूवरांनी लग्नाच्या आधी नीट वाचन अर्थ समजावून घ्यावा. किती गंभीर अर्थ आहे त्यांत. त्या अर्थाची पकड एकदां मनाने घेतली की वाईट गोष्टीकडे हें ओढाळ मन सहसा धाव घेणार नाही.

वैवाहिक जीवन सुखी व्हावे असें वाटत असल्यास मी शिकलेली, ज्यांत त्यांत कायदा, अटी, असली कोर्टाची भाषा बोलण्यांत व आचरणांत आणूं नये. देवाण–घेवाण, पडतें घेणे, क्षुल्लक कारणावरून रणे न माजविणें, ह्या गोष्टी दोघांनीही समजून घेतल्या पाहिजेत. आज मी फक्त तुलाच लिहीत आहें. तेव्हां तुझ्याच म्हणजे स्त्रीजातिसंबंधीच बोलत आहे. दुसऱ्याही बाजूची विशिष्ट कर्तव्ये आहेतच. अगदी बरोबरीच्या नात्यानें पण त्याचा विचार फारसा तुझ्या पत्रांत करीत नाही.

दुसरें, लग्न झाल्यावर संसार करावा नेटका व तो उत्तम करून, मगच वेळ काढून, सामाजिक कामगिरी लेखन, वाचन करावें. हो सामाजिक काम प्रत्येक सुशिक्षित स्त्रीनें जरूर करावें. ह्यांत मुळींच शंका नाहीं.

पण कामावरून पति घरीं परत यायच्या वेळीं पत्नि क्लबांत किंवा व्याख्यान द्यायल्या गेल्या तर पतिराजांची इतराजी होते बरं का? चांगली

गृहिणी हंसतमुखानें व उत्तम पदार्थ करून पतिराजांच्या स्वागतार्थ तयार असते.

मुख्य गोष्ट ही लक्षांत ठेव की, शरीर अतिशय उत्तम ठेवायचें. विवाहानतरचें प्रथम प्रथमचे प्रेम सुदर व सुदृढ शरीरावरतीच असते. खरें म्हटलें तर यौवन टिकविण्याची दोघांनीही अत्यंत खबरदारी घेतली पाहिजे. यूरोपमधील बायका प्रकृतीनें किती छान आहेत. अंग कसें बाधेसूद व कशा त्या रसरशीत दिसतात. प्रथम निसर्गोपचाराने शरीर नीट ठेवावे व मग बाह्योपचारांनी.

इकडील कांही प्रातांत कुमार व कुमारीचाच भरणा फार दिसतो. मोलकरणीपासून हॉटेले वगैरेमधील बायका साऱ्या Miss. त्यांचे जागजागचे हिडिस प्रकार पाहून वाटतें की लग्नासारखे समाजास स्थैर्य राखण्यास दुसरें कांही नाही. लग्न व मुले स्त्रीपुरुषाच्या दृढ प्रेमास कारणीभत आहेत. विवाहशृंखला पायांत नसल्या म्हणजे मनुष्य स्वैर वर्तन करतो. अविवाहित अवस्था हें असिधाराव्रत आहे व ते शेवटपर्यंत पार पाडणे कठिण आहे.

येथील कुमार-कुमारी वैवाहिक सुखाचे (बेकायदेशीर) आस्वाद घेत असतातच. गळ्यांत मगळसूत्र—नव्हे बोटात आगठी, नाही एवढेच. इथल्य अविवाहितांची जी शोचनीय स्थिति झाली तीच आमच्यांची—झाली—होत आहेच बाकी—होईल. आणि त्याला वेळीच पायबंद नको कां घालायला! येथील वर्तमानपत्रात Love Affairs च्या मजेदार भानगडी वाचण्यांत येतात. नुकत्याच एका विवाहेच्छु कुमाराचा वर्तमानपत्रांत मी लेख वाचला तो असा.

'मला लग्नाचा मोठा धाक वाटतो.'

'कुमारांवरती कर बसवावा व तो पैसा वृद्ध कुमारिकांना देण्यांत यावा, म्हणून २०,००,००० कुमारिकानी वर्तमानपत्रांतून सूचना आणली. पण आम्ही कुमार कां देऊं? कालच मी एका मुलीवर किती पैसे खर्च केले. तिच्यावर केलेला खर्च म्हणजे दिवाळेंच निघाले माझे! अशी बायको ह्या बंकारीच्या व महागाईच्या दिवसांत करून कसा निभाव लागणार आहे माझा'!

'खरें म्हटलें तर ह्या कुमारींना मनांतून अगदीं लग्ना (Mating) ची हाव असते. पुरुषांच्या सहवासास त्या कशा उत्सुक असतात अगदीं. नुसतें

वरवर म्हणतात की नोकरी करून पोट भरूं, आणि स्वतंत्र राहू! पण तें नांवाचेंच! कोणी म्हणतातही की उद्यां एकादा मिळाला तर आम्ही लग्न करूं. पण ह्यांना मागणी घालायला कोणी धजत नाही, कां बरे??? माझें वय आज ३० आहे. तरी पण लग्न करणें माझ्यानें झेपणार नाही.

'आणि ह्याचें खरे कारण हेंच की माझे घर व मूल बायको गरिबीने नीट बघणार नाही. तिचे चोजले मी कोठवर पुरवू? हल्लीच्या मुलींना घर नको, मूल नको स्वतंत्रता व चैन हवी. शाळा-कॉलेजमधून सुटल्या कीं नोकरी. नोकरीवरून थेट टेनिस क्लबात, अशी स्थिति आहे.

आज कोणचा तरुण सुंदरसे घर, मोटार, स्वयंपाकाला मनुष्य, छान कपडे, नाटक-सिनेमा, एवढें करू शकणार आहे! व एवढेही करून आपला स्वतंत्रपणा गमावून, राणीसाहेबाच्या हातचे बाहुलें बनणार आहे'!

अशी येथील अविवाहिताची स्थिति आहे.

एका बायकामुलाच्या दवाखान्यात मी काम करायला जातें. प्रत्येक रोग्याचे टिपण मी समजावून घेई. डॉक्टरीण रोगी कसे तपासते, विचारपूस कशी करते, तेथेंच मी तिच्या हाताखाली काम करी.

एक ४८ वर्षांच्या कुमारी तपासून घेण्याकरिता आल्या. तोंडावरून बाईचें वय तितकें असेलसें वाटले नाही मला. हें वय इंग्लिश बाईचें, व त्यांतून कुमारिकेचें. ती थोडीच म्हातारी दिसणार आहे. येथे ६० वर्षापर्यंतदेखील मनुष्य म्हातारा वाटणार नाही. डॉक्टरणीने तपासून त्यांना निदान सांगितले. त्याबरोबर झालेल्या गोष्टीचा पश्चात्ताप करून बाई रडण्याओरडण्यास लागली. आता कसे करायचें, हा प्रश्न पुढे उभा राहिला. तिला अगदी चक्कर आल्यासारखे झालें.

मला इंग्लिशाचें उणे दिसले म्हणन 'मिस् मेयोचें' उट्टें काढीन असा एक क्षणभरच विचार मनांत डोकावला. पण पुढे ती माझी एक बहीण स्त्रीजात आहे, असा विचार आला. मनुष्यस्वभाव कोठेंही झाला तरी एकच असतो.

आमच्याही दवाखान्यांतून, गोऱ्या मिशनरी डॉक्टरणीना विधवा-कुमारी ह्यांचीं पापें दृष्टीस पडतातच की नाहीं? एकमेकांचीं उणीं कशाला काढायची! पण ह्या पापांना ज्या गोष्टी कारणीभूत आहेत त्याच काढन

टाकाव्यात मुळी! आमच्या देशांत पुर्नविवाह रूढ झाले पाहिजेत, व येथें कुमारीपणाचे बंड मोडले पाहिजे. म्हणजे अशा पश्चात्तापाची पाळी येणार नाहीं.

वरील सर्व गोष्टीवरून तुझी पण खात्री पटेल की तुझे लग्न झालें हें बरेंच झालें.

जर्मनी व इटलीमध्येही लग्न व मुलें होणे ह्याच गोष्टी चांगल्या समजतात, व कोणतेंही विचारवत राष्ट्र असेंच म्हणेल.

आमच्या हिंदुस्थानांतील वैवाहिक जीवन कसे आहे; स्त्री पुरुषांची संसारांतील भिन्नभिन्न कामगिरी कशी उत्तम व योग्य आहे, वगैरे सागोपांग विचार मी एका अमेरिकन कुमारीस सांगितले. ती अमेरिकेस अत्यंत नांवें ठेवीत होती. खुद्द आपल्याच घरांत पाच काडीमोड झाले असें ती म्हणत होती. स्वत्व, चैन, मजा, कपडे, शृंगार, ह्याच गोष्टीत अमेरिकन तरुण बुडले आहेत. आम्हाला गृहसुख मुळीच नाही. तुमचा हिंदुस्थान ह्या बाबतीत तरी सुखी आहे. असे उद्‌गार तिनें काढले.

हे परदेशांतील अनुभव मी तुला सागितले आहेत. मुलें स्टेटने संभाळा-वीत; कॉमन् किचन् आणि स्वैराचार ह्याची रसभरीत वर्णनें तुम्ही कॉलेजच्या मुलींनी शेंकडो वाचली असतीलच. त्याचा आणि तुझ्या अक्काच्या हिंदुस्थानी विचारसरणीचा पडताळा घे. मला कोणत्याही देशाचे चांगलें घ्यावयास आवडतें. तुझे मत पुढील पत्रांत कळव. तुम्हां दोघांना आयुरारोग्य व सर्व ऐहिक सुखें चिंतून हें पत्र पुरें करतें.

तुझीच
सौ. आक्का

  

# ऑक्सफर्ड व स्ट्रॅटफर्ड–ऑन–अॅव्हन

## बर्मिंगहॅम १७–८–३६

### मोटारमधील प्रवास

युरोपियन लोकात प्रवासाचें अत्यंत वेड दिसते. येथें ऑगस्ट पहिली-पासून १५ पर्यंत सुटी होती. त्या सुमारास मोलकरणीपासून तों थेट राजा-पर्यंत सर्वांची बाहेर जाण्याची अत्यत गडबड होती. लाखो लोक गांवास गेले. समुद्रकांठी जाऊन ते खूप मजा करतात. येथें घरी जेवण्याचा प्रघातच नाही. सर्व बहुतेक बाहेरच जेवतात. त्यामुळे बाहेर खाण्यास उत्तम व स्वच्छ मिळतें. अंगांतले कपडे न्यायचे फक्त, टॉवेलपासून ते बिछान्यापर्यंत हॉटेलमध्ये सर्व मिळतें. जागजागी हॉटेलें असल्यामुळे त्रास कांहीच नाहीं.

त्यामुळे प्रवास करणे फार सोपे आहे. मोटारनें, पायी, सायकलीने, जहाजांतून, आगगाडीनें अगर विमानाने कशानेंही जा, जे पाहिजे तें आहे. येथील जगप्रसिद्ध थॉमस कुक आणि सन्स ही कपनी प्रवाशांच्या खालीलप्रमाणे सोयी करते :—

सामान नेणे, जास्त असल्यास जपून ठेवणे, हॉटेलची जागजागी व्यवस्था करणें, वाटाड्या देणें, पैसे बदलणे, घरे देणे, गाडी, मोटार पुरविणें, सामान विकत घ्यावयाचे असल्यास माहीतगार मनुष्य बरोबर देणे, आपलीं सर्व पत्रें आपल्याला पोहोंचविणें, अशी हजारो कामे बिनबोभाट करते. तेव्हां एकट्या बाईला किवा लहान मुलाला देखील वाटेल तिकडे जातां येईल. इंग्लिश मनुष्य फसवावयाचा नाही. व्यापारांत चोख, वाईट माल निघाल्यास बदलून देतील. बाई आहे फसवा असें नाही. आपल्यासारख्या परक्या मंडळींना तर किती प्रेमानें वागवतात. रस्ता ओलांडावयाचा असला तर पोलिस आपल्याकरितां एकदम वाहतूक थांबवील व सुरक्षित पोहोंचवील.

थॉमस कुकप्रमाणें, पुष्कळ कंपन्या आहेत. आपण आपलीं पहावयाची गांवें लिहून द्यावीत की सर्व व्यवस्था लावतात. आम्हांला नवी मोटार घ्याव-याची असल्यामुळे तिच्यांतूनच स्कॉटलंडपर्यंत जायचें ठरविलें. पाहण्याचीं गांवें

व तेथे अमुक गांवी अमुक दिवस राहायचे म्हणून येथील Automobile Association of Great Britain ह्या सस्थेस कळविलें. २ पौंड देऊन एक वर्षाकरिता ह्या संस्थेचे वर्गणीदार झालो. त्यांनी ताबडतोब दुसऱ्याच दिवशी सकाळी एक पुस्तक तयार करून पाठविलें. आम्ही दोघे पाळीपाळीने मोटार चालविण्याचे ठरविले. ' कसे करू काय करूं ' असे वाटायची जरूरच नाही मुळी. कारण आंधळ्याने मोटार चालवावी इतक्या सोप्या सूचना, नकाशे, पाहण्याची ठिकाणे वगैरे समग्र माहिती कंपनीने पाठविली

## ऑक्सफर्डच्या वाटेंत

अशा तऱ्हेने पूर्वतयारी करून ता. १३ला सकाळी १०ला आम्ही लडन सोडले. सर्व रस्ता खेडेगांवांतूनच होता. म्हणजे आपल्या लखनौ, दिल्ली, लाहोर-प्रमाणे वाटला. सर्व रस्ते उत्तम व डाबराचे. बाजूनी वनश्री नटली होती. तीवर मानवी शक्ति कळसास पोहोंचलेली दिसत होती. दोन्ही गोष्टीचा रम्य मिलाफ फारच सुदर वाटत होता. रस्त्यानी सुदर मोटारीची गर्दी दिसली. येथें एक लहान मोटार व तिला जोडलेली एक सुदर धमणीवजा गाडी असते. तिच्यांत राहण्याची खाण्यापिण्याची सर्व सोय असते प्रवासाला ही फार सोयिस्कर असते. अशा पुष्कळ मोटारी दिसल्या. जागोजागी A. A. चे लोक व जवळच पेट्रोल, मोटारला लागणारे सामान, अपघात झाल्यास रुग्णसाहित्य वगैरे सर्व सज्ज असे त्याचे टेलिफोन सर्व जागी आहेत. शिवाय जागोजागी लहान लहान बंगले. तेथें मोटार ठेवावी, फराळ करावा, विश्रांति घ्यावी. सहा साडेसहा शिलिग प्रत्येकी दिले की झालें काम. चहा-कॉफी, खाण्याचे पदार्थ मिळण्याची वाण कोठेच नाहीं. रस्ते सुदर, धूळ नाही, उन्हाचा ताप नाही म्हणून प्रवास करणें फारच आनंददायी असतें.

दोन तासांत आम्ही ऑक्सफर्डला पोहोंचलो. लडनच्या मानानें हें फारच शांत दिसले. माणसें साधीं, रंगलेल्या तोंडाच्या बायका, बारीक अंगें, असें दिसलें नाही. पुस्तकांची दुकानें पुष्कळ दिसली. कॉलेजें व विद्यार्थी ह्यांचेंच वातावरण चोहींकडे भासलें. ४००–५०० वर्षांची जुनीं कॉलेजें दिसलीं. लिकन कॉलेजमध्यें पुण्याचे ट्रेनिंग कॉलेजचे प्रिन्सिपॉल तावडे ह्यांना भेटण्यास गेलों व तेथून त्यांच्याबरोबरच मार्गारेट हॉलमध्यें

मॉंटेसरीचे जागतिक अधिवेशनास गेलों. मॅडम मॉंटेसरींना पाहण्याचा लाभ झाला. अधिवेशन संपल्यावर सर्व सभासदांना बागेंतील सुंदर कुंजाबर चहा दिला. जगांतील जागोजागचे स्त्रीपुरुष एकमेकांत गप्पा मारण्यांत दग झाले होते. ही जागा कॉलेजच्या मुलीचे वसतिगृह आहे. सुदर बगीचा, टेनिसकोर्ट, हिरवीचार मैदानें, फारच सुदर दिसली. येथें पुन. विद्यार्थी होऊन राहावेसे वाटले.

## करमणुकीकरितां नाच

सहा वाजता सभासदांच्या करमणुकीकरितां एका इटालियन बाईनें स्वत. व लहान मुलामुलीकडून, व २०–२२ वर्षांच्या मुलीकडन बागेंमध्ये तऱ्हतऱ्हेचे नाच करविले. बाई पसतीस ते चाळीस वयाच्या असतील. पण अंगाबांध्यानें अति सुदर व हसतमुख होत्या. त्यांचे व मुलीचे सहज नयनमनोहर, ऐटदार नाचणे पाहून नवल वाटले. खेडेगांवांतील लोकाचे सहजसुलभ वागणे, रानावनात फुलापाखरांच्या सान्निध्यांत नाचणे बागडणें हे बाईनी दाखविले. शरीर कमावलेलें व बाधेसूद असले म्हणजे कृत्रिम सौंदर्याची जरुरीच नाही मुळी. अर्थात् ते नाचानेच होते असे मुळीच नाही. कोणतीही अगमेहनत केली म्हणजे झाले.

अशा तऱ्हेने थोडी कॉलेजे व हा समारभ बघून रात्री निवासस्थानी आलों. हे एक खाजगी हॉटेल होतें. येथें फराळ व विश्राति एवढीच व्यवस्था होती. बायकांचाच कारभार सर्व. व्यवस्था टापटीपीची व अगदी स्वच्छ. सगळीकडे शांत असें होते. दुसऱ्या दिवशी सकाळी प्रिन्सिपॉल तावडे व आम्ही ॲबिग्डन येथें मुबईचे सेवानिवृत्त सिव्हिलियन सर हेन्री लॉरेन्स ह्यांच्या बंगल्यावर गेलो. ह्याची सहा एकर जागा शांत बनामध्ये आहे. तींत लहानसा बंगला, छोटीशी मोटार, घरात कामाला एकच बाई. सर साहेबांचें वय ७०, पण चागले सशक्त आहेत. शेती, बगीचाचे काम, घरांतील काम दोघे पतिपत्नी करतात. त्यांचें सर्व पाहून माझ्या मनांत हजारों विचारांनी काहूर उठविलें. उत्तम शरीरप्रकृति ह्या वयात व शेती करण्याची धमक वयाच्या २३ वर्षांपासून ऐश्वर्यांत लोळलेल्या माणसाला. आम्हीच जर ह्यांच्या जागी असतों तर पोकळ ऐट करून किती मोठेपणाचे नखरे केले

असते ? आमच्या पोकळ ऐटीच्या कल्पना जातील व मेहनतीने काम करूं तेव्हांच भाग्योदय होणार आहे. आणि इंग्रजांची हीच वृत्ति आम्ही शिकायला हवी.

## शेक्सपिअरची जन्मभूमि

असो. अशा तऱ्हेने ऑक्सफर्ड सपवून कविसम्राट् शेक्सपिअरच्या जन्मस्थानी स्ट्रॅटफर्ड-ऑन-ॲव्हन येथे आलो. जेथे निसर्गाशी समरस होऊन लताकुंजात खेळून ज्यानी अत्यंत अद्‌भुत काव्य—नाटके निर्माण केली त्या गांवचे सृष्टिसौदर्य काय विचारायचें? शेक्सपिअरचे जन्मस्थान, मृत्युस्थान, त्याची शाळा वगैरे सर्व पाहिले. येथे तो उभा असेल, बसला असेल, रात्रीच्या रात्री जागा राहून लिहिले असेल असे विचार आले. पुनः तो जन्मावा, आपल्याला तो दिसावा असें वाटले. त्याच्या कविता व नाटके ह्यांतील वाक्ये आठवून, दुःखमिश्रित आनदसागरात मन पोहू लागले. त्यांच्या स्मरणार्थ एक मोठे थिएटर बाधले आहे. प्रसिद्ध नाटकें येथे होतात.

येथेही लहान लहान टुमदार बंगले आहेत. तेथे प्रवाशाची राहण्याची सोय होते. आमचा बंगला एका तरुण जोडप्याचा आहे; तो ६००—७०० रुपये मिळविणाऱ्या ऑफिसरच्या सरकारी बंगल्याप्रमाणें आहे पुढे फुलबाग, मागे भाजीपाला वगैरे दोघांनी केला आहे. नोकर मुळीच नाहीं. उत्तम फर्निचर, ते मांडण्याची पद्धत, हातांनी विणलेले पडदे, व कानाकोपऱ्यांतील टापटीप पाहून गृहिणीचें कौतुक वाटले. नवरा बाहेर काम करतो व बायको घरांत, ४—५ पाहुणे ठेवून त्यांची सर्व बरदास्त ठेवते. झाडणें, पुसणे, स्वयंपाक, बाजारांतून सामान आणणें सर्व तीच करते ; सर्व दिवसभर काम करून दोघांचीही पैसे मिळविण्याची हौस पाहून कौतुक करावेसें वाटले.

  

# हिंदी विद्यार्थी परदेशांत काय शिकतात?

## साउथपोर्ट : ऑगस्ट १९३६

परदेशी शिक्षण घेण्याकरिता दरसाल हिंदुस्थानच्या बंदरांतून शेंकडों विद्यार्थी बाहेर पडतात. एके काळी परदेशी डिग्रीला मान होता. परंतु ती स्थिति आता बदलली आहे. रेल्वेवर किंवा खाजगी कंपनींतून मँचेस्टर बी. एस्सी., लंडन बी. एससी. साठ रुपयावर काम करण्यास तयार आहेत; पण नोकरी मागावयास गेलेल्याशी फुकटची बात करायलाही कोणी तयार नाही. अशी ह्या "इंग्लंडला जाऊन आलेल्यांची" दुर्दशा पाहून कोणाचेही अन्त:करण कळवळल्याशिवाय राहणार नाही. दर वर्षी वर्तमानपत्रांतून हायकमिशनरचा रिपोर्ट प्रसिद्ध होतो. त्यांत विद्यार्थ्यांबद्दल पालकाना इषारा दिलेला असतो की, अतिशय हुषार विद्यार्थी असला तरच तो इकडे पाठवावा. तरी पण विद्यार्थ्यांची संख्या वाढतच आहे !

ह्या वर्षी आय. सी. एस.ला जवळजवळ ३५० विद्यार्थी बसले आहेत. त्यांपैकी फार झाले तर १० घेतले जातील. बाकीच्या तीनशें चाळीस विद्यार्थ्यांचें पुढें काय होणार? चारचार पांच पाच वर्षे इंग्लंडमध्यें राहून वीस-बावीस हजार रुपयांचा चुरा होतो. तेथून परत आल्यावर पन्नास रुपयेही मिळण्याची मारामार पडते. म्हणून असेंही वाटतें कीं, तेच रुपये घरीं बसून खाल्ले असते तरी देखील अधिक दिवस पुरले असते.

### खर्चाचें प्रमाण

खरें पाहिलें असतां हिंदुस्थानच्या मानानें येथें अत्यंत महागाई आहे. उठतां बसतां पैसा लागतो. शिवाय लंडन हें पडलें मोहाचें गांव. यौवन, धन व अविचार ह्या तिन्ही गोष्टी असलेल्या मुलांना येथें जपून राहणें फार कठिण आहे ! दर महिन्याला मुलाला परदेशीं पैसा पाठवितांना आई-बापांना किती कष्ट पडत असतील, हें तरुण विद्यार्थ्याला त्याच्या डोळ्यावर इंग्लिश

मोहाचें पटल पडल्यामुळें दिसत नाही. असल्या महागाईच्या काळांत तो आणखी दुप्पट खर्च करून घरच्या मंडळीना व पर्यायानें आपल्याला दर क्षणीं दरिद्री करून घेत असतो.

माझ्या मतें एका विद्यार्थ्यास अंदाजी खालीलप्रमाणे खर्च यावा :

खोलीभाडें दर आठवड्यास १ पौ. १५ शि. (यांत झाडझूड, दिवाबत्ती, पलंग, चादर, ब्लँकेट, टॉवेल व ह्याची धुणावळ, साबण वगैरे सर्व गोष्टीचा समावेश होतो.); ऑक्सफर्ड, केंब्रिज, बर्मिंगहॅम, मॅंचेस्टर येथे शिक्षण घेणाऱ्यास दुपारचें जेवण सोडून ब्रेकफास्ट, दुपारचा चहा व संध्याकाळचें जेवण, २ पौंड; दुपारचें जेवण १ शि.; चहा एक कप, फक्त २ पे.; रात्रीचें जेवण १ शि.; सिनेमा-नाटकाचा दर १ शि. ६ पे.; धोबी १२ कपड्यांना २ शि.; गरम सूट ३ शि. ६ पे.; नुसता गरम कोट २ शि.; किरकोळ बस् ट्रॅम वगैरे रोज ६ पे.; किरकोळ दर पंधरवड्यास २ शि.

## शाकाहारी बॉंबे हाऊस

लंडनमध्यें हॅंपस्टेड व गॉवर स्ट्रीट येथे विद्यार्थ्यास सुंदर हवाशीर जागा मिळते. हॅंपस्टेड येथे एका गुजराथी गृहस्थांनीं बॉंबे हाऊस म्हणून शाकाहारी पद्धतीचें वसतिगृह उघडले आहे. तेथे दोन पौंडांमध्यें एका आठवड्यांत सर्व जेवणें व चहा मिळून व्यवस्थित राहतां येतें.

येथे कपडे लवकर धुवावे लागत नाहीत. हिंदुस्थानांतून आपल्या शिंप्याकडून शिवलेले सर्व कपडे चालतात. कोणी हंसत नाहीं. येथें दुप्पट पैसे पडतात. खालीलप्रमाणें कपडे केल्यास चालतील.

१ रेनकोट, ३ गरम सूट साधे, १ गरम ओव्हरकोट, १ किमोना, ६ साधे शर्ट, २ गरम पुलोव्हर, शर्टवर घालण्याकरितां.

## चैनीला पायबंद

विद्यार्थ्यांच्या हातांत जास्त पैसा असला म्हणजे साहजिकच इकडे तिकडे मन जातें. तेव्हां तोच अगदीं बेतानें पाठविला म्हणजे तो बहकणार कसा? आपल्याला दुरून कांहीं माहीत नसतें. दर पत्रांत मुलगा आपली पैशाची ओरड करतोच. आईबापांना वाटतें, लागत असेल जास्त, कांय

नेम आहे? पण येथे आल्यावर मुलाला रोज सिगारेट हव्यात! एकदोन दिवसांनी सिनेमा, नाटके, रेव्ह्यू हवेत! हरतऱ्हेचे सूट, तीन साडेतीन रुपयांचा एक हातरुमाल, अशा हजारो चैनीच्या गोष्टी हव्यात. एकादा त्याच पैशांतून चोरून मोटार ठेवतो. विद्यार्थिदशेत मोटार कशास हवी? स्वतःच्या घामानें पैसा मिळवावा व दहा मोटारी ठेवाव्यात. **आयत्या पैशावर चैन करणें हें इंग्रजांचें तत्त्वच नव्हे.** पण अशा तऱ्हेने ऐटीने राहून सुंदरीना वश करावयाचें असते. येथें येणारी मुले श्रीमंतांची असतात असा येथल्या लोकांचा समज असतो. येथील भयंकर जीवनकलहाला व पतिराज मिळविण्याला मुली कंटाळलेल्या असतात; तेव्हा सावळ्या वराना आपल्या जाळ्यात त्या पटकन् गुंतवून टाकतात; काळे विद्यार्थी व गौर कुमारी हातात हात घालून फिरतांना पाहिलें म्हणजे हिंदुस्थानच्या तरुणांची कीव येते व ह्यांच्यामुळे देशाला भाग्यकाल कसा दिसणार असा विचार मनांत येतो.

## सहकुटुंब पाठवा

ह्यांचें एकादे लहानगे बाळ वडिलांची साक्ष देत घरी असेल. एकादी निष्पाप युवती आपले पतिराज सुखरूप परत यावेत म्हणून अनन्यभावाने रोज देवास आळवीत असेल, मनांतून झुरत असेल तरी हे पाशवी वृत्तीचे पति इंग्लिश तरुणींशी विलास करीत आहेत. हल्लीच्या पिढीपेक्षा मागील पिढीला समाजाचें, आईबापांचे भय असे व त्यांच्याकडून न आवडणाऱ्या गोष्टी टाळण्याचा प्रयत्न होत असे. पण हल्लीचें युग मुळी बेसुमार वागण्याचे आहे. ह्यांच्याशीं गांठ पडते ती थोडीच मोठ्यांची पडते? मोलकरणी, कारखाना–फॅक्टरीत काम करणाऱ्या, कमी दर्जाच्या मुली ह्यांच्याशीच यांचा संबंध यावयाचा. ह्यांतीलच एकादी बायको होण्याचें दुर्भाग्य नशिबी यावयाचें. मग मात्र ह्या तरुणांचे हाल विचारूं नका. आईबापांना मरणांतिक यातना. नोकरी नच लागल्यास गोरी बायको करील ते हाल निराळेच. आमचा समाज ह्याला व तिचा समाज तिला टाकतो. अशी वटवाघुळाप्रमाणें दोघांची स्थिति होते. कोणतेंही विचारवंत राष्ट्र विद्यार्थिदशेंत तरुणांनीं स्त्रीलंपट व्हावें हें चांगलें असें म्हणणारच नाहीं. मग परदारस्यपंकांत रुतलेल्या हिंदुस्थानास तर तें अत्यंत घातक आहे यांत शंकाच नाही. ह्यावर एकच

तोड सुचते. ती ही की, शक्य असल्यास विद्यार्थ्याला लग्न करून बायकोबरोबर इकडे पाठवावें व दोघांनीही येथे शिकावे. तेही तशा लायक मुलालाच. सामान्य मुले पाठवून पैशाचें नुकसान कोणीही करूं नये

नीट विचार केला तर असे दिसून येईल की, इंग्लंडमधील शिक्षण त्यांच्या मुलांना मेहनती, स्वावलंबी व उत्तम नागरिक होण्यास शिकविते. पैसे मिळविण्याकरितां तो वाटेल ते काम करील. नच काही मिळाल्यास गरिबीनें राहील. पण त्याविरुद्ध आमच्या मुलाची स्थिति दिसते समुद्रपर्यटन करून आला की, स्वर्गाला हात लागलेसे वाटते. त्याचे सर्व राहणे महागाईचें होऊन बसतें. हिंदुस्थानात परत गेल्यावर करमत नाही; नाच करावयास मिळत नाही, म्हणून जीव हळहळतो. स्वतःच्या घरांत त्याला सात्त्विक आनंद वाटत नाही व शारीरिक बिनखर्चाचे व्यायाम घेण्यांत मौज वाटत नाही. म्हणून स्वदेशांत जायची वेळ आली तर दुःख होते. आणि ह्याचें कारण म्हणजे येथे मन मानेल तसे वागता येते. हें जे मी लिहिले तें वरचेवर येथील विद्यार्थी व विद्यार्थिनी ह्याच्याशी संभाषण करून अनुभवाला आले तेंच लिहिलें आहे. त्यांच्यांत राहून नीट निरीक्षण करूनच वरील मतें ठरविलीं आहेत. व्यर्थ भरमसाट विधाने केलेली नाहीत.

## मुलांनंतर मुली

आता तर आपल्या मुलीही इकडे येऊ लागल्या आहेत. हिंदुस्थानी डिग्री मिळवून त्याच्यातही बेकारी वाढली, तेव्हा येथील एकादी डिग्री घेऊन थोडा जास्त पैसा व लौकिक मिळेल असें त्यांना वाटतें. आजपर्यंत मुलें वाटेल तें करीत आली. परत गेल्यावर आपल्या बायका त्यांना अडाणी, नीरस वाटू लागल्या, व त्यानी त्यांची विटंबना केली. आतां हीच मुलींची मनःस्थिति झाली, तर नवल काय?

मुलींच्या विचारांचें काहीं नमुने :—

१. मी काळी कां झालें ह्याची मला चीड येते.

२. **हिंदुधर्मांत जन्मले ह्याची मला लाज वाटते.**

३. मला जन्मभर येथे राहण्यास आवडेल.

४. हिंदुस्थानी नवरे वाईट, अगदीं बायकोला जनावरासारखे

वागवितात. इतके पदार्थ खायला कशाला हवेत? स्वयंपाकघरांत तिला राबवावयाची नुसती.

५. नमस्कार केल्यास हस्तादोलनास हात पुढे येतो.

६. वर्ष सहा महिन्यात स्वभाषा पार विसरते.

७. नाच पाहून करमणूक कशी करावी हे त्यांनाच माहीत, नाहीं तर आम्ही! आपल्यात नाच रूढ झाले पाहिजेत.

८. आपले जेवण फार वाईट, इंग्लिशाचे अन्न खाऊन काम करण्यास कशी तरतरी वाटते.

एका विद्यार्थ्यास म्हटलें की, तुमच्यासारख्यांनी येथें येणे फार वाईट, तुम्ही चांगल्या गोष्टी शिकत नाही. त्यावर तो म्हणाला, मध्यम वयाची माणसें आली की ती काहीच नवे घेऊं शकत नाहीत. त्यांची मनें पक्व झाली असल्याने त्याच्यांतली ग्राहकशक्ति कमी झालेली असते. काळ्यांच्या लीला, इंग्लिश तरुणीचा सावळा गोंधळ, सतत पाहून व येथे दर माणशी काय खर्च लागेल हे स्वतःच्या अनुभवाने ठरवून पालकास सूचना देणे मला जरुरीचे वाटलें, म्हणून हें लिहिले आहे. आपला देश रसातळाला पोंहोचला असतांना त्याची काळजी न वाटतां आमची मुले इकडे अशा फदांत पडतात हें पाहून कोणाला चीड येणार नाही? ही स्थिति कशी सुधारेल व आपली तरुण पिढी चांगली कशी निपजेल याचा विचार हिंदुस्थानांतील पालकांनी, शाळांच्या चालकांनी आणि पुढाऱ्यानी करणे अगदी अगत्याचे आहे.

  

# इंग्लंडमधील हिंदी विद्यार्थ्यांचें जीवन

[ २९ सप्टेंबर १९३६ च्या केसरीच्या अंकांत प्रसिद्ध झालेल्या माझ्या लेखास उत्तर.]

(लेखक :—डॉ. **गो. पां. काणे**, लंडन)

आजकाल शिक्षणानिमित्त हिंदुस्थानातून येथें येणाऱ्या विद्यार्थ्यां-प्रमाणेच दोनतीन महिने यूरोपची सफर करण्याकरितां सहकुटुंब येणाऱ्या गृहस्थांचीही संख्या पुष्कळच वाढली आहे. परदेशगमनाच्या या वाढत्या संवयीमुळे होणाऱ्या खर्चापासून देशाला कितपत फायदा होतो याविषयी बहुजनसमाज साशंक असतो व इग्लंडला जाऊन आलेल्या एकाद्या विद्यार्थ्याच्या अपयशाचा अथवा पैशाच्या उधळपट्टीचा फायदा घेऊन अशा सर्वच विद्यार्थ्यांवर टीका करण्याकडे प्रवृत्ति होते. त्यांतूनच चारदोन महिने यूरोपची यात्रा करून आलेल्यांना "मी सर्व परिस्थिति डोळ्यानीं प्रत्यक्ष पाहून मगच बोलतों आहे," असा साळसूदपणाचा आव आणून वाटेल तशी भरमसाट विधानें करावयास संधि मिळते. विद्यार्थी वर्ग या टीकेकडे बहुशः फारसें लक्ष देत नाही; पण केसरीच्या ता. २९ सप्टेंबरच्या अंकांत सौ सरोजिनीबाई देशपांडे यांनी "हिंदी विद्यार्थी परदेशांत काय शिकतात?" या मथळ्याखाली, अत्यंत अनुदार व वस्तुस्थितीचा विपर्यास करणारा लेख लिहिल्यामुळें, वाचकवर्गाला या प्रश्नाच्या दुसऱ्या बाजूची जाणीव करून देण्याची जरुरी भासली व म्हणून हें उत्तर केसरीत प्रसिद्ध करण्या-साठी पाठवीत आहे.

दर वर्षीं सुमारें १,००० नवीन हिंदी विद्यार्थी येथें येतात. यंदां आय. सी. एस्. परीक्षेसाठीं ३५० विद्यार्थी बसले होते खरे; पण याचा अर्थ ते सर्वच त्या परीक्षेंत मिळणाऱ्या यशावर अवलंबून होते असा नाहीं. सायन्स, कायदा, अर्थशास्त्र अशा विषयांचा अभ्यास करण्यासाठीं ते आले असतां, वय नियमापेक्षां कमी असेल तर खडा टाकून पाहावा या दृष्टीनें पुष्कळसे 'आय. सी. एस्.' परीक्षेस बसतात. नवीन नियमाप्रमाणें लंडनमध्यें

भरती करण्यांत येणाऱ्या उमेदवारांची संख्या कमी झाल्यावर आपोआपच निवळ या परीक्षेकरितां येणाऱ्यांची संख्या कमी होईल.

हल्ली सायन्समधील निरनिराळ्या उपशाखांतील बी. एससी. व त्याहून उच्च पदव्या मिळवू इच्छिणाराची संख्या वाढली आहे. रसायन-शास्त्र, वैजिक, वैद्यकीय, इंजिनिअरिंग ( मेकॅनिकल व सिव्हिल ) वगैरे विषयांत हिंदुस्थानांत शिक्षण मिळण्याची पुष्कळ वर्षे उत्तम सोय आहे. पण तेथें बहुतेक जागी फार थोड्या विद्यार्थ्यांस प्रवेश मिळत असल्यामुळे, साधारण बुद्धीच्या पुष्कळ जिज्ञासूची निराशा होते. या वर्गांतील कोणीही, पैशाचें पाठबळ असल्यास इंग्लंडमध्ये येऊन आपले शिक्षण पुरे करूं शकतो. तसेंच "विलायतेत जाऊन आलेल्या माणसाची किंमत जास्त" अशी जी कल्पना दुर्दैवानें अजून प्रचलित आहे, त्यामुळें थोड्या फार कुशाग्र बुद्धीच्या प्रत्येक विद्यार्थ्याला, हा 'माननीय' टिळा लावून घेण्याची इच्छा होणें अगदी नैसर्गिक आहे. या आकांक्षेमध्यें बहुधा पालकही भागीदार असल्यामुळें खर्चित द्रव्याचें योग्य फळ न मिळाल्यास त्याचा दोष केवळ मुलाच्या माथीं मारणें अगदीं अयोग्य आहे.

सौ. देशपांडे यांच्या लेखात लंडनमधील महागाईचे वर्णन असून नंतर आवश्यक खर्चाचें प्रमाण काय असावें याविषयी कांही आकडे आहेत. हें अंदाजपत्रक बहुतांशी चुकीचें आहे. ऑक्सफर्ड व केंब्रिज येथें सकाळची न्याहारी, दुपारी चहा, रात्री जेवण व खोलीभाडें याकरितां आठवड्याला दोन पौंड धरले आहेत. वरील दोनही ठिकाणी विद्यार्थ्यांना विशिष्ट घरांतच राहावे लागतें व आठ नऊ आठवड्यांच्या एका टर्मला खोली-भाडेच १२ ते १६ पौंड असतें. लंडनमधील बॉम्बे हाऊसमध्यें आठ-वड्याला दोन पौंड दिल्यास दुपारचें जेवण व चहा मिळत नाही. बाहेर हॉटेलांत कोठेही स्वच्छ व पोटभरीचें जेवण दीड शिलिंगाचे खाली मिळ-णार नाहीं; बहुतेक दोन शिलिंगच पडतील व शिवाय वर 'टिप्' द्यावी लागेल ती वेगळीच. लंडन एवढें अफाट शहर आहे कीं, शनिवारीं रविवारीं दोनतीन मित्रांना भेटावयाचें झाल्यास बस् अथवा ट्यूब रेल्वे-मध्यें दोन शिलिंगपर्यंत केव्हांच खर्च होऊन जातो. दर पंधरवड्यास किरकोळ दोन शिलिंगांचें अंदाजपत्रक आहे. यांत स्टेशनरी, पोस्टेज,

हजामतीचें सामान, साबण वगैरे फक्त आवश्यक गोष्टींचा समावेश करावयाचें म्हटलें तरी तें अगदी अशक्य आहे. कपड्यांच्या बाबतींतही त्यांनी दिलेल्या सूचना पुष्कळशा अव्यवहार्य आहेत. हिंदुस्थानात तयार करवून आणलेले शर्ट येथे वापरतां येतात. पण कोणत्याही गांवठी शिप्यानें शिवलेला गरम सूट येथील पद्धतीपेक्षां अगदीच चमत्कारिक असतो, हे तत्काळ लक्षांत येतें व सभ्यतेमुळे लोकांनी निरखून पाहिले नाहीं अथवा तेथील लोक उघडपणे हंसले नाहीत, तरी ते कपडे वापरणाऱ्याला आपल्या पोषाखांत कांही तरी चुकत आहे अशी सारखी जाणीव उत्पन्न होऊन अस्वस्थता वाटते. याचा परिणाम, हिंदुस्थानांतून आणलेले कपडे फुकट जाऊन, दुप्पट खर्च करून येथें नवीन बनवून घेण्याकडे होतो. ज्याला स्वस्त कपडेच घ्यावयाचे आहेत त्याचेकरितां 'पन्नास शिलिंग टेलर्स' वगैरे शेंकडों दुकाने आहेत. हिंदुस्थानांतील पैरण व डगला वापरण्यास येथें कायद्याने बंदी नाही. पण फारसें कोणी वापरीत नाही याचें कारण लोकांमध्यें उगाच कुतूहल वाढून त्रास होतो. तीच गोष्ट इतर कपड्यांचे बाबतीत.

वर उल्लेख केलेल्या लेखात विद्यार्थ्यांच्या सामाजिक जीवनातील अडचणीविषयी पूर्ण बेफिकिरी दाखवून त्यांच्या वागणुकीविषयी वाईट ग्रह पसरविण्याचा प्रयत्न केलेला आहे. सहकुटुंब अथवा चारदोन मित्राबरोबर आज बर्लिन, उद्यां व्हिएन्ना, परवां पॅरिस, पुढील आठवड्यांत लंडन, अशा रीतीनें हिंडणारांना दोनतीन वर्षें एकलकोंडेपणाने राहावें लागणाऱ्या विद्यार्थ्यांच्या मन:स्थितीची काय कल्पना? प्रथम येथे यावयाच्या वेळीं तो बहुधा २० ते २२ चे दरम्यान असतो. आई, बाप, भावंडें यांनी भरलेल्या घरांत अथवा मित्रांचे परिवारांत कंठलेले सुखाचे दिवस सोडून एकदम निरनिराळ्या रिवाजाच्या व स्वभावाच्या लोकामध्यें त्याला मार्ग काढावयाचा असतो. एकादे दिवशी कंटाळा आला, अथवा मन प्रसन्न नसले तर मोकळेपणानें बोलावयास विश्वासाचें मनुष्य मिळावयाचीही लंडनसारख्या बकाली शहरांत अडचण. तेव्हां नाच करावयास शिकून अथवा आठवड्यांत एकाद दुसरा सिनेमा अथवा नाटक पाहून मानसिक शीण घालविण्याचा प्रयत्न त्यानें केला तर त्यास दोष कां मिळावा? एकाद्या इंग्रज मुलीचे हातांत

हात घालून हिंडणारा हिंदी तरुण दिसला की त्याचे मनात वैवाहिक व अनैतिक विचारच असणार ही कल्पना काढावयास काय आधार? मुलाला पैसेच जास्त पाठविले नाहीत म्हणजे तो नाटक-सिनेमाला जाईलच कसा हाही चुकलेल्या विचारसरणीचा एक निदर्शक मासला आहे. खाणें, पिणें, विश्रांति, करमणूक याची मनुष्यप्राण्याला जरुरी आहे. त्याचें साधन नसलें तर एक वेळचे जेवण कमी करून अथवा अन्य मार्गांनी पैसे वांचवून ती उणीव दूर करण्याचा तो खास प्रयत्न करील. अशा विद्यार्थ्यांना, सहाध्यायाजवळून कर्ज काढून त्यानाही संकटांत पाडण्याखेरीज दुसरा मार्ग राहात नाही. दर वर्षी सुटीकरितां इतके हिंदी अधिकारी येथे येतात. पण येथें आल्यावर चार विद्यार्थ्यांना चहाला अथवा जेवावयास बोलावून त्यांच्या अडचणी असल्यास निवारणे, नवीन ओळखी देणे या गोष्टी करण्याची जरुरी आहे असे वाटणारेसुद्धां हाताचे बोटावर मोजण्याइतकेच सापडतील. प्रत्यक्ष कांही करणारे विरळाच.

हॅम्पस्टेड अथवा गॉवर स्ट्रीटमध्ये राहून स्वस्तांत सर्व होते असाही एक मार्ग सौ. देशपाडे यांनी सुचविला आहे. केवळ येथील युनिव्हर्सिटीची पदवी पदरात पाडून त्या भांडवलावर हिंदुस्थानांत मोठी नोकरी मिळविण्याची ज्यांची इच्छा आहे, त्यांना हा मार्ग योग्य आहे. पण परदेशगमनाचा मुख्य उद्देश निरनिराळ्या लोकांशी संबंध यावा, त्यांचे रीतिरिवाज, भाषा, काम करण्याची पद्धति वगैरेंची माहिती व्हावी व अनुभव वाढावा, हा असेल तर येथें येऊन हिंदी लोकांमध्येंच राहणें, त्यांच्या मध्येंच हिंडणें, इंग्रजी शक्य तेवढे कमी बोलणें या विचारांनी तो कसा साध्य होणार? व तेथील लोकांचें आदरातिथ्य स्वीकारावयाचें, त्याची योग्य फेड करावयाची व अशा तऱ्हेनें आपल्या देशाविषयी आदर वाढवावयाचा तर त्याकरितां होणाऱ्या खर्चाबद्दल कुरकुरून काय उपयोग? हालअपेष्टांतून झगडून, काटकसरीनें राहून विद्याभ्यास पूर्ण करणाऱ्या हुषार विद्यार्थ्यांचें कौतुक कोणाला नाही? पण प्रत्येकानें तशा पद्धतीनेंच राहणें जरूर आहे असें समंजस मनुष्य खास म्हणणार नाही. इंग्रज स्त्रीचे मोहांत मुलानें पडूं नये म्हणून त्याचा विवाह करून पत्नीसमवेत येथें पाठविण्याचा जो उपाय सुचविला आहे तो असाच 'और' आहे. जेथें एकट्या मुलाचा येथील

खर्च भागविणें पालकांना जड जातें, तेथे त्याचे बायकोलाही पाठविण्यास लागणारे पैसे कोठून आणावयाचे, तें सौ. देशपांडे यानी दर्शविल्यास बरें होईल. आमची हिंदी संस्कृति श्रेष्ठ व अलीकडचे तरुण अगदी फुकट गेले अशा तऱ्हेची आरोळी मारण्याचा हिंदुस्थानांत हल्ली प्रघातच पडून राहिला आहे. पण हे श्रेष्ठत्व केवळ पूर्वजांच्या थोरपणावर आणि मोह पाडण्यासारख्या गोष्टींपासून दहा हात दूर राहूनच राखले आहे की काय अशी एकादे वेळी शंका येते. नाही तर अशा 'श्रेष्ठ' वातावरणांत वाढलेला तरुण मोह अथवा अविचार याच्या पहिल्या फटकाऱ्याबरोबर गारद होतो. तेव्हां आमचे सामाजिक वातावरणात कोठें तरी चुकतें आहे असें अनुमान काढणेंच जास्त सयुक्तिक वाटते.

लेखाचे शेवटी येथील हिंदी विद्यार्थिनींचे विचाराचे मासले देण्यांत तर सौ. देशपांडे यानी विपर्यासाची सीमाच गांठली आहे. हिंदुधर्मांत जन्मल्याची लाज वाटणारी, विलायतेत कायम राहण्याची इच्छा धरणारी अथवा स्वभाषा व चालीरीती विसरणारी एकही विद्यार्थिनी प्रस्तुत लेखकाच्या अथवा त्याच्या स्नेह्याच्या दोन वर्षांच्या वास्तव्यात आढळण्यांत आली नाही. वर्ण काळा असल्यास हिंदुस्थानात विवाहाच्या बाबतीत किती त्रास होतो ही जाणीव असल्यामुळें त्याना तेथे जेवढी चीड येते, त्यापेक्षां येथें खास जास्त येत नाही. येथील स्त्रीस्वातंत्र्याचा फायदा घेऊन पुरुषवर्गांत मनमोकळेपणानें हिंडण्या-फिरण्यास विद्यार्थिनींना सकोच वाटत नाहींसा होतो. एवढाच कदाचित् आक्षेप घेतां येईल. पण हे स्वातंत्र्य लाभदायक अथवा तोट्याचें आहे याविषयी मतभेदाला जागा आहे.

येथे येणारा प्रत्येक हिंदी विद्यार्थी सद्गुणाचा पुतळा असतो असें म्हणण्याचा माझा हेतु नाही. एकाद्याचे हातून मधून मधून चुका होतात, पैशाचा दुरुपयोग होतो हें खरें आहे. पण पडलेल्याला आणखी एक धोंडा मारणें सहानुभूतिनिदर्शक खास नाही. यूरोप हे आज साऱ्या जगांतील राजकारणाचें माहेरघर आहे. त्यामुळे इकडे येणाऱ्या विद्यार्थ्यांची संख्या आणखी कांहीं वर्षें तरी वाढती राहणार याविषयी शंका नाही. येथील राजनीति, समाजसंस्था, वगैरेंचें अवलोकन करून हिंदुस्थानांत परत गेल्यावर आपल्या अनभवाचा भरपूर फायदा देशबांधवांना देण्यांत किती विद्यार्थी तत्पर असतात याचा

विचार केला पाहिजे. हिंदुस्थानांत पदवीपर्यंतचें शिक्षण घेऊन नंतर एकदोन वर्षें प्रत्यक्ष संशोधन अथवा धंदा करावयाचा आणि मग येथें यावयाचें ही जी नवीन प्रथा रूढ होत आहे, तिचा परिणाम जास्त अनुभवी व विचारशील तरुण येथ येण्यांत होऊन खर्च झालेल्या पैशाचा फायदा हिंदुस्थानांत वाढत्या प्रमाणांत होत जाईल. स्वदेशास परत गेल्यावर चागल्या नोकरीची फारशी आशा नसतांना परदेशात येऊन विविध प्रकारचें प्रात्यक्षिक शिक्षण घेण्याची अहमहमिका हिंदी विद्यार्थ्यांत उत्पन्न झाली आहे ती स्वदेशाभिमानामुळेंच. या वृत्तीचा फायदा घ्यावयाचा असेल तर केवळ टीका करण्याचा प्रघात सोडून देऊन विद्यार्थ्यांच्या अडचणी समजावून घेणें व त्याचेकडे सहानुभूतीनें पाहणें या मार्गाचा अवलब केला पाहिजे. नाही तर जुन्या व नव्या पिढीतील तेढ कमी न होता वाढतच जाईल.

  

# इंग्लंडांत मुलांची काळजी

न्यू-कॅसल-अपॉन-टाईन (इंग्लंड)

## सप्टेंबर १९३६

आज रस्त्यांतून खेळणारी, फुलपांखराच्या बरोबर निष्काळजीपणानें बागडणारी मुले, कालांतराने आपल्या राष्ट्राचे आधारस्तंभ होणार, आणि म्हणूनच सुधारलेलें स्वतंत्र राष्ट्र त्याची काळजी कशी घेतें हें खालील उदाहरणांवरून कळून येईल.

एक दिवस मी हाइड पार्कमध्यें दुपारी तीनच्या सुमारास बसलें होतें. माझें लक्ष रस्त्यावरील पोलिसाकडे गेलें. ही वेळ मुलांना बागेमध्यें ढकलगाडीत घालून खेळविण्याची होती. त्यामुळे साहजिकच रस्त्यावर बायकामुलांची गर्दी होती. रस्ता ओलाडावयाच्या जवळपास दुरून जरी ढकल गाडी दिसली, तरी ती जाण्यास, प्रथम त्या बाजूची वाहतूक तो बंद करी. अशा किती तरी गाड्या गेल्या व तेवढ्या वेळां पहिल्यांदा ह्या गुबगुबीत बाळांना

पोलिस जाऊ देई. मी म्हटले, पहा, पोलिस देखील ह्यांची काळजी किती घेतो. मुले व स्त्रिया याची काळजी प्रथम हा त्याचा नियमच आहे मुळी.

## मुलांना दूध

दुसरी गोष्ट दुधाची. दूध हे राष्ट्राचे बलसंवर्धक अन्न म्हणून त्याची किती उत्तम व्यवस्था केलेली आहे. गायी सशक्त ठेवून, त्याचे दूध नीट तपासून, काहीही भेसळ न करता, अगदी ताजे मिळावे, महाग न व्हावे व प्रत्येक मुलाला दूध मिळावें, म्हणून, अशी उत्तम व्यवस्था 'मिल्क मार्केटिग बोर्ड' नावाची सस्था करीत आहे. आणि अशा तऱ्हेने उत्तम दुधाचा पुरवठा सर्व देशभर केलेला आहे. रस्त्यावर जागजागी पुष्कळ दूध प्या अशा जाहिराती भिंतीवरून लावलेल्या आहेत शाळेत सकाळी अकरा वाजता मुलांना दूध पाजण्यांत येते. ज्याना पैसे देणे शक्य आहे ती मुले दुधाबद्दल रोज अडीच पेनी देतात. गरीब मुलाना फुकट दूध देण्यात येते.

मुलाची शारीरिक तपासणी फुकट होते. किडके दात काढून घेणे, इतर रोग बरे करणे वगैरे गोष्टी दवाखान्यात फुकट होतात. आईबापाना परवडत असल्यास धर्मादाय पेटीत त्यानी पैसे टाकावे, शिवाय गरीब मुलां-करिता हॉलिडे–होम्स असतात. ज्याच्या आया कामाला जातात, अशांचीं मुले साभाळण्याची सोय धर्मादाय सस्था करीत असतात. असली एक सस्था लंडनच्या ईस्ट एंडमध्ये मिस् म्यूरिएल लिस्टर ह्यानी चालविली आहे; ती मीं पाहिली. सेट अॅड्र्यूज हॉस्पिटलमधील लहान मुलाचा वॉर्ड पाहिला. आजारी मुलांची किती उत्तम शुश्रूषा तेथे होते. ती सुदृढ व्हावीत म्हणून प्रत्येक जण कसा मनापासून प्रयत्न करीत असतो.

एका समुद्रकांठच्या गांवात, लहान मुलाकरितां 'डे नर्सरी' आहे. अशा गावी आईबाप सुटीकरिता येतात. त्याना जागजागी लहान मुले घेऊन जाणे त्रासाचे असते व मुलाचेही हाल होतात. म्हणून त्यांना सांभाळण्याकरितां वरील जागा केलेली आहे. एका तासाला दोन पेनी पडतात. तेथे त्यांची उत्तम व्यवस्था होते. रिपोर्टावरून असे दिसलें की, दर वर्षी चार ते पाच हजारापर्यंत मुले येथे येऊन जातात. अशी सोय असली म्हणजे लहान मुलाबाळाच्या आईला थोडें तरी स्वस्थ चित्तानें इकडे

तिकडे जाता येते. मुलाना वयाच्या चौदा वर्षेपर्यंत सक्तीचे फुकट शिक्षण दिलें जातें. शाळेपासून तीन मैल लांब राहणाऱ्या मुलांना कौंटी कौन्सिल शाळेंत व घरी फुकट पोहोचविते. आणि म्हणूनच सर्व राष्ट्र सुशिक्षित झालें आहे. ह्या शिक्षणाचा जागोजागी अनुभव येतो. प्रत्येक माणसाला शिक्षण हे अवश्य आहे. त्याशिवाय 'मुकी बिचारी कुणी हाका' अशी स्थिति होते. येथें थंडी असो वा पाऊस असो, मूल बाहेर फिरवून आणतातच. घरे लहान असल्यामुळे बिचारे मूल घरात कटाळते फिरवून आणण्याचे काम आई किंवा बाप, जो कामावर जात नसेल तो करतो (वरील सर्व गोष्टी बहुजन समाजाबद्दल आहेत.) येथे नोकर जवळजवळ कोणाकडे नसतातच स्वतःच सर्व काम करावे लागते

## मुलांकरितां संग्रहालयें

मुलाची मानसिक उन्नति व्हावी म्हणूनही राष्ट्राचे दीर्घोद्योग आहेत, ह्याची एकदोन उदाहरणे :—

लंडन येथे साऊथ केन्सिग्टनमध्ये, शास्त्रीय पदार्थविज्ञान सग्रहालय आहे. त्यांत मुलांना शास्त्रीय उपकरणाशी वाटेल तसे खेळू देतात. उपकरणाशी खेळताना एकाद्याची मोडतोड झाली तरी हरकत नाही, पण मुलांनी खेळावें, प्रश्न विचारावे व आपल्या ज्ञानात भर घालावी.

इंद्रधनुष्य कसे होते, सूर्य व चंद्रग्रहणे कशी होतात, पहिल्या काळी लोक वेळ कसा समजत असत, वगैरेसंबधी सर्व तऱ्हेच्या यत्राचे हुबेहूब नमुने तेथे ठेविले आहेत. एका जागी पहिल्यानें मनुष्य रानटी होता, अगांत वस्त्र न घालतां प्रत्येक वस्तु पाठीवर, खाद्यावर घेऊन जात असे, मग हळूहळू एक एक कल्पना आली आणि मग गाडी, घोडा, सायकली, मोटार व आतां तर काय विमाने देखील निघाली. ह्या सर्व गोष्टीचे हुबेहूब नमुने किती सुंदर तऱ्हेनें मांडले आहेत.

अगदी पहिली जहाजे, आगगाड्या, मोटारी व विमानें वगैरे अगदी हल्लींची साधनें हीही ठेविली आहेत.

प्राचीन काळी ह्याचे पूर्वज मोठ्या अफाट सागरांतून, लहानग्या

जहाजांतून परदेशी गेले, आणि त्यामुळेच अचाट साम्राज्यपद त्यांनी मिळविले. त्याच शुभशकुनाच्या जहाजाचे मोठमोठे फोटो तेथे टांगले आहेत

वाफेची इंजिने, विजेच्या आगगाड्या, यांत्रिक युगांतील अलीकडचें आश्चर्य म्हणजे अमेरिकेस जाण्याचे 'क्वीन मेरी' जहाज, ह्याचेही तऱ्हतऱ्हेचे लहानमोठे नमुने ठेविले आहेत मुले ह्याची कळ फिरीव, त्या चाकाला हालीव, तर हे इंजिन चालीव अशी सारखी गडबड करताना पाहून मजा वाटे. ही साधने ज्यानी हजारो रुपये खर्चून ठेविली त्याच्या दूरदृष्टीचे कौतुक वाटले. बाळपणापासून अशी संधि मिळाली तर पुष्कळ सर जगदीश व सी. व्ही. रामन् आपल्या देशात का नाही निपजणार? तसेच ग्लासगो येथील पदार्थविज्ञान सग्रहालयात पण आहे. ग्लासगो जहाजे बांधण्याकरिता प्रसिद्ध आहे. तेव्हा आरभी जहाजे कशी होती? नतर सुधारणा कशा होत गेल्या? अमेरिका, कॅनडा, हिदुस्थान ह्या देशात ती कशी पुरविली जातात? ह्याचे ढळढळीत वर्णन जणू सुवर्णाक्षरात येथे कोरून ठेविले आहे. खरेच, हे सर्व पाहून मुलाची मने देशाभिमानाने उचबळून का नाही येणार?

आज तारीख १० सप्टेबर १९३६ रोजी न्यू-कॅसल-अपॉन-टाईन येथे टाईन नदीवर तीन (Destroyers) विनाशिका पूर्वेकडील भूमध्य समुद्रावर काम करून आल्या होत्या येथे त्या आणण्याचा मुख्य हेतु हा आहे की, सर्व लोकाना त्या बघावयाला मिळाव्या; व सरकार देशाच्या संरक्षणासाठी काय काय करते, ते लोकानी पाहावे. जिब्राल्टर येथे अशा बोटी दिसल्या पण त्या आपल्याला कोण दाखवितो? तेव्हां आम्हांस आज साहजिकच हा बघण्याचा योग आला ह्या बघण्यास मुलाची खप गर्दी झाली होती. तीं वाटेल तेथे जात, यंत्राना हात लावीत व अधिकाऱ्यांना प्रश्न विचारून भंडावून सोडीत. अधिकारीही शातपणाने त्याच्या प्रश्नाची उत्तरे देत. ह्याच मुलांतून कालांतराने एकादा मोठा ॲडमिरल व्हावयाचा, एकादा नेल्सन व्हावयाचा. उलट पक्षी या शास्त्रीय विचारास समर्पक उत्तर न मिळाल्यास हा लहानसा कोंब जागच्या जागी खुरटून जावयाचा!

ह्या विनाशिका त्याजवरील अधिकारी ह्यांचें स्वागत येथील लॉर्ड मेयॉरनें फार उत्साहानें केलें. बोटी टाईन नदीवर आल्याबरोबर दुदुभि-नाद झाला. खुद्द लॉर्ड मेयॉरना लंडनला महत्त्वाचें काम असल्यामुळें, डेप्युटी

लॉर्ड मेयॉर ह्या विनाशिका पाहण्यास गेले. एकशेचाळीस अधिकारी व खलाशी ह्यांना मेयॉरने मोठी चहापार्टी दिली. शहरातील सर्व सिनेमा-नाटके ह्याना फुकट पाहण्याची व ट्रॅम, बसेस, सार्वजनिक आघोळीच्या जागा, क्लब व मेसमध्ये फुकट राहण्याची परवानगी देण्यांत आली होती.

खलाशाचे आयुष्य नेहमी समुद्रावर जावयाचे. तेव्हां ह्या लढाऊ जहाजांच्या लोकाना शहरात आल्यावर कशा सवलती मिळतात हे राज्य-कर्त्यांच्या देशातच पाहण्याची मौज आहे. म्हणतात ना, 'राजा बोले व दळ हाले.' ही ह्याची गोष्ट झाली. आपले काय असा विचार मनांत येतो साधे दूध तरी आमच्या मुलाना कसदार मिळते काय ? स्वस्त दूध मिळण्या-कडे सर्वांचा ओढा. बिचाऱ्या गवळ्याला हे परवडते किवा नाही ह्याचा कोणी सहृदयतेने विचार करतो काय ? दुधाचा प्रश्न सुटावयाचा असल्यास म्युनिसिपालिटीनेच हे कार्य अगावर घेतले पाहिजे. म्युनिसिपल शाळातून सर्व मुलाना पावशेर दूध पाजले पाहिजे आणि म्युनिसिपालिटीने मनावर घेतले तर ह्या गोष्टीस फारसा वेळ लागणार नाही. महिलाच्या सर्व सस्था-तूनही ह्या गोष्टीचा अवश्य विचार व्हावा. चागल्या गोष्टीला आरभ प्रथम थोडया प्रमाणातच होतो. पण तोच पुढे जगभर पसरतो.

  

# आंतरराष्ट्रीय स्त्रीसंघ परिषद

## झुरिक—ऑक्टोबर १९३६

### परिषदेस प्रयाण

लंडनहून ९० बायका व्हिक्टोरिया स्टेशनवरून परिषदेस जाण्यास निघाल्या. ही परिषदेची सफर Hickie, Tourist Office for Yugo-slavia, 25, Cockspur Street, London ह्या कंपनीनें काढली होती. लंडन येथून २३ सप्टेंबरला निघण्यापासून ते परत लंडनला ११ ऑक्टोबरला

पोहोंचेपर्यंत, कंपनीचा एक विश्वासू गृहस्थ आमच्याबरोबर होता. त्यामुळे कांहींच काळजी नव्हती. ह्याबद्दल लागणारे ३५ पौंड आगाऊ भरले होते. ह्यांत हॉटेलची, बोटीची, आगगाडीची व जेवणाखाण्याची सर्व व्यवस्था व त्या खर्चाचा समावेश होई. सभेच्या जागी व सर्व मोठमोठ्या समारंभास मोटारीतून नेणें-आणणे वगैरे सर्व सुयत्र होई. सर्व जागी कंपनीने अतिशय उत्तम व्यवस्था केली होती. प्रत्येकीजवळ अमक्या वेळेस, अमक्या गांवी उतरणे, अमक्या हॉटेलमध्ये जाणे वगैरे सर्व माहिती छापून कागद दिले होते. लंडनमधील व्हिक्टोरिया स्टेशनवर आगगाडीचे डब्यावर International Council of Women Conference ची लेबलें फडकत होती. प्रत्येकाचा नंबर, बसण्याच्या जागी होता. तशीच सर्व उत्तम सोय Karl Alexander ह्या जहाजावर पण होती

आमचा मार्ग, डोव्हर, कॅले, फरान्स, स्वित्झर्लंड, इटली व नंतर ॲड्रियाटिक समुद्रातून होता मध्ये व्हेनिसला एक दिवस राहून सर्व महत्त्वाची ठिकाणे दाखविली आणि नंतर ॲड्रियाटिक समुद्रातून बोटीने Dubrovnick (युगोस्लाव्हिया) पर्यंत प्रवास झाला. जागोजागी बंदरावरून आणखी सभासद बोटीवर चढत. एवढें प्रचंड जहाज परिषदेच्या सभासदांनी अगदी फुलून गेले. सगळ्यांत ग्रेट ब्रिटनच्याच सभासदाची संख्या (९०) जास्त होती. झेकोस्लोव्हाकियानांचेही प्रमाण बरेंच होते. त्याचीही अशीच मोठी पार्टी मिळून आली होती.

आफ्रिका, पोलंड, फिनलंड, लाटव्हिया, अमेरिका, पेरु, न्यू झीलंड वगैरे जगाच्या सर्व भागांतून स्त्रिया आल्या होत्या.

आमच्या ग्रेट ब्रिटनच्या पार्टीतील थोड्याशा बायका अविवाहित, तर बऱ्याचशा विवाहित व ज्यानी लढाईमध्ये आपला पति किंवा मुलगा देशा-करितां बलिदान दिला आहे, अशा थोरामोठ्याच्या बायका होत्या. ४-५ वर्षे, सतत पुष्कळ जणीनीं शिपायांची शुश्रूषा किंवा स्वयंपाक, शिवण, वगैरे हरतऱ्हेचीं कष्टाची कामे लढाईच्या वेळी केलेली आहेत. समाजसेवेस आरंभ लढाईच्या निमित्तानें झाला. आणि खरें पाहिलें तर दुःखी जिवाला समाजसेवेपरतें विरंगुळा पाडणारें आणखी दुसरें चांगले काम कोणतें?

Victorian Delegation Lead the Younger Generation

अशा ढोबळ अक्षरांत इंग्लिश वृत्तपत्रांनी त्यांची स्तुति केली होती. ह्या जुन्या पिढीतील इंग्लिश बायका स्तुतीस योग्यच आहेत. एक तर बोलण्या-वरून, त्यांचें वैवाहिक जीवन सुखी दिसले. फारसे घटस्फोट ऐकले नाहीत. मुलांबाळाचें नीट संगोपन करून, घरकाम करून त्यानी लढाईत अत्यंत मदत केली.

शिवाय इतक्या वयानतर त्यांची तरतरी दाडगी. सकाळी ९ ला सभेस जाण्यापूर्वी रोज समुद्रावर पोहणे, व सभेनतर देखाव्याचे फोटो घेणें. त्याना इतर राष्ट्राची राजकारणे, सामाजिक स्थिति वगैरेची माहिती खूप असे.

त्याचप्रमाणे झेकोस्लोव्हाकियाच्या बायका पण चागल्याच हुषार वाटल्या. हिदुस्थानबद्दल तर त्याना अत्यत आस्था व सहानुभूति; गांधीजी, टागोर व ताजमहाल हे तर सर्वतोमुखी असत.

खरे पाहिले तर बहुतेक सभासद स्त्रिया एकीपेक्षां एक वरचढ शिकलेल्या व समाजकार्य नेटाने करणाऱ्या अशाच होत्या.

## कांहीं बायकांची लायकी व शिक्षण

**कुमारी ॲनी ख्रिस्तिच**:—ग्रेट ब्रिटन, डेली एक्स्प्रेसच्या १० वर्षे संपादक, बेल्जम व बाल्कनमध्ये युद्धाच्या बातमीदार, हल्ली बहुतेक प्रमुख वृत्तपत्रांच्या बातमीदार. अमेरिकेत व ग्रेट ब्रिटनमध्ये खूप व्याख्यानें दिली. ह्या बहुतेक विमानानें प्रवास करतात, इतकी त्याना कामे असतात.

**फ्रोकन् फॅनी उल्फबेक**:—डेन्मार्क. Government Technical Adviser to the International Labour Conference at Geneva in 1926.

Member of the Board of the Danish Committee against the Traffic in Women & Children.

**कुमारी विनिफ्रेड् क्रिड्**:—कॅनडा. Convener of International Council of Women's Education Committee, Migration Committee. Dean of Women's College at Queens University, King's Town. Member of the Canadian Government Delegation to the Disarmament Conference, 1932.

२६ तारखेस रात्री ८ वाजता बोट डुबरव्हनिक येथें पोहोंचली. स्वागतार्थ युगोस्लाव्हियाच्या राष्ट्रीय पोषाखात बायकांचा मेळा सज्ज होता. सर्वांच्या तोंडावर स्मित झळकत होतें. गोऱ्यापान रंगीबेरंगी पोषाखांतील मुली फारच रमणीय दिसल्या. अध्यक्ष लेडी अॅबरडिन यांना हारतुरे अर्पण केल्यावर भराभर मोटारी आपापल्या नियोजित स्थळी गेल्या.

## यूगोस्लाव्हियाची साधारण माहिती

सर्बिया, बॉसनिया, हर्टझगोनिया असे भाग मिळन यूगोस्लाव्हिया हें नांव नुकतेच पडले आहे. हाही देश पारतंत्र्याच्या शृखलेंतून व मोठमोठ्या गंडांतरांतून गेलेला आहे. रोमन्, हगेरियन् व टर्क्सचें ह्यांवर बरीच वर्षे राज्य होते. आताच कोठें ह्याला स्वातंत्र्य लाभलें आहे. तरी पण देशांत नवी विटी व नवें राज्य असल्यामुळे तितकी शांतता लाभलेली नाही. हल्लीचा राजा पीटर हा १४–१५ वर्षांचा आहे. त्याचे वडील अलेक्झांडर फरान्समध्यें असतांना दोन वर्षांपूर्वी कोणी अत्याचाऱ्याने त्यांचा खून केला. पीटर इंग्लंड-मध्यें शिकत होता. त्याला आणून राजा केले. राज्यकारभार त्याचा काका पॉल हा बघतो.

बेलग्रेड ही राजधानी व डुबरव्हनिक हे मोठे व्यापारी बदर आहे. येथील सृष्टिसौदर्य, मोठमोठे डोगर व अॅड्रियाटिक समुद्र ह्यामुळें फारच खूलून दिसतें. शिवाय द्राक्षांचे वेल, हिरवीगार झाडो, फळे, भाजीपाल्याची शेतें यांनी रमणीयता आली आहे.

तुर्कांचें राज्य झाल्यामुळें, लोकांमध्ये मुसलमानी राहणी व रूपे दिसतात; पण बहुतेक लोक इंग्रजाप्रमाणें राहतात. बायका तर प्रति-मडमाच बनल्या आहेत. अंगलट निराळी म्हणजे इग्लिश पोषाखाला न शोभणारी व रंग तितका गोरा नसल्यामुळें इंग्रजी पेहराव चमत्कारिक दिसतो.

खाणेंपिणें थोडे पौर्वात्य व थोडें पाश्चिमात्य आहे. बायका मोकळे-पणानें हिंडतात. सुदृढ पण आहेत. सर्वांना सहावीपर्यंत सक्तीचें शिक्षण आहे. धर्म ख्रिश्चन. Orthodox Churches आहेत. येथें सतरंज्या व गालिचे उत्तम करतात. शेतकरी बायकांकडून ही कामें करवून घेण्याच्या संस्था आहेत. शिवाय कशिदा पण अतिशय उत्तम काढतात.

## रमणीय पार्श्वभूमिका

यूगोस्लाव्हिया हे उत्तम हवेचें व सूर्यप्रकाशाचें ठिकाण आहे. तेव्हां सुटीनिमित्त लोकांनी येथे यावे, व त्यामुळे लोकांना काम मिळून पोटापाण्याची सोय व्हावी, असा लोकांचा हेतु आहे, म्हणून इग्लडचा राजा पण मध्यंतरी येथे येऊन गेला. त्यामुळे ह्या गोष्टीस बरीच चालना मिळाली. ही सभा ह्या गावी बोलावण्याचा देखील हाच हेतु आहे. आणि म्हणूनच मोठमोठी हॉटेल्स सर्व आधुनिक सुखसोयींनी युक्त अशी बाधली जात आहेत. समुद्रावर पोहण्याचे Lido, नाच, टेनिस व हजारो करमणुकीचे प्रकार येथें आहेत. समुद्र, डोगर आणि सूर्यप्रकाश अहमहमिकेने सृष्टिसौदर्य वाढवीत आहेत, अशीच रमणीय जागा परिषदेस शोधली. महिलाच्या काव्यमय जीवनास रमणीयच देखावा हवा; नाही तर बायकाची परिषद कसली ?

**International Council of Women**:—अमेरिकन बायकांनी हें ४८ वर्षांपूर्वी शिकागो येथे स्थापन केले. देशादेशांतील बायकांमध्यें प्रेमभाव वाढावा व इतर देशांतील स्त्रिया काय काय देशसेवेची कामे करतात हें एकमेकीना कळावे असा हेतु आहे. शिकागोच्या पहिल्या परिषदेपासून आतापर्यंत लेडी ॲबरडीन ह्याच सतत अध्यक्ष होत्या. हिंदुस्थानांत कलकत्ता येथें मुख्य कचेरी व मुबई, पाटणा येथेंही त्याच्या शाखा आहेत. बहुतेक सभासद राण्या, महाराण्या व मोठमोठ्याच्या बायका आहेत. राजकीय चळवळीशी ह्या सस्थाचा मुळीच संबंध नाही. ह्याप्रमाणे जगातील ४० देशांत, ४०,०००,००० इतक्या स्त्रियाकरिता ही कौन्सिले आहेत.

## परिषदेचा उद्‌घाटनसमारंभ

डुबरव्हनिक येथील थिएटरमध्यें ह्या परिषदेचा उदघाटनसमारंभ मोठ्या थाटांत साजरा झाला. थिएटरबाहेरील बऱ्याच दूरवर मोठमोठ्या इमारती व हॉटेल्सवर यूगोस्लाव्हियाची निशाणें फडकत होती. खिडक्यांतून, रस्त्यांतून माणसांची खूप गर्दी होती. प्रत्येक जण कौतुकानें जगांतील ह्या देशसेवा करणाऱ्या महिलांचें स्वागत करीत होता. ह्या गांवांत पाय ठेवल्यापासून वरुण राजानें अगदी मनावर घेतलें होतें. रात्रंदिवस पाऊस

पडून विजांचा कडकडाट होत होता. त्याला देखील स्त्रीच्या मार्गांत अडचणी आणून मजाच पाहावयाची होती, व बिचारी स्त्री अडचणीतून धीराने कसें ध्येय गाठते हे पाहावयाचें होते.

आणि आज हा रमणीय प्रसग स्त्रीच्या पराक्रमाचेच द्योतक नाही काय? थिएटरच्या दरवाजात यूगोस्लाव्हियाच्या राष्ट्रीय, १०० वर्षांच्या जुन्या, पोषाखात गोऱ्यापान गुलाबी गालाच्या बऱ्याचशा महिला स्वागतार्थ उभ्या होत्या. त्यानतर बसण्याच्या जागेपर्यंत राष्ट्रीय पोषाखातच स्वयसेवक व सेविका उभ्या होत्या. थिएटर वर्तुलाकार व जुन्या पद्धतीचे केलेले होते. दुसऱ्या मजल्यावर लहान लहान Boxes होत्या. त्यातून जागजागच्या स्त्रिया, प्रेक्षक व सभासद ह्या नात्याने बसल्या होत्या. आणि त्या सर्व मोगल दरबारातील राण्याप्रमाणे दिसल्या. खालील सिहासनासमोरील भागात सर्व स्त्रीप्रतिनिधि होत्या. पहिल्या ओळीत गावचे मोठमोठे अधिकारी, धर्मोपदेशक वगैरे बडी मंडळी होती. सिहासनावर International Council of Womenच्या अध्यक्ष लेडी ॲबरडीन, डेम एलिझबेथ कॅडबरी, Representative of the Yugoslav Govt., Mayor, President of the Municipality, War Minister व सर्व देशाच्या प्रतिनिधींच्या मुख्य स्त्रिया बसल्या होत्या.

आपल्या डॉक्टर काशीबाई नवरगे (मुबई येथील सुप्रसिद्ध डॉक्टर) त्यांच्याचमध्ये बसल्या होत्या. ४० वर्षांमागे स्त्रीशिक्षण किती कठिण काम होते, पण त्यातून नांव मिळवून जगातील सर्व प्रमुख बायकामध्ये बसण्याचा मान त्याना मिळाला व अशा तऱ्हेने हिदुस्थानचे नाव काशीताईंनी राखले ही मोठी अभिमानाचीच गोष्ट आहे

सिहासनाच्या मागील भितीवर हल्लीचा राजा व राजमाता मेरी ह्यांचे फोटो होते. मध्यभागी National Association of Yugoslavia ह्या नावाची सुदर पाटी, व तीवर पिवळ्या व जांभळ्या राष्ट्रीय रंगांत यूगोस्लाव्हियाचा नकाशा लटकत होता.

सर्व थिएटर हिरव्याचार पानानी, चित्रविचित्र रगाच्या निशाणांनी व चमकणाऱ्या विद्युद्दीपानी शोभायमान दिसत होते. तऱ्हतऱ्हेचे पोषाख, अलंकारभूषणें, शृंगार ह्यांनी युवतिजन भान हरून टाकीत होता. प्रत्येक जण हंसतमुख व एकमेकींशी बोलण्यांत अगदी गढून गेल्या होत्या.

सिंहासनासमोरच्या पहिल्या मजल्यावर राजांच्या बसण्याच्या जागेंत यूगोस्लाव्हियाच्या राणीतर्फे Lady-in-waiting सभेंत शुभ संदेश देण्यास बसल्या होत्या व जवळच मोठमोठे अधिकारी होते. सभेच्या अध्यक्ष लेडी ॲबरडीन ह्या कॅनडा व आयर्लंडचे माजी व्हाइसरॉय ह्याच्या पत्नी व स्कॉटलंडमधील ॲबरडीनच्या जहागिरदारीणबाई ८० वर्षाच्या आहेत. त्यांची प्रकृति फारच सुदर आहे. एवढे वय झालें असतांनाही त्याची अजून काम करण्याची हौस, तो शात हसतमुख चेहरा पाहून त्याचे कौतुक वाटतें. त्या खरोखरच आम्हा तरुण पिढीला आदर्श नाहीत काय? राजाला लाजविण्यासारखें त्यांचे वैभव, पण त्याच्या देशसेवा करण्यानें तें जास्तच खुलून दिसते. त्या आल्याबरोबर टाळयाच्या गजरांत सर्वांनीं उभें राहून त्याचे स्वागत केलें.

व्हिक्टोरिया राणीचीच हुबेहूब प्रतिमा आहे, असें त्यांना पाहून कित्येक जणी म्हणाल्या नंतर Yugoslav च्या नॅशनल कौन्सिलच्या अध्यक्षीणबाईनी सर्व मुख्य प्रतिनिधीची नावे घेऊन स्वागत केलें व थोडे भाषण केलें. नतर Representative of Yugoslav Government ह्याचें मोठें स्फूर्तिदायक ाषण झाले. त्याना सारख्या टाळया पडत होत्या. वरील दोनही भाषणें युगोस्लाव्ह भाषेतच झाली.

## राष्ट्रसंघाची आई

त्यानंतर लेडी ॲबरडीनचें भाषण झाले; त्याचा सारांश असा:—

"तुम्हीं माझें प्रेमानें स्वागत केले तें पाहून माझे अंतःकरण गहिंवरून आलें आहे. आणि माझ्या सर्व भगिनीच्या वतीनें मी आपले आभार मानतें, हल्लींच्या बिकट परिस्थितीत आपण येथे विचारविनिमय करून जगांतील सर्व राष्ट्रांमध्यें एकमेकांबद्दल प्रेमभाव जोडण्यासाठी येथें जमलों आहोंत. आमच्या कौन्सिलचें ध्येय "Do unto others as ye wish they should do unto you" आणि खरें पाहिलें तर हेंच सर्व राष्ट्रांच्या धर्मांचें ध्येय आहे. असें असतांना प्रत्येक राष्ट्र आपमतलबी झालें आहे. लढाईकरितां कित्येक जण हपापलेले आहेत. जगांत शांतता नांदावी, मुलाबाळांना लढाईचे दारुण प्रसंग नकोत असे आमचे प्रयत्न आहेत. राष्ट्रा-

राष्ट्रात तर द्वेषभाव व एकमेकांच्या सूडाची भावना आहेच; पण गृहसौख्य व त्यांतील एकमेकांचे प्रेमाचे धागे तुटत चालले आहेत. धर्म लयाला चालला आहे. जगातील मनुष्यप्राण्यांचें सुख न पाहतां जो तो आपापले पाहतो. जनरल स्मटस् म्हणतात की, "प्रत्येकाला व्यक्ति, विचार, सदसद्विकेकबुद्धि व देश यांचें स्वातंत्र्य पाहिजे. तें मिळाल्याशिवाय शातता, समाधान व सुख मिळण्याची आशाच नको."

"आमचे कौन्सिल राष्ट्रसंघाची आई आहे. राष्ट्रसंघाकडे सर्व जण नाके मुरडीत आहेत तेव्हा, राष्ट्रसंघास ह्या घटकेस आपण अत्यत मदत केली पाहिजे आणि ह्या शातताप्रस्थापनेच्या कामास सर्व स्त्रियानी अहमहमिकेने पुढे झाले पाहिजे."

नंतर युगोस्लाव्हच्या Representative of Government ह्यांनी देशसेवा करणाऱ्या चौघी-पांच जणीना पदकें दिलीं. Dame एलिझबेथ कॅडबरी ह्याना पण दिलें. ह्या बर्मिंगहॅम येथील कॅडबरी चॉकोलेट फॅक्टरी-च्या चालकांच्या पत्नी आहेत. त्यांचेही वय ८० आहे. गेल्या वर्षी (१९३५) मध्यें त्या कलकत्त्यास परिषदेस आल्या होत्या. शांतताप्रस्थापनेच्या कामांत त्या अतिशय मदत करतात. Dame ही पदवी त्यांच्या स्वतःच्या कर्तबगारीचे द्योतक आहे. अशा तऱ्हेनें अत्यंत रमणीय व संस्मरणीय असा हा समारंभ संपला

## सभेच्या कामास सुरुवात

जागतिक सभामध्ये भाषेची मोठीच अडचण असे. त्याकरितां दोन दुभाष्या असत. जर्मन, फरेंच, यूगोस्लाव्ह व इंग्लिश, अशा चार भाषा लागत. ठराव मांडणे, त्यानंतर चर्चा व भाषांतर ह्यामुळें फारच वेळ जाई, तरी पण त्या मानानें बरेच लवकर काम झालें.

## बहुमतानें झालेले ठराव

**ग्रेट ब्रिटन** :—ज्या देशांत स्कूल लीव्हिंगचें वय चौदा व जेथें चौदापेक्षा जास्त आहे तेथें तें कमीत कमी आणखी एक वर्षानें तरी वाढवावें. (बहुतेक

सर्व देशांत १४ वर्षांचे मूल होईपर्यंत प्रत्येकाला सक्तीचे शिक्षण आहे. तें पंधरा वर्षापर्यंत द्यावे.)

**स्वीडन** :—विश्वबंधुत्व होण्याकरिता शाळेतील शिक्षणात सुधारणा पाहिजे. इतिहास, भूगोल व Civics ह्या पुस्तकांत बदल करावयास पाहिजे. उदाहरणार्थ शिवाजी—चोर लुटारू होता, हिंदुस्थानांत पुरुष बायकाना सती जाणे भाग पाडीत, (हें खरे का असा प्रश्न मला एका पुरुषाने मी स्विट्झर्लंडमध्ये सरोवराकाठी बसले असता मुद्दाम विचारला.) अमेरिकेत रेड इंडियन्सना Lynch करतात, किंवा ॲबिसीनिया रानटी आहे म्हणूनच सुधारणा करण्याकरिता इटालीने घेतला; अशा तऱ्हेचा इतिहास—भूगोल ह्या देशाची नालस्ती करणारा आहे, तेव्हा त्यात अवश्य बदल व्हावा.

**हिंदुस्थान** .—सौ. सरोजिनी देशपांडे—देशाची व्यर्थ नालस्ती करणाऱ्या व सामाजिक गोष्टीची निंदा करणाऱ्या चित्रपटावर नियंत्रण असावे, कारण त्यामुळे देशादेशात मत्सरभाव वाढतो. एकमेकाबद्दल उगीचच वाईट मते बनतात व ह्यामुळे विश्वबंधुत्वात व्यत्यय येतो. तेव्हा अशा चित्रपटांचा ही सभा निषेध करते.

**बेल्जम** :—ज्या देशांत बायकाना मतदानाचा हक्क आहे, तेथे पार्लमेंट, कौन्सिल, किंवा म्युनिसिपालिटी ह्यामध्ये बायका जास्त निवडून याव्यात असा मत देणाऱ्या बायकाकडून जास्त प्रयत्न होण्याची खटपट करावी. आणि ज्या देशात मतदानाचा हक्क नाही तेथे ह्या गोष्टीबद्दल लोकप्रतिनिधीमध्ये जागृति उत्पन्न करावी अशी इंटरनॅशनल कौन्सिलची नॅशनल कौन्सिलला विनंति आहे

## नैतिक प्रश्न

नैतिक बंधने स्त्री-पुरुषाना सारखी पाहिजेत. एकादे दुष्कृत्य केल्यावर पुरुष लोकांच्या तीव्र टीकास्त्रांतून सुटून जातो. तो उजळ माथ्यानें लग्नास उभा राहतो, बायको मात्र सद्वर्तनाची पाहिजे असा हट्ट असतो. आणि जर कां एकाद्या बाईचें चुकून वाकडे पाऊल पडले, तर ती वाळीत टाकली जाते, जगांत तोंड दाखवायला तिला जागा रहात नाही. मग लग्नाची व चांगला पति मिळविण्याची तिनें गोष्टच काढू नये. इतक्या तुच्छतेने समाज तिच्याकडे

पाहतो. स्त्रीवरच एवढा समाजाचा रोष कां? पुरुषाला तो नियम कां लागू नसावा? स्त्री-पुरुषाला नैतिक बंधने सारखीच असावीत.

स्त्रिया व मुले ह्याच्या अनैतिक व्यापारास बदी व्हावी म्हणून राष्ट्रसंघ खटपट करीत आहे. राष्ट्रसंघास ही सभा असे कळविते की, "अशा वाईट चालीच्या बायकामुलाना जशी शिक्षा होते, तशीच हा व्यापार करणाऱ्यांना प्रथम झाली पाहिजे. अशा अमानुष मार्गाने जे लोक पैसा मिळवितात त्यांचा ही सभा निषेध करते. ह्या व्यापाराची पूर्ण बंदी व्हावी"

पुष्कळ देशात वेश्याव्यवसाय बद करणे शक्य नाही असे वाटते, व तो एक धंदाच समजला जातो; व समाजांत रोग पसरू नये म्हणून वेश्याना डॉक्टरी तपासणीनंतर त्या धद्यास योग्य आहेत असे सर्टिफिकेट, परवाना मिळतो. तेव्हां ही परवान्याची पद्धतच बद व्हावी. कारण ह्यामुळे वेश्याव्यवसायाचे निर्मूलन न होतां त्यास उत्तेजनच मिळतें. वेश्यागमन हे समाजास अत्यंत घातुक आहे. स्त्री-पुरुषाना नैतिक बंधने एवढ्याकरिताच सारखी पाहिजेत. कोणतेही काम करणाऱ्या बायकास पुरुषाइतकाच पगार व सर्व सवलती असाव्यात. ती बाई आहे, म्हणूनच केवळ पगारात फरक न व्हावा व्यापारात व इतर उद्योगधद्यात असलेल्या बायकाना आठवड्यातून १॥ दिवसाची विश्राति मिळावी. लहान वयाची मुले जी खाजगी दुकानातून, कारखान्यातून वगैरे कामावर असतात, त्यांना नोकरीच्या वेळातूनच थोडा वेळ शिकण्यास मिळावा, व त्याच्या शरीराची नीट काळजी घेतली जावी.

## बेकायदेशीर मुलें व आया यांची व्यवस्था

स्वीडनमध्ये आईला व मुलाला काही काळपर्यंतच, सरकार ७५ क्राऊन देतें. ग्रेट ब्रिटनमध्ये बापाचा पत्ता लावून, त्याच्याकडून पैसे घेऊन मुलांचें पालनपोषण करतात. असल्या पापी माणसाकडून पैसे घेऊन कुमारिकेची प्रसूति होते, व त्याबद्दलचा खर्च संस्था देते. ग्रेट ब्रिटनमध्ये कुमारी आयांचें वय १६।१८ पासून १४।१५ हे झालें आहे. इटालियन अध्यक्ष मॅडम रुबिला म्हणाल्या, ४५ वर्षें मी कुमारिकांतच काम करीत आहें. हजारों कुमारी अशा पतित आहेत. कुमारिकांच्या स्वैर वर्तनाला कसा आळा घालावा हेंच मला समजत नाहीं.

डेन मार्या ओजिल्व्ही (ग्रेट ब्रिटन) म्हणाल्या, आमच्या देशांत तरुण मुलें मोटारी घेऊन येतात, मुलीना गोड बोलून भुलथापा देऊन नेतात आणि मग लग्नाचें नाव नाही व अशी ही सतति निर्माण होते. (ग्रेट ब्रिटन व स्वित्झर्लंड मध्ये मुलांपेक्षां मुलींचे प्रमाण फारच जास्त आहे. तेव्हा मुलींना पति कोठून आणावयाचे हा मोठाच बिकट प्रश्न त्यांच्यापुढे आहे.)

## लुळ्या-पांगळ्या मुलांची व्यवस्था

**ग्रेट ब्रिटन–मिसेस फिन्स :**—आमच्या देशांत १,९५,००० मुले लुळी-पांगळी आहेत. १०० मुलें दर आठवड्यास मोटारीखाली चेगरतात. अशा-करिता बाथ वेसेक्स येथे हॉस्पिटल आहे. मुलांना स्वावलंबी बनवन त्यांचे नीरस जीवन सुखावह करतात. लग्न झालेल्या बायका, ज्या घरांतच राहून, पति व मुलाबाळाचे काम करतात त्याचा घरकाम हा धंदाच समजला जावा. त्यांच्याकरिता सक्तीचा विमा, म्हातारपणाकरितां पोटगी वगैरे व्यवस्था व्हावी. एकादी बायको दिवस रात्र काम करते, पण देवापुढे पैसा ठेवण्याची देखील सत्ता तिला नसते. दिलेल्या वस्त्राची व घातलेल्या अन्नाची ती मालकीण. तेव्हां हा परतंत्रपणा टळावा म्हणून ही सभा असा कायदाच करून घेणे योग्य समजते.

**हिंदुस्थान–सौ. सरोजिनी देशपांडे :**—Realising that only by International agreement and friendship can war be averted and civilisation saved, urge their respective Government, to uphold by every means in their power the Covenant of the League of Nations.

The International Council believes that the crisis must be utilised to create a New Peace settlement on foundations of an invigorated League of Nations into which all Nations are admitted on a basis of equal rights and responsibilities. The I. C. W. further believes that the settlement are :—The adjustment of National grievances economic and political–by pacific means, and

the development of the economic and other co-operative services of the League of Nations. The drastic reductions and limitations of Armaments, Collective action to prevent a breach of the common peace or a disregard of disarmament obligation and Restoration of the Sanctity of the treaties.

This conference expresses its opposition to air-raids and the massacre of innocent people of Spain. This conference fully supports the all faiths conference as it is anticipated that it will bring about peace in the world.

Equal Rights :—Great Britain :—seeing that no system of Government can permanently safeguard the interests of the whole community unless women are given a full share, in formulating and administering the laws of the country, the I. C. W. request all Governments to give effect to this.

ह्याप्रमाणें हल्लीच्या घटकेस जरूर असलेल्या विषयावर चर्चा झाली. शिवाय मोठ्या सार्वजनिक सभा झाल्या. एक दिवस 'शेतकरी बायका' हा विषय होता. अमेरिका, यूगोस्लाव्हिया, डेन्मार्क वगैरे देशातील प्रतिनिधि बोलल्या. हिंदुस्थानाबद्दल मला बोलायला सांगितले होतें. हिंदुस्थानी बाई बोलणार म्हणून साहजिकच सर्वांत कुतूहल उत्पन्न झाले होतें. हिंदुस्थानी बायका म्हणजे काय घरात कोंडून ठेवलेल्या, पुरुषांनी छळलेल्या, लवकर लग्न झालेल्या, खूप मुले असलेल्या, अशी पुष्कळ जणींची समजूत असे. अर्थात् ह्या त्यांच्या सर्व शंकाचें निरसन मी नेहमीं करीतच असे.

## हिंदुस्थानचें सत्यचित्र

भाषणाचा सारांश :—'आज मी तुमच्यापुढें हिंदुस्थानातर्फे उभी आहें आणि तो माझा हिंदुस्थान प्राचीन सर्व सुधारणांचें आगर म्हणून प्रसिद्ध

आहे. तुम्हापैकी पुष्कळांना ती सुर्वणभूमि म्हणून माहीत आहे; तर पुष्कळ जणीना सूर्यप्रकाश व उष्णता ह्याकरितां ज्ञात आहे. पण आज हिदुस्थान सुवर्णभूमि नसून तेथील ३५ कोटी लोकातून लाखो लोकांना घांसभर अन्न मिळण्याची भ्रात आहे. असो. माझ्या शेतकरीण बहिणीची मी आपल्याला माहिती सागणार आहे.

"आमची शेतकरीण म्हणजे उत्तम सात्त्विक स्त्रीचा नमुना आहे. सारा दिवसभर तऱ्हतऱ्हेची, घरातील मुलाबाळाची कामे करून, आपल्या पतीला ती शेतात मदत करते. शेतातील माल डोक्यावर वाहून नेऊन, बाजारात विकते. शहराना दूध, दही, लोण्याचा पुरवठा करते. आधुनिक यंत्रे व दूध काढण्याची पद्धत तिला माहीत नाही, तरी दुधाच्या व्यवहारांत तिची उत्तम स्वच्छता असते. शरीरप्रकृतीने अत्यत सुदृढ, शिक्षण नसल्या-मुळें अल्पसतोषी, धार्मिक व पापभीरु अशी असून आपापल्या परिस्थितीत ती मोठ्या आनदात असते. वडील माणसाची आज्ञा पाळणारी, पतीवर अनन्यभावानें प्रेम करणारी अशी आमची शेतकरीण असते. तिचें लग्न लहानपणी चागल्या सुदृढ मुलाबरोबर होते, पण ती मोठी झाल्याशिवाय पतिगृही जात नाही. शरीरप्रकृतीने बळकट असल्यामुळे प्रसूति सहजासहजी होते व मुले सशक्त असतात. तिला घड्याळ पाहता येत नाही; पण सर्व कामे ती वेळच्या वेळी करते. कोबड्याचे आरवणे व सूर्यप्रकाश हीच तिला वेळ दाखवीत असतात. आमचे महात्मा गाधीसारखे पुढारी व्याख्यान द्यावयाचे असल्यास, शेतकरणीचा घोळका व्याख्यानाच्या जागी धांव घेतो. सामाजिक चळवळीची त्याना थोडी थोडी जाणीव होत आहे. आतां आम्ही आमच्या शेतकरीण बायाना लिहावाचायला शिकवणार आहोत."

## हिंदुस्थानबद्दल अगत्य

एका रात्रीं डॉक्टर काशीबाई नवरंगे ह्यांचें 'गिरणींतील मजूर बायका' ह्या विषयावर व्याख्यान झाले. अशा तऱ्हेनें १२ दिवस सतत सभेचें काम झालें. हिदुस्थानाबद्दल सर्वांना कुतूहल व कौतुकही फार असे. वृत्तपत्रकारांना, मला मुलाखती द्याव्या लागत. 'हिदु-मुसलमान, अस्पृश्य, हिंदुस्थानी बायांची सद्यःस्थिति' ह्या विषयांवर मी वर्तमानपत्रांत लेख लिहून

दिले. यूगोस्लाव्हच्या व अमेरिकेच्या पत्रात ते छापले गेले. यूगोस्लाव्हियाच्या विद्यार्थ्यांचे पुढारी, बोटीवर माझी भेट घेण्यास आले, व अशीच सर्व माहिती मजकडून वर्तमानपत्राकरिता लिहून मागितली. 'हिंदुस्थानच्या आकांक्षां-बद्दल आमची पूर्ण सहानुभूति आहे' असा त्यानी मोठ्या कळवळ्याचा निरोप दिला. एकंदरीत हिंदुस्थानी बाईचे अत्यत अगत्य व कौतुक यूगोस्लाव्हियाच्या लोकानी केले, ते मी आयुष्यात कधी विसरावयाची नाही

सभासदाच्या करमणुकीकरिता एका रात्री (Concert), एक दिवस मोठ्या श्रीमान बाईकडे चहापार्टी, तर एक दिवस यूगोस्लाव्हियाच्या राणीकडे चहापार्टी होती. शेवटल्या रात्री यूगोस्लाव्ह गव्हर्मेंटची मेजवानी होती. यूगोस्लाव्ह शेतकरणीचा व शेतकऱ्याचा मोठा नयनमनोहर नाच होता. शिवाय इंग्लिश पद्धतीचा स्त्रीपुरुषाचा नाच झाला

आता हिंदुस्थानला ह्या परिषदेचा काय फायदा असा सहजच प्रश्न उद्भवतो. सध्यांच्या हिंदुस्थानच्या परिस्थितीत आम्हाला फारसा फायदा व्हावयाचा नाही. तरी पण इतर देशातील बायका समाजोन्नतीचे काय प्रयत्न करतात हे तर आम्हाला प्रत्यक्ष पाहावयास मिळाले. ज्याची काळजी त्याला. आपली आपणच उन्नति करून घ्यावयाची

  

# हॉलंड, जर्मनी इत्यादि देशांतील दृश्यें

## झूरिक : ऑक्टोबर १९३६

## भिन्न भिन्न देशांतील नार्णी

इंग्लंड सोडून यूरोपमधील इतर देशात प्रवासास जाणे हें बरेंच त्रासाचें व खर्चाचे आहे. हिंदुस्थानांतील पासपोर्ट जरी वरील सर्व देशांत जाण्याचा असला तरी कांही देशात जाण्याकरिता त्या त्या देशांतील 'फॉरिन् ऑफिस'-कडून पुनः परवानगी घ्यावी लागते. ह्याला Visas मिळविणे म्हणतात. व ह्याला प्रत्येकी २ ते ४ शिलिंग पडतात. हे Visas आपल्या पास-

पोर्टवर लिहून घ्यावयाचे असतात. लंडन सोडण्यापूर्वी पासपोर्ट ऑफिसमध्यें किंवा थॉमस कुक आणि सन्सकडे ह्याबद्दल सर्व माहिती मिळवून, त्यांना आपला पासपोर्ट दाखवून, आपणांस कोणकोणत्या देशात जावयाचे आहे हें सांगून Visas मिळवावे. असे न केल्यास प्रवासात निष्कारण त्रास व खर्च होईल व वेळ जाईल.

यूरोपमधील सर्व देशात निरनिराळे नाणे प्रचलित आहे. हॉलडमध्ये गिल्डर्स (८ ते १० गिल्डर्स = १ पौंड), जर्मनीमध्ये मार्क्स (१ पौंड = १२ ते २१ मार्क्स), स्वित्झर्लंडमध्ये स्विस फ्रॅंक (१ पौंड = २० फ्रॅंक्स), इटलीमध्यें लिरा (१०० ते ११० लिरा = १ पौंड), फ्रान्समध्ये फ्रॅंक्स (१ पौंड = १०० फ्रॅंक्स). एक देश सोडून दुसऱ्या देशांत गेल्याबरोबर एकदम नाणे बदलावें लागते. जर्मनीत पौंड बदलून घेतल्यास त्यास फक्त १२ मार्कच मिळतात. परंतु इंग्लंड सोडण्यापूर्वी परदेशीय मनुष्यास इंग्लंडमध्ये पौंडाला २१ रजिस्टर्ड मार्क्सप्रमाणें चेक मिळतात. अलीकडे हुंडणावळीचा भाव सारखा बदलत असतो. हल्ली तर फ्रान्स, स्वित्झर्लंड व हॉलंड यांनी सुवर्णचलन झुगारून दिल्यामुळे हुंडणावळ फारच हेलकावे खाते. तरी इंग्लंड सोडतांना हुंडणावळीच्या दराची चौकशी करून त्याची नोंद बरोबर ठेवावी. म्हणजे आपण फसतो की काय ते समजेल. जवळ कुक कंपनीचे किंवा इतर बॅंकेचे प्रवाशाचे ब्रिटिश चेक्स घ्यावेत. मात्र इंग्लंड सोडण्यापूर्वी जर्मन रजिस्टर्ड मार्क्स विकत घेण्यास विसरूं नये. रोजी ५० मार्क्सप्रमाणे फक्त तेथील खर्चाकरिता हे मिळू शकतात. ह्या मार्क्सतून तेथे कांही वस्तू विकत घ्यायच्या नाहीत, असा कडक नियम आहे. रजिस्टर्ड मार्क्स इंग्लंड सोडण्यापूर्वी न घेतल्यास पौंडामागे ८।१० मार्क्सचे नुकसान होतें. इतर देशांतील नाणे तो देश आल्यावर पौंडांचे चेक तोडून बदलून घ्यावे व त्या देशाच्या नाण्यात ते बदलावे. इतर देशांचें नाणे पुष्कळ जवळ बाळगल्यास परत इंग्लंडांत किंवा हिंदुस्थानात गेल्यावर बदलून घेण्यांत नुकसान होईल.

## पासपोर्ट व पैसे हातांत पाहिजेत

इंग्लंड सोडून समुद्र ओलांडून जमिनीवर पाय ठेवल्यापासून, आपला पासपोर्ट, सर्व पैसे, चेक वगैरे नेहमी आपल्याजवळ पाहिजेत. प्रत्येक राष्ट्राची

हद्द ओलांडताना पासपोर्ट, नाणे व आपल्याजवळील सामानाची पाहणी होते व काही देशांत पासपोर्टमध्ये पैशाची नोद होते. जर्मनीत तर पैसा व पासपोर्ट नेहमी खिशांत पाहिजे. एकदा निराळ्या देशात शिरल्यावर आपल्यास कोणी-ही त्रास देत नाही किंवा पासपोर्ट दाखवा म्हणून म्हणत नाही. वरील देशांत साधारण गरिबीने थर्डक्लास, स्वस्त हॉटेल व ट्रॅममधून किंवा बसमधून प्रवास करावयास रोजी प्रत्येकी १५ शिलिंग खर्च येतो. तरी रोजी साधारण एक पौंड ह्या हिशोबाने बरोबर स्टर्लिंग चेक्स घ्यावेत म्हणजे प्रवासांत पैसे संपले म्हणून त्रास होणार नाही. शिवाय प्रत्येक देशात कांहीं तरी आठवण म्हणून व नवीन दिसणाऱ्या वस्तू घेण्याची इच्छा होते. इंग्लंड सोडून यूरोप-मधील इतर देशात प्रवास करणे म्हणजे फक्त इंग्रजी येणाऱ्यास मोठीच अडचण भासते. त्यामुळे एकटे असल्यास प्रवास कंटाळवाणा वाटतो व देशांबद्दल आणि प्रेक्षणीय स्थळाबद्दल चांगली माहिती मिळत नाही. पास-पोर्ट, कस्टम, नाणे व भाषा ह्या गोष्टी सोडून प्रवास सुखकर होण्याच्या इतर सर्व सोयी चांगल्या आहेत. लोक चांगले आहेत. चोरी होण्याचा संभव नाही, किंवा फसवेगिरीचा संभवही नाही. मात्र प्रवाशास प्रथमतः ह्या गोष्टी माहीत नसल्यामुळे उगाच त्रास होतो.

## हॉलंडमधील कालवे व कारखाने

वरीलप्रमाणे सर्व व्यवस्था करून आम्ही लंडन सोडून, हॉलंडच्या किनाऱ्यावर पहाटे उतरलो, तो एकदम दृश्य निराळे. भाषा निराळी, लोक निराळे व सृष्टिसौंदर्य पण निराळेच. हॉलंड देश सपाट आहे व त्यांत जागोजाग आडवे व उभे मोठमोठाले कालवे आहेत. हे पुष्कळ शहरांमधून जातात. येथे जमीन सुपीक व शेती जास्त. वर लिहिलेले कालवे हे बागायतीकरिता नसून पावसाचें पडलेलें पाणी वाहून नेण्याकरितां केलेले आहेत. येथे पाऊस नेहमी व पुष्कळच पडतो. म्हणून कालवे रुंद व खोल करून त्यांचा उपयोग सामानाच्या वाहतुकीकडे केलेला आहे. त्यांमधून मोठमोठ्या होड्या व स्टीम लॉंचेस सारख्या जात येत असतात.

येथें गायी पुष्कळ व कोंबड्यांची खुराडीही पण पुष्कळ आहेत. त्यामुळें येथून बाहेर देशांत लोणी, क्रीम, चीज, अंडी ह्या वस्तू फार जातात. हॉलंड-

मधील चीज प्रसिद्ध आहे. देशांत कारखानेही पुष्कळ आहेत. जगप्रसिद्ध फिलिप्स कंपनीचा विजेच्या दिव्याचा व रेडिओ तयार करण्याचा कारखाना आइंड-ओव्हन येथें आहे, तो फारच मोठा व पाहण्यासारखा आहे. ह्या कारखान्यातून, जगांतील सर्व राष्ट्रात दिवे, रेडिओ सेट्स् वगैरे जात असतात. यंत्राने विजेचे कांचेचे दिवे (ग्लोब) फुकणे अतिशय भराभर होते. एका मिनिटात अशा यंत्रामुळे, हजारो दिवे तयार होत असतात. ही यंत्रे चाललेली पाहून मोटे कौतुक व अचबा वाटला. पूर्वी हे फुंकण्याचे काम माणसें करीत असत. आतां, एकच यंत्र १०० माणसांचे काम करते व मालाची किंमत उतरविते आणि ह्याचा परिणाम बेकाराची वाढ होणे असा होत आहे.

## बर्लिनचा देखावा

हॉलंडवरून आम्ही जर्मनीत गेलो. नुकत्याच झालेल्या ऑलिंपिक खेळामुळे ज्या शहराचे नाव सर्वतोमुखी झाले आहे, त्या बर्लिन शहरी आम्ही प्रथम उतरलो. प्रशस्त शहर, भव्य इमारती, मध्ये मोठमोठी उद्याने, कालवे व जिकडे तिकडे स्वच्छ रस्ते असे दृश्य येथे दृष्टीस पडले. बर्लिन हे जगातले चौथे मोठे शहर आहे. (न्यू यॉर्क, लंडन, टोकियो, बर्लिन असा अनुक्रम आहे) बर्लिनची लोकवस्ती ४० लक्ष आहे. जर्मन पार्लमेंट व त्यापुढे असलेला बिस्मार्कचा भव्य पुतळा मनात नाना तऱ्हेच्या कल्पना उभारतो. येथील विमानतळावरून जगातील सर्व राष्ट्रात विमाने जातात व येतात. हा तळ फारच भव्य व पाहण्यासारखा आहे, दरताशी एकाद्या मोठ्या स्टेशनावरून जितकी आगगाड्यांची रहदारी चालते, तितकी विमानाची रहदारी येथून चालते. बर्लिनभोवती कारखान्याचा प्रचंड गराडा आहे. आम्ही येथील A.E.G. व Siemens Schukert ह्याचे विजेची यंत्रसामग्री करण्याचे कारखाने पाहण्यास गेलो होतो. Siemens Schukert च्या कार-खान्यास Village नांव दिलेलें आहे. पण खरोखरच ते फार मोठें शहर आहे. त्याच्या बर्लिन येथील कारखान्यांत ६५,००० माणसें कामावर आहेत. कारखाना प्रचंड व त्यात होणाऱ्या वस्तु अवाढव्य आहेत. १,००,००० ते १,३३,००० अश्वशक्तीची वाफेची यंत्रें (Steam Turbines) येथे तयार होतात. तसेच लहान विजेच्या मोटारी आठवड्यास ३०,००० ह्या-

प्रमाणे तयार होत आहेत; कारखाने जोरात चालू आहेत व मालाची पैदास व उचल सारखी वाढत आहे. हल्ली इंग्लंडमध्ये काय किंवा यूरोपमध्ये काय कारखाने जोरांत चालू आहेत. हे कशाचे द्योतक आहे, ह्याची कल्पना करण्याचे काम मी वाचकावरच सोपविते.

## हिंदी विद्यार्थी

येथे आपले विद्यार्थी ३०-३५ आहेत. त्याचा कल सहसा पुढे नोकरी करण्याचा नसून परत आपल्या मायदेशात गेल्यावर काही तरी उद्योगधदा किंवा कारखाने काढावेत असा दिसतो. बर्लिनमध्ये चौकशीअती कळले की, तेथे पुण्याचे रा. जनार्दनपंत करदीकर, M.Sc., LL.B हे D Sc. करिता व विशेषत. फोटोग्राफी शिकण्याकरिता आले आहेत. हे कळल्याबरोबर त्या गृहस्थास आम्ही बोलाविले. याच्याबद्दल आमचा ग्रह फारच चागला झाला. तरूण, शिकलेले व साधारण पैसेवाले असून, ह्यानी विडीस किंवा दारूस हात लावलेला नाही. पूर्ण शाकाहारी असून रोज हाताने स्वयपाक करतात व नियमाने गीता वाचतात व नमस्कार घालतात. रा. करदीकर आमच्याबरोबर असतानाच आम्हांला तीन मराठी बोलणारे तरुण विद्यार्थी भेटले व त्यास आम्ही, आपण बर्लिनमध्ये काय काय पाहिले म्हणून विचारता खालील उत्तर मिळाले .—We have not seen much of Berlin except its night life ! ! ! बर्लिनमधील आमच्या मुक्कामात आमची कामे सपल्यावर सध्याकाळी ५ ते रात्री १० वाजेपर्यंत रोज रा. करंदीकर व आम्ही नाना विषयांवर बोलत असू. त्यावरून त्यानी हाती घेतलेले काम यशदायी होईल अशी आम्हास खात्री वाटली. बर्लिनमध्ये शाकाहारी Restaurants जर्मन लोकानी चालविलेली बरीच आहेत. तेथे भात, ताक व भाज्या मिळतात. रोज रात्री आम्ही तेथें जाऊन आपल्या पद्धतीनें जेवण करीत असू. त्या वेळी आपण आपल्या पुण्यांतच आहो की काय असा भास होई.

## ऱ्हाईन नदीकांठचा प्रेक्षणीय देखावा

ऱ्हाईन नदी स्वित्झर्लंडमध्ये उगम पावून, जर्मनीतून वाहात जाऊन,

हॉलंडमधील ॲमस्टरडॅमजवळ समुद्रास मिळते. या नदीमुळे जर्मनं
मोठे महत्त्व आले आहे. ही नदी म्हणजे आपल्या गंगा, ब्रह्मपुत्रा, सिधु
नद्यां इतपत मोठी आहे व हिच्या कांठांवर जागजागी मोठी शहरे व कारख
वसले आहेत. या नदीचा उपयोग मालाची ने-आण करण्याकडे फार हो
Koln (Cologne) कोलोनपासून न्यूरेनबर्गला जाताना या नदीकाठ
रेल्वे लाइनने जावे लागतें. दोनही बाजूस उच डोंगर असून त्याच्या पा
थ्याशी मोठमोठी शहरे, कारखाने, दोन्ही किनाऱ्याच्या अगदी लगतच आहे
रुंद रस्ते, रेल्वे लाइन, ऱ्हाईन नदीतून जाणारी मोठाली जहा
डोंगराच्या उतरणीवरील शेती, हिरवीचार जमीन व झाडे, असे दृश्य सार
तीन तास दृष्टीस पडते व ईश्वराने ह्या गोष्टीत जर्मनीवर वरदहस्त ठेव
आहे असें वाटते. ऱ्हाईन नदीचे पाणी हुगळी नदीच्या पाण्याप्रमाणे गढ
आहे. कांही ठिकाणी डोंगर नदीकिनाऱ्याच्या इतका जवळ आहे की, ते
आगगाडी डोंगरांतून नेण्याकरिता बोगदे केलेले आहेत. सुटीत ह्या नदीतू
सफर करणे किंवा नदीकांठी तळ देऊन राहणे हा सुटी घालविण्याचा उत्त
मार्ग समजला जातो.

## जर्मनींतील शेती

या देशांत शेती पुष्कळ दृष्टीस पडते. त्याचप्रमाणे जगल व डोंगरहं
बरेच आहेत. कांही ठिकाणी शेतीच्या कामास गायी व बैल लावलेले पाहिले
इंग्लंडांत व यूरोपमधील इतर देशांत बैलांचा उपयोग शेतीकडे करीत नाहीत
घोडे किंवा अलीकडे Diesel Tractors, Diesel Engines ह्यांनं
काम केलें जातें. शेती जास्त असल्याने जर्मनीत जवळजवळ शेंकडा १५ ते २०
माणसें शाकाहारी आहेत. दूध उत्तम व स्वस्त आहे. एकंदर लोकसंख्य
सहा कोटी आहे. खाण्याचा खर्च इतर देशांच्या मानानें कमी आहे.

## कारखान्यांची व्यवस्था

जर्मनी कारखानेमय आहे. प्रत्येक शहर व खेडें गिरण्यांच्या चिमण्यांनी
गजबजलेलें दिसतें. आगगाडीतून जातांना क्रप, बेवर, मॅनर्समन, कोडॅक
वगैरे आपणा सर्वांस लहानपणापासून नांवांनी परिचयाचे असलेले, हजारों

कारखाने दिसतात; व त्यामुळे मन आश्चर्यांत गुग होतें. विजेच्या यंत्रांच्या व दिव्याच्या कारखान्यात त्यानी आम्हाला आपल्या कारखान्याची माहिती देणारा चित्रपट दाखविला. त्यात शेवटी आपला माल परदेशी कसा जातो; इजिप्त, दक्षिण आफ्रिका व इतर देशांत कसा विकला जातो व त्यामुळे येणारे पैसे जर्मन लोकांचे पोट कसे भरीत असतात व त्यांच्या बायकामुलांस कसे सुखी ठेवीत असतात हे दाखविले आहे. हिंदुस्थानांत विक्रीकरितां माल घेणाऱ्यांत थोडे हिंदी लोकही येथे दृष्टीस पडले. कारखान म्हणजे यंत्रे व ह्यांच्या साहाय्यानें होणारी पुष्कळशी कामे अगदी कटाळवाणी असतात. ह्याचकरिता आपल्यांत गव्हले करतांना ४–५ बायका एका ठिकाणी जमतात व गव्हले करीत असतांना गाणी चालू असतात. येथें यान्त्रिक काम चालू असताना रेडिओ चालू असतो. त्यामुळे कामकऱ्याची करमणूक होऊन ते कामही जास्त करू शकतात.

## शिक्षणाच्या सोयी

येथें उत्तम शिक्षण मिळू शकतें, विद्यार्थ्यांस फारच सवलती आहेत. त्यांना माल स्वस्त, पुस्तकें स्वस्त, प्रवासास गेल्या वेळी राहण्याची सोय स्वस्त, अशी सर्व व्यवस्था आहे. लग्न झालेल्या बाईस सहसा कारखान्यांत कामावर घेत नाहीत. लोकांनी लग्ने करावीत म्हणून त्यांना निरनिराळ्या सवलती दिल्या जातात. अविवाहित लोकांकडून कर जास्त घेतला जातो. ह्याचा परिणाम म्हणजे जास्त लग्ने व जास्त संतति. इंग्लंडमधून प्रथमच जर्मनींत येणाऱ्या माणसास, जर्मनीतील कारखान्यांत मुलींची संख्या कमी व रस्त्याने जाणाऱ्या तान्ह्या मुलाच्या हातगाड्यांची सख्या जास्त अशी स्थिति नजरेस पडते.

## हिटलरशाही

गेल्या तीन वर्षांत जर्मन राष्ट्रानें आपली अतिशय प्रगति केली आहे. तीन वर्षांपूर्वी देशांत ६० लाख लोक बेकार होते. ते आज फक्त १० लाख आहेत. लोकांस काम देण्याकरितां जर्मन राष्ट्रानें मोठमोठें रुंद व २०–२० मैल सरळ असे देशभर रस्ते तयार करण्यास सुरुवात केली. हे रस्ते आडव्या

येणाऱ्या रस्त्यांच्या खालून किंवा वरून नेलेले आहेत. त्यामुळे मोटारीची वाहतूक न थांबता, मैलचे मैल शीघ्र गतीने प्रवास होऊं शकतो. रस्ते तयार करून वाहतुकीस चालना देण्याकरिता हर हिटलरने नवीन मोटार घेणाऱ्यास मोटारचा कर माफ केला. ह्यामुळे लोक एकदम मोटार अगर लॉरी विकत घेऊ लागले. आपल्या जुन्या मोटारी फेकून पुष्कळांनी नवीन घेतल्या. ह्याचा परिणाम म्हणजे नवीन मोटारीना व लॉरीना मागणी वाढली आणि मोटारीच्या कारखान्यात आणखी माणसे कामावर घेतली गेली. मोटारीच्या कारखान्यांच्या या भरभराटीमुळे त्याचेकडून जर्मन सरकारास जास्त कर मिळू लागला, व मोटारीचा कर माफ केल्यामुळे झालेले नुकसान भरून निघाले.

हर हिटलरने नुकतीच अशी प्रतिज्ञा केली आहे की, आजपासून १८ महिन्यानी जर्मन राष्ट्र इतराकडून पेट्रोल विकत घेणार नाही. कोळसे व लांकडे यापासून पेट्रोल तयार करण्याचे कारखाने झपाट्याने वाढत आहेत. हा सर्व हिटलरशाहीचा परिणाम. ह्याच प्रकारच्या एकतंत्री सत्तेमुळे बर्लिन शहर इतके स्वच्छ राहूं शकते, नाही तर आपल्या म्युनिसिपालिट्या व लोकल-बोर्डे! एकादी चागली कल्पना कोणी पुढें आणल्यास, तिजवर प्रथम भयंकर खल, नंतर तज्ज्ञांच्या योजना, शिफारशी व मग पैसे नाहीत म्हणून कागद फाईल!!! पुढे पैसे मिळाल्यास पहिली कल्पना इतकी जुनी होऊन गेलेली असते की, पुन. नवी कमिटी, पुनः दुसरा रिपोर्ट!

येथें विजेच्या कारखान्यांत अॅल्युमिनियम् तारेच्या केबल्स तयार करतात. ह्या फक्त जर्मनीतच वापरण्यांत येतात. कारण की जरी तांब्याची तार जास्त वीजवाहक आहे, तरी ताबे परदेशांतून आणावें लागते व त्यामुळें जर्मनीचा पैसा देशाबाहेर जातो. आपल्या सर्व गरजा आपल्या देशांतूनच भागाव्यात याबद्दल सर्व राष्ट्राचा मोठा प्रयत्न आहे. जर्मनी कम्यूनिझमच्या विरुद्ध आहे. येथे भाडवलवाल्यांना जास्त सवलती आहेत. बर्लिनमधील जगप्रसिद्ध Siemens Schukert कंपनी ही 'फॅमिली अफेअर' आहे; म्हणजे त्या कंपनीचे शेअर फार थोड्या लोकांच्या हातीं आहेत. परंतु कंपनीच्या उत्पादकाने कारखाना काढून केलेल्या देशसेवेबद्दल त्याचा फोटो जर्मनीतील प्रत्येक २० मार्क्स किमतीच्या नोटेवर आहे. जर्मनीत मजूरसंघ नाहीत.

त्याचेऐवजी 'जर्मन पीपल्स फरंट' म्हणून संस्था आहेत. चालकापासून तों यःकश्चित् मजुरापर्यंत दर्जाचे लोक ह्या संस्थेचे सभासद आहेत. वर्गणी फारच थोडी असते ह्या संस्थेने गिरणी-कामगाराकरिता समुद्रकाठच्या मोठ-मोठ्या गावी हॉटेल्स घेतली आहेत व तेथे कामगाराना आपल्या सुटीच्या दिवसात आपल्या मुलांबाळासह जाऊन अगदी स्वस्त दरात राहता येते. ह्याचप्रमाणे ह्या संस्थेने दोन मोठमोठाली जहाजे घेतली असून त्यांतून कामगाराना त्याचे सुटीच्या दिवसात भूमध्यसमुद्रात व इतर दर्यावर पर्यटनास नेतात; अशा तऱ्हेच्या सवलतीमुळे हिटलरशाहीत जर्मन कामगार अगदी सुखी झाले आहेत कारखान्यात, ऑफिसमधून, हॉटेलमधून सर्व प्रमुख ठिकाणी हिंडेनबुर्ग व हिटलर याचे फोटो लावलेले दिसतात, तसेच स्वस्तिक चिन्ह पण सर्व ठिकाणी दिसते

## संघटना व सुव्यवस्था

जर्मनाची राहणी साधी वाटते मोठ्या थाटदार हॉटेलमधूनसुद्धां कॉफीमध्ये रोटी बुचकळून खाण्यास लोक भीत नाहीत. बर्लिनसारख्या मोठ्या शहरी सुद्धा नटलेल्या, ओठ रंगवलेल्या बायका फारच थोड्या दिसतात. रस्त्यांत कागद टाकणारास, तांबडे दिवे असताना रस्ते ओलांडणारास व इतर अशाच आपणास क्षुल्लक वाटणाऱ्या गुन्ह्याबद्दल येथे दंड आहे. परंतु ह्याचा निकाल झटपट लागतो पोलिसचे समन्स, मग कोर्टांत जाणे वगैरे त्रास नाही पोलिस गुन्हा करणाऱ्याजवळ येतो व म्हणतो, 'टाका एक मार्क' व त्यास पावती देतो येथे हेही लक्षात ठेविले पाहिजे की, या अधि-काराचा दुरुपयोग पोलिसकडून सहसा कधीच होत नाही.

राष्ट्राची झटपट प्रगति होण्यास एकतंत्री राज्यव्यवस्था काय करू शकते हे जर्मनीकडून शिकण्यासारखे आहे अर्थात् ह्यामुळे मतस्वातंत्र्य व व्यक्तिस्वातंत्र्य ह्यास आळा बसतो. म्हणून स्वतंत्र वृत्तीच्या लोकांना ही पद्धति कधीही पसंत पडणार नाही. पण जर्मनीचें संघटनाकौशल्य प्रचंड आहे. परवांच्या ऑलेंपिक सामन्यांची सर्व व्यवस्था कशी यंत्राप्रमाणे चोख होत होती. ताशी ३ लाख माणसें, ह्याप्रमाणे प्रेक्षकाचा प्रवाह स्टेडियमकडे चालू होता. परंतु त्यास त्याची जागा दाखविणे, बसविणे वगैरे सर्व व्यवस्थित

होत होते जर्मनीत आम्हाला भेटलेल्या कांही मोठ्या इंग्रज माणसांनींही वरील प्रशंसेचे उद्गार मजजवळ काढलेले आहेत. आपली प्रगति परकीयांनी पाहावी असा जर्मनीचा प्रयत्न आहे व त्याकरिता परकीयास प्रवास करण्यास येथें सवलती आहेत. आठ दिवस जर्मनीत राहिल्यास आगगाडी भाड्यांत ६० टक्के सवलत मिळते. जर्मनीत बर्लिनशिवाय आम्ही कोलन, न्यूरेनबर्ग, म्युनिक, ऑक्सबर्ग येथे गेलो. आमचा बहुतेक वेळ कारखाने पाहण्यांत गेला. म्युनिक येथील इंजिनिर्यारिंग व सायन्स म्यूझियम फारच प्रेक्षणीय आहे.

  

# स्वित्झर्लंडचा रमणीय देखावा

## पॅरिस–ऑक्टोबर १९३६

स्वित्झर्लंड हा चिमकुला देश जर्मनी, ऑस्ट्रिया, इटली व फरान्स या देशांनी गुरफटलेला आहे. ह्या लहानशा राष्ट्राची लोकसंख्या ४० लाख म्हणजे एका बर्लिन शहराच्या लोकवस्तीएवढीच आहे. देश उंच उंच डोंगरांनी, दऱ्याखोऱ्यानी व मोठमोठ्या तलावानी व्यापलेला आहे. जगाचे नंदनवन असें त्यास पडलेले नाव यथार्थ आहे, अशी माझी प्रत्यक्ष देश पाहून खात्री झाली. सध्या शरदृतु असल्यामुळे झाडांच्या पानानी निरनिराळे सुंदर रंग धारण केलेले आहेत डोंगर मात्र बर्फाच्छादित आहेत. सर्वांत उंच पर्वताची उंची अदमासे १५,००० फूट आहे. येथील सरोवरांतील पाणी स्फटिकाप्रमाणे स्वच्छ आहे.

स्वित्झर्लंड हा देश २४ लहान लहान प्रांतांत (ह्याला Cantons म्हणतात) विभागला आहे. (पैकी १५ जर्मन, ६ फरेंच व ३ इटालियन आहेत). स्विस भाषा निराळी अशी नाहीच. जर्मनीजवळच्या प्रांतांत जर्मन, फरान्सजवळच्या भागांत फरेंच ह्याप्रमाणें भाषा व्यवहारांत सहजीं उपयोगांत आल्या आहेत. सर्व सरकारी कामासाठीं व शिक्षणास लागणारीं पुस्तकें वगैरे जर्मन भाषेंत आहेत. वरील तऱ्हेची विभागणी झाली असून हा देश लोकसत्ताक आहे. निरनिराळ्या भागांत निरनिराळी राज्यव्यवस्था

आहे. उदाहरणार्थ, एकाच गुन्ह्याबद्दल वरील विभागात निरनिराळी शिक्षा होते. फक्त, आगगाड्या, पोस्ट, तारायत्र व सैन्य ही मध्यवर्ती फेडरल स्टेटच्या ताब्यांत आहेत

देश लहान, कोळसा नाही, लोखंड व इतर धातू, गहू, मास वगैरे खाण्यास लागणाऱ्या वस्तु, कापूस, लोकर वगैरे सर्वच गोष्टी ह्या देशाला बाहेरून आणाव्या लागतात. भरपूर काय असेल तर दूध व उचावरून खाली येणारे पाणी. ह्या पाण्याचा उपयोग वीज उत्पन्न करून घेण्याकडे केलेला आहे. ह्या पाण्यापासून झालेल्या विजेस येथे 'पांढरा कोळसा' म्हणून संबोधतात. ही वीज स्वित्झर्लंड, जर्मनी व इटली ह्या देशात खपते. येथें एकूण २० लाख हॉर्स पॉवर विद्युत्शक्ति ताशी उत्पन्न करण्याची पॉवर हॉउसेस आहेत. म्हणजे देशांतील प्रत्येक माणशी अर्धा हॉर्स पॉवर विद्युत्-शक्तीचे प्रमाण पडते. ह्या विजेच्या जोरावर देशांतील शेकडा ८० टक्के आगगाड्या विजेने चालतात व दर वर्षी ह्याचे प्रमाण वाढत आहे व वाफेची इंजिने कमी होत आहेत. स्वित्झर्लंडमध्ये कोठेही जा, रानात, डोंगरांत किंवा सरोवराजवळ, लहानशा झोंपडीत सुद्धा विजेचे दिवे दृष्टीस पडतात. येथें तेलाचे दिवेच अस्तित्वांत नाहीत असे म्हटले तरी चालेल.

वरीलप्रमाणें देशाची स्थिति असल्यामुळे लोकांचे उपजीविकेचे मुख्य साधन म्हणजे कारखाने. बाहेरून कच्चा माल आणून देशांतील स्वस्त विद्युत्शक्तीनें चालणाऱ्या कारखान्यांत त्याचीं नानातऱ्हेची यंत्रे व इतर वस्तू बनवावयाच्या.

येथे सूत कातण्याची व विणण्याची यंत्रे, विजेची यंत्रे, वाफेचे बॉयलर, इंजिने, विजेची इंजिने, तेलाने चालणारी इंजिनें करण्याचे मोठमोठे कारखाने आहेत. येथे होणारी यंत्रे उत्तम प्रतीची असतात. पाण्यापासून वीज उत्पन्न करण्याचें स्वित्झर्लंड माहेरघर असल्यामुळे येथे १५० वर्षांपासून पाणचक्या बांधण्यास सुरुवात झाली.

आम्ही येथील Brown Boveri, Sulzer, Swiss Locomotive, Escher Wyss वगैरेंचे कारखाने बघण्यास गेलों होतों. कारखान्यांत बायका कमी व देखरेख करणाऱ्या कामगारांचेही प्रमाण फारच थोडे दृष्टीस पडतें. देखरेखीशिवाय स्वत:चें काम बिनबोभाट

व वेळ न दवडतां करण्याबद्दल स्विस् लोकाची प्रसिद्धी आहे. ह्या मोठमोठ्या कारखान्याशिवाय स्वित्झर्लंडमध्ये पुष्कळच लहान घड्याळांचे, विणकामाचे, हस्तकौशल्याचे वगैरे धदे फारच उत्तम तऱ्हेने चाललेले आहेत. स्विस घड्याळे तर जगजाहीर आहेतच व ह्या धंद्यात आजही ह्या देशाची बरोबरी इतर राष्ट्रांकडून होत नाही. आम्ही रोलेक्स कंपनीचा घड्याळे करण्याचा कारखाना पाहिला. येथे सर्व कामे मुली करतात. इतकी उत्कृष्ट व चिमकुली व बरोबर वेळ देणारी घड्याळें अशा लहानशा कारखान्यात व इतकी स्वस्त कशी तयार करूं शकतात ह्याचे आम्हास आश्चर्य वाटले

देशात गाई पुष्कळ असल्यामुळे दूध उत्तम व विपुल. त्याचा उपयोग चक्का, गोठीव दूध, दुधाचे पीठ, चॉकोलेट वगैरे पदार्थ करून ते बाहेर देशांत पाठविण्याकरिता मोठ्या प्रमाणावर होतो येथे जगप्रसिद्ध नेसल्स चाकोलेट करण्याची फॅक्टरी आहे.

स्वित्झर्लंडमध्यें वीज, चॉकोलेट व घड्याळे अतिशय स्वस्त आहेत. असे म्हणतात की, येथे लाबून येऊन घड्याळ विकत घेऊन परत जाणे, हे तेंच घड्याळ बाहेर विकत घेण्यापेक्षां स्वस्त पडते! स्विस लोकांस अद्याप मोटार गाड्या स्वस्त दरांत तयार करणे जमत नाही. ह्या देशांत मोटारी तयार करण्याचा एकादा-दुसराच कारखाना आहे. तसेच येथे कॅमेरा तयार होत नाही. ह्याचा मक्ता जर्मनीकडे आहे व घड्याळांचा स्वित्झर्लंडकडे आहे. या दोन देशानी वरील जिनसावर एकमेकांच्या देशात जाण्यास जकात माफ केली आहे.

## जगाचें नंदनवन

हवापाणी उत्तम व निसर्ग शोभारम्य, म्हणून येथें जगाच्या सर्व भागांतून प्रवासी येतात. त्याची सख्या फारच मोठी असते व त्यामुळे ह्या देशांत हॉटेल्स चालविणें हा एक उत्तम प्रतीचा, फायद्याचा व मोठ्या प्रमाणावर चालणारा धंदाच होऊन गेलेला आहे. येथील राहाणी महाग. झूरिक येथील रेल्वे वर्कशॉपमध्यें सर्वात कमी प्राप्तीच्या मजुरास रोजी ८ स्विस फरॅंक म्हणजे ४–५ रुपये मिळतात. स्विस फरॅंकची किंमत कमी झाली आहे. तरी येथील हॉटेल्स, जेवण, चहा, हमाली, टॅक्सी व इतर सर्वच फार महाग आहे. वर

लिहिलेल्या महागाईमुळें प्रवाशाची संख्या हल्ली कमी होऊ लागली आहे. फ्रँकच्या कमी झालेल्या किमतीमुळे (पूर्वी एका पौंडास १५ फ्रँक मिळत, हल्ली ते २१॥ मिळतात.) आर्थिक मंदी दूर होऊन, प्रवाशाची ही संख्या पुन पूर्ववत् होईल व टूरिस्टचा धंदा ऊर्जितावस्थेत येईल अशी स्विस लोकास आशा वाटत आहे.

आम्ही झूरिक, बाडन, विंटरथर, लूसर्न, लूझॅन, बर्न, इंटरलेकन, जिनीव्हा वगैरे ठिकाणी गेलो होतो. लुसर्नचा तलाव फारच रमणीय आहे. जवळच असलेल्या रिगी डोंगरावर विजेच्या आगगाडीने गेलो याची उंची बरीच आहे डोंगरावर उत्तम व मोठमोठी हॉटेले आहेत. किती सुखसोयी उंच डोंगरावर पण! कोणत्याही गोष्टीची उणीव नाही. सर्व आठवड्याच्या अतिशय कामानंतर सुटीत अशा जागी जाऊन मुले बायका यांसह खूप मजा करावी व निसर्गाशी समरस व्हावे व नित्याचें काम विसरावे मनाला नव्या गोष्टी दिसल्याने पुन दुसऱ्या दिवशीच्या कामाला ते मन टवटवीत व तयार होते. डोंगर बर्फाच्छादित होता. आम्ही बर्फात खूप खेळलो. डोंगरावरील मोठाल्या इमारती झुकलेल्या दिसतात. परंतु वर पडणाऱ्या बर्फाचे ओझे तोलून धरण्याकरिता त्याची एक बाजू मुद्दाम कलती अशी बांधलेली असते.

स्वित्झर्लंडची राजधानी बर्न. पण राष्ट्रसंघामुळे जिनिव्हास जास्त महत्त्व प्राप्त झाले आहे. जिनिव्हा येथील नुकतीच तयार झालेली राष्ट्र-संघाची इमारत पाहण्यास आम्ही गेलों होतो. तेथे हल्ली तीन हिंदुस्थानी लोक वरिष्ठ दर्जाचे अधिकारी आहेत. (डॉक्टर राम, रा. दलाल, रा. घोष). आम्ही जीनिव्हा येथे असतांना डॉ. राम ह्यानी आपल्या घरी आम्हांला हिंदुस्थानी पद्धतीचे जेवण दिले. त्या वेळी आमच्या पक्तीस हल्लीचे इग्लंडातले हिंदी हायकमिशनर सर फिरोज खान नून, त्याचे सेक्रेटरी झमान I.C S. व त्याच्या पत्नी, कॅप्टन खानोलकर व त्याच्या स्विस् पत्नी व आंतरराष्ट्रीय लेबर ऑफिसमध्यें नुकतेच कामावर लागलेले मद्रासी गृहस्थ राजा व त्यांच्या पत्नी अशी मंडळी होती.

स्विस् लोक सुदृढ, बायका सशक्त व अतिशय सुंदर. लहान मुलें तर बघत राहावी अशी गुटगुटीत! ह्या लोकांची राहाणी व कपडे साधे. लोक स्वभावानें फारच चांगले व अगत्याचे दिसले. ओळख नसतांना

देखील दोघातिघानी आम्हास आमच्या मोटारीतून चला म्हणून म्हटलें. कारखान्यातील सर्वांत मोठा अधिकारी चीफ इंजिनियर हा आपल्या हाताखालचे नोकर, शिकाऊ उमेदवार ह्यांच्याबरोबर जेवणाच्या सुट्टीत एकाच टेबलावर जेवायला बसलेला मी पाहिला.

देश लहान, शेती फारच थोडी, कोळसा लोखंड बिलकुल नाही. कापूस तर नाहीच, पण लोंकरही देशात फारच थोडी उत्पन्न होते. अशी सर्व स्थिति असून आपल्या कर्तबगारीने व स्वकष्टाने हा देश इतका पुढें आला आहे व लोक सुखी आहेत आमच्या आजपर्यंतच्या पाहाण्यांत मनावर बिंबणारी एक गोष्ट म्हणजे, इकडील सर्व लोकांचा उद्योगीपणा. आळशी मनुष्य विरळा सकाळपासून संध्याकाळपर्यंत प्रत्येकाची उपजीविकेकरितां पैसे मिळविण्याची धडपड चाललेली असते. प्रयत्नवाद सर्वांच्या हाडीमाशी खिळलेला आहे.

  

# पॅरिसमध्यें काय दिसलें ?

## पॅरिस–ऑक्टोबर १९३६

### कम्युनिझमची भीति

ज्याने फरेंच रेव्होल्युशनमुळे सर्व जगांतील राष्ट्रास लोकशाहीबद्दल चालना दिली, पुढे नेपोलियॉनिक युद्धामुळे प्रसिद्धीस पावलेलें व आतांपर्यंत जगांतील अत्यंत फॅशनेबल (हल्ली न्यूयॉर्कनें ज्याचा मक्ता घेतला आहे) म्हणून समजले जाणारें शहर पॅरिस, हे ज्या देशाची राजधानी आहे तो देश उत्तरेस बेल्जम व समुद्र, पश्चिमेस बे ऑफ बिस्के व समुद्र, दक्षिणेस स्पेन देश, भूमध्य समुद्र व इटली, स्वित्झर्लंड व पूर्वेस स्वित्झर्लंड व जर्मनी अशा रीतीनें वसलेला आहे.

ह्याची लोकसंख्या चार कोटी म्हणजे जर्मनी व इंग्लंड देशाच्या लोकसंख्येपेक्षा कमी पण क्षेत्रफळ इंग्लंडपेक्षां जास्त आहे. जवळजवळ तीन कोटी लोक शेतीवर व शेतीबाबत लागणाऱ्या मजूरीवर उपजीविका करितात बाकीचे एक कोटी व्यापार, नोकऱ्या व मजूरीवर उपजीविका करतात.

ह्या देशात जमिनी पुष्कळांच्या खास मालकीच्या आहेत व हिंदुस्थानाप्रमाणे त्याचे ह्यामुळे पुष्कळ लहान लहान तुकडे पडलेले आहेत. वरील गोष्टीमुळे देशातील बहुसंख्य लोक communism च्या विरुद्ध आहेत. कारण ह्या लोकाचे communism मुळे नुकसानच होण्याचा संभव जास्त. ज्याचे नुकसान होणे शक्य नाही असे कामगार लोक मात्र communism च्या बाजूचे आहेत व त्यामुळे व स्पेन देशातील हल्लीच्या वादळामुळे फरान्स देशात हल्ली मधून मधून मजुराचे संप होतात. असे संप करून मजुरांनी आपले पगारी सुटीचे दिवस हल्ली कायद्याने वर्षास १५ करून घेतले व आठवड्यांतील कामाचे तास ४८ वरून ४० वर उतरविले पगार मात्र पूर्वीचाच कायम

## स्वावलंबी फरान्स

शेती जास्त असल्यामुळे अन्न, फळे, भाज्या वगैरे पुष्कळच वस्तु देशांतच उत्पन्न होतात. आफ्रिकेतील कॉलनीमधील स्वत:च्या गहू वगैरे पदार्थांवर या देशाच्या सर्व खाद्य पदार्थांच्या गरजा भागू शकतात

कोळसा देशास पुरेसा देशातच मिळतो पाण्याच्या जोरावर होणाऱ्या विजेचीं पॉवर हौसेस देशांत बरीच आहेत लोखंड अलसेस व लॉरेन भागांत विपुल आहे दूध पुष्कळ व देशात खाण्यास लागणारे मांस भरपूर अशी स्थिति आहे. म्हणजे फरान्स देश पुष्कळसा ह्या बाबतीत स्वावलंबी आहे.

बाहेरून आणाव्या लागणाऱ्या कच्च्या मालाचें प्रमाण कमी व त्यामुळे देशांतील तयार झालेला माल बाहेरदेशी जाण्याचे प्रमाणही कमी. ही वस्तुस्थिति लक्षांत घेतां फरान्समध्ये तयार झालेल्या वस्तू आपल्या देशात फारच तुरळक कां हें समजेल. ह्यास दुसरेही एक कारण म्हणजे मजूरी महाग व प्रजासत्ताक राज्यपद्धति. जगातील सर्व राष्ट्राची हिंदुस्थानची बाजारपेट काबीज करण्याची धडपड चालू असता फरान्सने मात्र आजपर्यंत ह्या बाबतीत फारशी खटपट केलेली नाही.

देशात लागणारी सर्व यंत्रसामग्री, इंजिने, विजेची यंत्रे, मोटारी, कापड वगैरे नाना तऱ्हेच्या वस्तु फरान्समध्यें तयार होतात स्थापत्यशास्त्रांमध्यें हा देश पुष्कळ पुढे गेलेला आहे व जगात प्रथमच २,२०,००० व्होल्ट्स्

दाबाची वीज जमिनीखालून Oil filled cables ने ह्या देशात नुकतीच नेली आहे. हे Sub-station जुलै १९३६ मध्ये मुद्दाम पाहण्यास इंग्लंडमधील Institution of Electrical Engineers चे सभासद गेले होते. मीही ह्याच्या बरोबर पाहण्यास गेले होते. ज्याप्रमाणे तयार केलेला माल फारसा देशाबाहेर जात नाही, त्याप्रमाणेच इतर देशांत तयार झालेला माल ह्या देशात फारसा येत नाही. देशाबाहेर सोने न जाऊ देण्याबद्दल फारच कडक निर्बंध आहेत. देशाबाहेर जाणाऱ्या प्रत्येक माणसाच्या सामानाची सरहद्दीवर कसून पाहणी होते

## विलासी फरान्स

येथे बायकाची व पुरुषाची सख्या जवळजवळ सारखीच असल्यामुळे अविवाहित मुलीची सख्या अर्थात् कमी आहे स्वत.चे लहानसे घर व आपली बायकामुले घेऊन राहणे ह्या लोकास जास्त आवडते Club Life इतर देशाच्या मानाने कमी, लोकसख्या जवळजवळ स्थिर असल्यामुळे, Birth Control Clinics सारख्या सस्था येथे कमी

फरेच लोक फार हौशी व विलासी हे वरवर पाहणाऱ्यास सुद्धा दृष्टोत्पत्तीस येते. जिकडे तिकडे लखलखाट. पॅरिस शहर म्हणजे रोज रात्री दिवाळीची रोषनाई, बादशहाच्या रौप्य ज्युबिलीच्या वेळेस झालेली कलकत्त्याची रोषणाई पॅरिसच्या रोजच्या रोषणाई इतपतच म्हटले तरी चालेल ह्या बाबतीत हे शहर लडन व बर्लिनला मागे टाकते. दुकाने सजविण्याची कला येथे फारच पुढे गेलेली आहे. तसेच उपाहारगृहे, cafe येथे पुष्कळ. Cafe बाहेर फूटपाथच्या अर्ध्या भागावर टेबले माडून त्याजवर कॉफी व दारू पीत बसण्याची सोय रस्तोरस्ती, गल्लोगल्लीं आहे, व ही कॉफीगृहें नेहमी गच्च भरलेली. रात्री अशा पुष्कळ cafe मधून गायनवादन चालू असते. देशात द्राक्षें पुष्कळच होतात व त्यामुळे उत्तम व स्वस्त दारूबद्दल फरान्सची प्रसिद्धि आहे. द्राक्षरसाची निरनिराळी पेये येथें जवळजवळ सर्वच घेतात म्हटले तरी चालेल. येथे चित्रकला व शिल्पकला पुष्कळच पुढे गेली आहे. शहरात जागजागी पुतळे, इमारतीवरही मोठमोठे पुतळे व चित्रे; व हीं सर्व नग्न. पुतळे व चित्रात एकूण एक सर्व अवयव

दाखविले पाहिजेत व त्यात वाईट काही नाही असे लोकमत, त्यामुळे ह्या गोष्टीस कोठेच प्रतिबंध नाही ह्याचा अनुभव म्हणजे मोठमोठाल्या सरकारी ऑफिसातून, खुद्द पोलिस कमिशनरच्या ऑफिसात सुद्धा, नाना तऱ्हेचीं नग्न स्थितीतील चित्रे भिंतीवर लावलेली मी प्रत्यक्ष डोळ्यानी पाहिली.

आपले शरीर दुसऱ्यास दाखविण्यात काही लाज आहे असें ह्या लोकास वाटतच नाही मुळी. उलट ती एक कला आहे असे समजले जाते. त्यामुळे नग्न नाच वगैरे गोष्टीस ह्या देशात प्रतिबंध नाही. परंतु येथे हेही सांगितले पाहिजे की, (फ्रेंच) संभावित लोक अशा ठिकाणी जाणें चांगले समजत नाहीत

जी गोष्ट आपल्याला नेहमी मिळत नाही किंवा दिसत नाही तीबद्दल साहजिकच पुष्कळांना जिज्ञासा उत्पन्न होते व यामुळे (Foreigners) परराष्ट्रातील लोक हे पुष्कळच पॅरिस शहरी असले अश्लील समजले जाणारे व स्वत:चे देशांत कधीही पाहावयास न मिळणारे नग्न नाच पाहण्यास जातात.

अर्थात् या foreigners च्या मन स्थितीचा फायदा पैसे मिळविण्याकडे खालच्या दर्जाचे (French) लोक करून घेतात. रस्त्यातून चालताना नग्न फोटो विकत घेता का म्हणून हे लोक परकी मनुष्याच्या पाठीस लागतात अशा फोटोत काहीच नावीन्य वाटत नसल्यामुळे अशा फोटोची विक्री फ्रेंच लोकात होत नाही.

## सामाजिक नीतिमत्ता

पॅरिस वाईट, फ्रेंच लोक फसवे, त्याच्यात नीतिमत्ता कमी वगैरे गोष्टी ज्या ऐकिवात येतात त्या जिज्ञासू अशा फसल्या गेलेल्या लोकानी सांगितलेल्या होत. प्रथम पॅरिस शहरात पाय ठेवल्याबरोबर वरील गोष्टी कानावर आल्यामुळे आम्ही फारच सावधतेने वागत होतो परंतु दोनतीन दिवसातच आमची अशी खात्री झाली की, फ्रेंच लोक प्रामाणिकपणात व सभ्यतेत इतर राष्ट्राच्या बरोबरीने आहेत. दिवसा व रात्री भर वस्तीतील रस्त्यात बायकांनी निर्धोक जावे.

भामटे, खिसेकापू लोक हे कोणत्याही मोठ्या शहरी असणारच; पॅरिसमध्ये ते जरा जास्त आहेत, एवढेच. पुढील वर्षी पॅरिसमध्ये फारच मोठे आंतरराष्ट्रीय प्रदर्शन भरणार आहे. त्याच्या तयारीस दोनतीन महिन्यां-

पासून सुरुवात झाली व हल्ली काम जोरात चालू आहे. इंग्लडमधील राज्याभिषेक व हे प्रदर्शन पाहण्यास आपले पुष्कळच लोक येण्याचा संभव आहे. त्यास एकच सूचना देणे अगत्याचे वाटते ती ही की, रस्त्याने कोणी "Would you like to visit something unusual? Do you wish to see side shows? Do you wish to have beautiful pictures?" म्हटले तर त्यास No, thanks म्हणून उत्तर देऊन बाजूस व्हावे. तसेच नाच, तमाशे पाहावयाचेच असल्यास ज्याची तिकिटे थॉमस कुक आणि सन्सकडे विकत मिळतात अशाच ठिकाणी जावे.

कसेही असो, देश स्वतंत्र आहे व इतर प्रमुख राष्ट्राच्या बरोबरीने त्याची प्रगति होत आहे. लोक थोडे चैनी परंतु स्वावलंबी व दुसऱ्याच्या जिवावर मजा न करणारे असे आहेत काम करा, पैसे मिळवा व मग मजा करा हें ब्रीदवाक्य यूरोपमध्यें सगळीकडे दृष्टीस पडते. कोणतेही काम करण्याची वेळ आल्यास प्रत्येकाची तयारी आपले आयुष्य सार्वजनिक कामास वाहिलेल्या येथील दोघा अविवाहित प्रमुख बायकाकडे आम्ही जेवावयास गेलो होतो. या बाया हल्ली ४०।४२ वर्षाच्या आहेत. ज्यांच्याशी आम्ही लग्ने केली असती ते लढाईत मेले म्हणून आम्ही अविवाहित असें त्यांनी स्पष्ट सांगितले. ह्या दोनही बायांनी लढाईपूर्वीपासून आतांपर्यंतचा आपल्या आयुष्याचा इतिहास सांगितला. तो आम्हास फारच रमणीय वाटला. पैसे मिळविण्याकरिता ह्या बायानी वाटेल तितका अवघड किंवा कमी प्रतीचा व्यापार केला. लाखो रुपये मिळविले व ते उपयुक्त, लोकोपयोगी कामाकडे धर्मादाय म्हणून दिले. अर्थात् आपणही त्या पैशाचा उपभोग घेतला. युद्धाच्या वेळी नर्सिंगसारखी कामे केली.

सर्व जगाबरोबर आपणही (Materialistic) भौतिकसुधारणावादी बनल्याशिवाय आपली उन्नति होणे नाही असे वारंवार वाटतें. मनुष्याला एकदां आधिभौतिक सुखाची संवय झाली म्हणजे त्याची मनःस्थितीच अशी बनते की, तो निरनिराळी सुखे मिळविण्याकरितां सारखी धडपड करीत राहतो व धडपडीत यश हा सृष्टीनियमच आहे.

  

# पाश्चात्य देशांतील लोकांची शिस्त व वागणूक

## कैसर-ई-हिंद आगबोट-डिसेंबर १९३६

आज ५-६ महिने इंग्लंड, स्कॉटलंड, हॉलंड, जर्मनी, स्वित्झर्लंड, फरान्स ह्या देशांत आम्ही सतत प्रवास करीत आहोत व अलीकडे कांही दिवस आता आपल्या देशांत परत जावे म्हणून सारखी हुरहूर वाटत असे असें असून सुद्धां परवा म्हणजे ता. २७।११।३६ रोजी आम्ही स्वदेशी परत जाण्याकरितां बोटीत पाय ठेविला व इंग्लंड देशास शेवटचा रामराम केला. त्या वेळी सहा महिन्यांपूर्वी मुंबई सोडताना जितके वाईट वाटले त्यापेक्षा जास्त वाईट वाटले ही गोष्ट खास.

विलायतेस जाणे शक्य असून सुद्धा उगाच व्यर्थ खर्च करून जाण्यात काय अर्थ असे वाटे. शेवटी एकदांचे आम्ही दोघे व मलगी हिंदुस्थान देश सोडून निघालो; व आतां आपण इकडे आलो नसतो तर मोठी चूक केली असती असे वाटू लागले. स्वतःचा देश सोडल्याशिवाय स्वदेशाची किंमत कळत नाही व आपला देश आपल्यास किती प्रिय आहे ह्याची खरी जाणीव होत नाही. मग इंग्लंड सोडतांना वाईट वाटण्याचे कारण काय ? तर ते एकच म्हणजे येथे व यूरोपमधील इतर राष्ट्रें यांच्यापासून आपणांस पुष्कळच गोष्टी शिकण्यासारख्या आहेत व त्या शिकल्यापासून आपल्यास उपयोग होणार आहे. ह्या ५-६ महिन्यात आम्ही किती तरी नवीन गोष्टी पाहिल्या व शिकलों. परंतु अद्याप शिकण्यासारखें पुष्कळ असून व तें शिकण्याची इच्छा असून परत जात आहो म्हणून साहजिकच वाईट वाटते

## कडक शिस्त व लंडनमधील शांतता

यूरोपमधील आमच्या ५।६ महिन्यांत आम्ही जे जे पाहिले त्यांत क्षणोक्षणी एकच प्रश्न पुढें येई व तो म्हणजे 'हे लोक असे कां' व 'आपला देश असा कां' ? मी आपल्यास वगळीत नाही. 'आमचें

असें कां'? ह्याची कारणें पुष्कळच आहेत; परंतु वरवर पाहणारास सुद्धां इकडील लोकांचे कांहीं ठळक गुण हेच त्यांस पुष्कळ अंशी कारणीभूत आहेत अशी खात्री पटते. इग्लंडबद्दल व इंग्रजांबद्दल मी जें लिहिणार आहे तें यूरोपमधील इतर राष्ट्रास देखील लागू पडेल.

मुंबईस आगबोटीत पाय ठेवल्यापासून क्षणोक्षणी शिस्तीचे निरनिराळे प्रकार पाहावयास मिळतात. उदाहरणार्थ, भररस्त्यांत पोलिसांनी हाताची ठराविक खूण केल्याबरोबर सर्व वाहतूक एकदम यंत्राप्रमाणे बंद. मग त्यात राजा असो की प्राइम मिनिस्टर असो कीं एकादा भिकारी असो. शिस्तीचे नियम सर्वत्रास सारखे व ते सर्व तितक्याच आदरानें पाळले जातात. फूटपाथशिवाय रस्त्यातून चालणारा इसम क्वचितच दिसेल. यामुळें जगांतील नबर दोनच्या लडनसारख्या मोठ्या शहरी सुद्धां मोटारीचे भोंगे, सायकलच्या घटा किवा घोडागाडी हाकलणाराच्या 'चलो बाजू' असे आवाज फारच थोडे वेळा कानी पडतात. लंडन हें जगातील सर्वांत शात शहर अशी त्याची प्रसिद्धि आहे. लहान लहान मुले सुद्धा कशी यंत्रासारखी फूटपाथवरून सरळ चालतात व रस्ते ओलाडतात. ती चौकांतील दिवे (Traffic light signals) व पोलिसाच्या खुणा याकडे कसे लक्ष देतात हे पाहून कौतुक वाटते. हे शिक्षण अगदी लहानपणापासून मिळते. फूटपाथवरून खाली उतरल्यास आई मुलास ताबडतोब थप्पड मारते हें आम्हीं स्वत: पाहिलेले आहे.

## तिकिटें घेण्याची पद्धत

जेथें जेथें म्हणून गर्दी होते (म्हणजे आगगाडीचीं किवा थिएटरची तिकिटे काढण्याचे ठिकाणी, उपाहारगृहांत बिलें भरण्याचे ठिकाणी किवा प्लॅटफॉर्मवर, उपाहारगृहात, थिएटरमध्ये वगैरे शिरण्याचे वेळी) तेथे तेथें इकडील लोक एकदम एकामागें एक रांगेनें, प्रथम आलेला पुढें व मागून आलेले क्रमाप्रमाणें मागे मागें उभे राहतात व हळुहळू पुढें सरकत असतात. अशा प्रकारच्या रांगा विशेषत: शनिवारी सायंकाळी ग्लासगो, लंडन वगैरे मोठ्या शहरीं थिएटरचीं तिकिटें विकत घेण्याकरितां एक एक फर्लांग लांब असतात व सर्वांत पाठीमागील मनुष्यास

आपली पाळी येईतो पुष्कळ वेळ उभे राहावे लागते. हे लोक हातांतील वर्तमानपत्रे वाचीत हळुहळू पुढे सरकताना पाहून मोठी मजा वाटते. मागून आलेला मनुष्य एकदम पुढे घुसण्याचा प्रयत्न करीत नाही. नवशिका किवा इतर कोणी पुढे घुसलाच तर त्यास इतर लोक धक्काबुक्की किंवा शिव्यागाळी करून पाठीमागे घालवून देत नाहीत.

आगगाडीची तिकिटे काढताना पुष्कळ वेळा अशा रागा लागतात व आपल्याकडील थर्ड क्लासच्या तिकिट-विक्रीच्या खिडक्यासमोरील मारामारीचे, आरडाओरडीचे चित्र पुढे उभे राहाते. हिंदुस्थानात बूट, पाटलोण घालून साहेब बनलेले लोक मागील दरवाज्याने तिकिट ऑफिसात शिरतात व तिकिट मागतात. तिकिटमास्तरही ते त्यास देतो. इकडे अशा प्रकारास तिकिटमास्तर उत्तेजन देत नाही. सर्व सारखे, प्रत्येकास आपल्या पाळीप्रमाणें तिकिटे मिळतात. पोस्ट ऑफिसांत, बॅंकात वगैरे हीच शिस्त.

## युद्धसमाप्तीचा दिन

आगगाडीत, ट्राममध्ये, बसमध्ये किवा टच्यूबमध्ये बसतांना प्रथमतः आतील लोकास उतरूं देणे व मग आपण आंत शिरणें असा नियम आहे. हा नियम प्रत्येक जण आदराने पाळतो. वरून थप्पड मिळेल म्हणून नियम पाळणें व आपण होऊन सर्व व्यवहार सुयंत्रित चालावेत म्हणून नियम पाळणे ह्यांत किती तरी अंतर आहे. ता. ११ नोव्हेंबर १९३६ हा Armistice Day आम्ही कधी विसरणार नाही. सकाळी १०॥ वाजल्यापासून आम्ही लंडनमधील मोठ्या गर्दीच्या रस्त्यांत म्हणजे Trafalgar Square मध्ये त्या दिवसाची मिरवणूक पाहण्यास उभे होतों. Trafalgar Square मध्ये नेहमीचीच अतिशय गर्दी. आज तर अतोनात जनसमूह तेथें लोटला होता. मोटार बसेस् वगैरेंची वाहतूक वाढलेली होती. हातगाड्यांतून तान्ही मुले घालून त्याच्या आया हा आठवणीचा समारंभ पाहण्यास लोटल्या होत्या. प्रत्येकानें आपल्या कोटाला Poppy विकत घेऊन ती लावून दिली होती. Poppy नसलेला विरळाच. वाहतुकीचा आवाज नेहमींपेक्षां शंभरपट वाढला होता. अकरा वाजले, तोफा उडाल्या व एकदम सर्वत्र स्मशानवत् शांतता दोन मिनिटे झाली. प्रत्येकानें आपली

टोपी उचलली व लढाईत जीवदान दिलेल्या आपल्या देशबांधवांच्या आत्म्यास वंदन केलें. डोळे मिटले असते तर आपण लंडन शहरांतील Trafalgar Square मध्ये नसून एकाद्या अरण्यात आहोंत की काय असा भास झाला असता. ह्या क्षणी मला काही वर्षापूर्वी पुण्याच्या एका सभेची आठवण झाली. महात्मा गांधीचें व्याख्यान शनिवारवाड्यापुढील पटांगणात होणार होते. लोक पुष्कळच आले होते व जो तो पुढें जाण्याची धडपड करीत होता. महात्माजी व्यासपीठावर उभे राहिले असून सुद्धां ओरडा कमी होईना व बाळुकाका कानिटकर शांतता प्रस्थापित करण्याकरिता मोठमोठ्यादा लोकांस विनंति करीत होते तरी गोंगाट बंद होईना !

ह्या शिस्तीचा इंग्रजास मोठा अभिमान वाटतो. ह्यास Discipline म्हटल्यास त्यास खपत नाही. Discipline is something which is forced upon people जर्मन लोकाच्या शिस्तीस इंग्रज Discipline म्हणतो, परंतु स्वतःची शिस्त जुलुमाचा रामराम नसून ती आमच्यांत उपजतच आहे असें ते म्हणतात. एकामागें एक असे रागेनें आपल्या पाळीची वाट पाहात उभे राहणे ह्यांस इकडे 'क्यू' (Queue) असें म्हणतात. हा शब्द सुद्धां आम्हांस इकडे आल्यावर प्रथम समजला. आपल्या देशांत लहानपणापासून अशा प्रकारची शिस्त घरीं व शाळेंत मुलांस शिकविणे अवश्य आहे असे वाटू लागले.

## सचोटी

इकडे रोजच्या व्यवहारांत सचोटीचें प्रमाण पुष्कळच जास्त प्रमाणांत आहे यांत शंका नाही. दुकानांत किमती एक. तुम्हांस भाषा येवो न येवो (जर्मनी, फरान्स, स्वित्झर्लंडमध्यें आम्हांस त्यांची भाषा येत नव्हती), मूल जावो किंवा मोठा मनुष्य जावो, फसवणूक नाही. माल तोलतांना तराजूकडे लक्ष देणें नको. एकादे वेळेस चुकीनें किंमत कमी सांगितल्यास शब्दाकरिता नुकसान सोसतील. आगगाडीत किंवा सार्वजनिक ठिकाणी कांहीं वस्तू विसरल्यास त्या सांपडण्याचाच संभव जास्त. आमचे कॅमेरे दोनदां व इतर वस्तू एकदोनदां हाईड पार्कसारख्या ठिकाणीं बाकावर राहिल्या व त्याची आठवण दोनतीन तासांनीं झाली. परत जाऊन पाहतों

तों वस्तू नाहीत. पोलिसास विचारतां त्यानें नाव, पत्ता व टेलिफोन नबर लिहून घेतला. संध्याकाळच्या आत, पोलिसठाण्यावर येऊन आपल्या वस्तू आहेत त्याची खात्री करा म्हणून टेलिफोन आला. तेथें जाऊन पाहतो. तों आमच्या हरवलेल्या वस्तू आमची वाट पाहात होत्या!

लंडनमध्ये वर्तमानपत्रें विकणारे फूटपाथावर आपली वर्तमानपत्रे व खुर्दा ठेवून जेवण्यास वगैरे जातात. पत्र विकत घेणारा एक पत्र उचलतो व त्याची किमत तेथे ठेवतो. बंदा शिलिंग असल्यास तो ठेवून खुर्दा उचलतो व चालू लागतो.

## विश्वास अधिक

आगगाडीतून, बस-ट्रॅममधून किंवा टयूबमधून विनतिकिटाने प्रवास करणारांची संख्या फारच थोडी. हॉटेल, बोर्डिंग हाउसेसमधील आपल्या खोल्यातील सामान, घड्याळें, फौटनपेन, पैसे सुद्धा चोरीस जाण्याचा संभव फारच थोडा. कुलुपाशिवाय आम्ही आमच्या ५।७ पेट्या व इतर वस्तू नेहमीं खोलीत मोकळ्याच टाकीत असू. जवळजवळ ४०।५० हॉटेलांमध्ये राहिलों, परंतु एकाही ठिकाणी आमची क्षुल्लक वस्तु सुद्धा गेली नाहीं. सचोटीचे इतर पुष्कळ अनुभव वारवार प्रत्ययास येतात व त्याबद्दल कौतुक वाटतें. सर्वच गोष्टीत एकमेकांवर विश्वासाचें प्रमाण जास्त वाटतें. घाईमुळे तिकिट न घेता टयूबमध्ये (जमिनीच्या पोटांतील आगगाडीत) बसल्यास वर येतांना तिकिट पाहणारा मनुष्य, आपण कोठून आला म्हणून विचारतो व तो ज्या स्टेशनाचें नांव सागेल तेथपासूनचें भाडें मागतो.

येथें लहानांपासून थोरांपर्यंत, गरिबांपासून श्रीमंतांपर्यंत सर्वच बँकेंत पैसे ठेवतात. साहजिकच जनतेचा बँकेशी संबंध जास्त येतो. बँका आपल्या खातेदारावर पुष्कळच विश्वास ठेवतात व कधी जास्त पैशाची गरज लागल्यास साधारणपणें चौकशी करून त्यांना Over draft तात्पुरतें कर्ज देतात. ह्याचा प्रत्यक्ष अनुभव माझ्यासारखाच इतरांनाही आलेला आहे. दूधवाले पहांटेच दुधाच्या बाटल्या, रोटीवाले रोटया, भर रस्त्यावरील दाराच्या उंबऱ्यांत ठेवून जातात व त्या घरांतील माणसें निजून उठल्यावर

दार उघडून आत घेऊन जातात. ह्या दुधाच्या बाटल्या व रोटचा चोरीस जावयाच्या नाहीत.

शिस्तीप्रमाणेंच ह्या लोकात आदबी (Courtesy) मुरलेली आहे. आगगाडीचे लहानथोर नोकर, बस व ट्रॅम–कंडक्टर, बॅंकातील व ऑफिसातील कारकून, फार तर काय, पण पोलिस सुद्धा जनतेशी मोठ्या आदबीने वागतो व त्यास (Sir) महाराज म्हणून सबोधतो वरील कामगार आपण जनतेचे नोकर आहोत, जनतेवर आपले पोट अवलबून आहे, ती आपली मालक आहे असे समजून वागतात. रस्त्याने जाणाऱ्यायेणाऱ्यास अमुक ठिकाण कोठे आहे अशी किवा इतर काही माहिती विचारल्यास, तो ती मोठ्या हौसेने देतो स्वतःला माहीत नसल्यास तो पुष्कळ वेळा ती दुसरीकडून मिळवून सागतो. ह्याचा अनुभव आम्हां इग्लड आणि स्कॉटलडमध्ये मोटारीतून प्रवास केला त्या वेळी पुष्कळच आला. आदबीचे दुसरे प्रकार म्हणजे दुसऱ्याकडे टक लावून न पाहणें, परदेशी मनुष्य म्हणून लहान मुलानी त्याच्या पाठीमागे न लागणे, आपण कसेही कपडे घातले तरी त्यावद्दल टीका न करणे वगैरे वगैरे. तसेंच हॉटेलमध्ये आपण परके म्हणून आपल्यास बिलकुल वाटत नाही. कारण लोक आपल्याकडे बिलकुल लक्ष देत नाहीत. तेच एकाद्या हॉटेलमध्ये चिनी किंवा जपानी पाहुणा असला की त्याची नजर लगेच आमच्याकडे लागे.

## सभ्य वर्तणूक

सभ्यपणा हा ह्याच्यात मोठा गुण आहे. बायकाची कुचेष्टा येथे सहसा होत नाही. रात्री बेरात्री रस्त्यानें, आगगाडीत, बसमध्यें बायकानी कोठेंहि निर्धास्त जावे. त्यांजकडे वांकड्या नजरेनें सहसा कोणी बघणार नाही. हेंच आम्ही बायका मुंबई–कलकत्त्यासारख्या शहरी करूं शकू काय ? दुकानांतील, उपाहारगृहांतील सर्वच नोकर लोक की, ज्यांची जनतेच्या आश्रयावर भिस्त आहे ते मोठ्या आदबीनेंच नव्हे तर हसतमुखानें आपल्याशीं वागतात. दुर्मुखलेल्या चेहऱ्याचा नोकर विरळा. लंडन येथील Lyons and Co. Ltd. कंपनीची शेकडों उपाहारगृहें आहेत. ह्या कंपनीचें तत्त्व Courtesy and Efficiency असे आहे व तशी प्रत्येकाची खात्री पटते.

पोलिस देखील तुमच्याशी हंसतमुखानें बोलेल. तुम्ही पोलिसाशी बोलत नसून आपल्या एकाद्या मित्राशीच बोलत आहां अशा प्रकारचें त्याचें वर्तन असतें. आम्ही ज्या बोटीने विलायतेस गेलों त्याच बोटीनें परत येत आहोंत. येथे सर्व वाढपी गोव्याचे आहेत. ते कामात हुषार आहेत. परतु चेहरे निर्विकार व गंभीर; ही जी गोष्ट सहा महिन्यापूर्वी मनात आली नाही, ती आज विरोधामुळें जास्त जोरानें बिबत आहे.

लंगडा–पांगळा, आजारी किवा एकादा इसम पाय सरकून रस्त्यांत पडला तर ताबडतोब जवळचे लोक त्याचे मदतीस धांवतील. हे लोक एरव्हीं तुसडे, आपण होऊन कोणाशी बोलणार नाहीत, पण वेळप्रसंग आला असतां मदतीस एकदम पुढे उभे. चालत्या जिन्यावरून (Escalator) प्रथम पुष्कळ गंमती होतात. ह्याचा अनुभव आम्हास आला. एकमेकांबद्दल कुत्सित टीका करणें वगैरे दोष इकडे फारच कमी प्रमाणांत आहेत. दुकानदारांस किंवा त्यांच्या नोकरांना गिऱ्हाइकास खुष करून आपला माल कसा खपवावा हें उत्तम कळतें. हंसतमुखाने, कंटाळा न दाखवितां हे आपल्यास नाना वस्तू दाखवितात, मग गिऱ्हाईक त्या घेवो किंवा न घेवो. Thank you, sorry व हंसतमुख ह्यांचें शिक्षण इकडील लोकांना बाळपणापासूनच मिळत असतें. ह्या गोष्टी वरपांगी असतात असें जरी कोणी म्हटलें तरी त्याचा व्यवहारात पुष्कळच उपयोग होतो ही गोष्ट मात्र खास.

## कार्यांत कुशल

जीवनयात्रा इतकी कठिण होत चालली आहे की, प्रत्येक जण आपल्या कामांत निष्णात (Efficient) असल्याशिवाय त्याचें चालणारच नाहीं. कोणताही धंदा घ्या, मजुरापासून तों वरपर्यंत जो तो आपापल्या कामांत निपुण असल्याचें दृष्टोत्पत्तीस येतें. इकडील पोलिसांस तरी किती माहिती असते. शिपी घ्या, लोहार घ्या, जो तो आपल्या कामांत तरबेज असतो.

येथें कोणालाही स्वतःचें काम ( Manual Labour ) करण्याची लाज वाटत नाहीं. सर्व कामें स्वतःच करावीं लागतात. प्रवास करतांना सामान ज्याचें तो उचलतो. बायका देखील दोनदोन मोठमोठ्या सूट केसेस

हातांत घेऊन लगबगीने प्लॅटफॉर्मवरून जातांना पाहून कौतुक वाटतें. लहान मुलांच्या हातांत त्याचें चिमकुलें सामान दिले जातें. फर्स्ट क्लास-मधून प्रवास करणारेसुद्धां आपलें सामान आपणच उचलतात व त्यांत काहीं कमीपणा आहे असें कोणासही वाटत नाही.

## स्वतःचें काम स्वतः करणें

सकाळीच गॅरेजमध्ये स्वतःची मोठ्या किमतीची मोटार स्वतः मळके कपडे घालून लोक (बायका सुद्धां) पुसतात. नंतर हेच लोक चांगले कपडे घालून ऐटीने मोटार हांकीत जातात. वॉश्स्टँड, बाथटब, कमोड प्रत्येक आपलें काम झाल्यावर हाताने धुवून पुसून साफ करितो. प्रत्येक वस्तु स्वच्छ, चकचकीत दिसावी ही प्रत्येकाची आवड. त्याप्रमाणें जो तो आपण होऊन अंगमेहनतीनें तसें करतो. हॉटेलच्या मॅनेजरणी शिकलेल्या, बराच पगार मिळविणाऱ्या, सकाळीच उठून गालिचे, फर्निचर स्वतः साफ करीत असलेल्या पाहून आपणास अशा तऱ्हेचें काम स्वतः करण्याची लाज कां वाटते व विशेषतः विलायतेंत राहून शिकून आलेल्या आपल्या लोकांस ही लाज कां वाटते याचे आश्चर्य वाटतें.

घरची मालकीण सकाळपासून सध्याकाळपर्यंत काम करीत असते. घर व सामान साफ करणें, कपडे धुणें, इस्त्री करणें, घराच्या भिंतीस कागद लावणें, परसांत भाजी व फुलझाडे लावणें, बाजार आणणें, स्वयं-पाक करणें, मुलें फिरवून आणणें, इत्यादि सर्व कामें ५००।६०० रुपये ज्यांच्या घरांत पगार येतो अशांच्या बायकाही हातानें करतात.

स्वहस्तें निदान स्वतःच्या घरीं कोणतेंही काम करण्याची लाज नाहींशी व्हावी म्हणून आम्हीं आपल्या मुलीस लंडनजवळील Dr. Barnardo's Girls' Village Home मध्यें मुद्दाम महिनाभर ठेवली होती. येथें जवळजवळ २००० अनाथ लहान मुलींची राहावयाची व शिक्षणाची सोय लोकांकडून मिळालेल्या धर्मादाय पैशावर केली जाते.

## व्यायाम

प्रत्येक जण आपल्या शरीराची फारच काळजी घेतो. शरीर सुंदर

दिसण्याचा प्रत्येकाचा आटोकाट प्रयत्न. प्रकृति उत्तम असल्याशिवाय शरीर सुंदर कसे दिसणार म्हणून म्हातारे लोकदेखील नियमाने व्यायाम घेतात. हाईड पार्कमध्ये श्रीमंत घोड्यावर बसतात, तर गरीब पोहतात किंवा पळतात. इकडील माणसांत पळण्याची लाज नाही. आपली मनःस्थिति निराळी. माझ्याच मुलीस हाईड पार्कमध्ये पळण्याची लाज वाटते.

हवा थंड असून सुद्धां सारखा झिमझिम पाऊस पडत असतांना मोकळ्या हवेंत नियमानें सर्व जण फिरतात व आपल्या मुलाना बरोबर किंवा गाडींत घालून नेतात. लुळेपांगळे आपली गाडी आपणच चालवितात, पण बाहेर जातात !

## खूप काम

ह्यामुळें लोक सशक्त, लठ्ठपणा कमी आणि तरतरीत दिसतात. व्यायामाची महति लहानपणापासून आईबाप व शिक्षक मुलाच्या मनावर ठसवितात. कोणी कोणास म्हातारे म्हणून संबोधिलें तर तो मोठा अपमान वाटतो. खरोखरीच ५०–६० वर्षे वयाच्या बायका व पुरुष तरुणाप्रमाणें जोमदार व उत्साही असतात. ह्यास योग्य खाणे वगैरे गोष्टींची जोड आहेच. Work while you work, play while you play हा त्यांचा बाणा. जीवन-कलह इकडेही कठिण होत चालला आहे. प्रत्येकास खूप काम केल्याशिवाय पैसा मिळत नाहीं. मजूर लोकांना काम न मिळाल्यास सरकारातून थोडी मदत होते हें खरें, परंतु ती पुरेशी नसते. थंड हवा व नेहमीं पाऊस ह्यामुळे इकडील लोकांच्या गरजा साहजिकच अधिक. पायापासून डोक्यापर्यंत गरम कपड्यांची आवश्यकता. पायांत बूट पाहिजे-तच, शरीरांत उष्णता राखण्यास खाणें जास्त सात्त्विक लागतें. तसेंच अंथरूण-पांघरूण जास्त लागतें. ह्यामुळें राहणी महागाईची झालेली. शिवाय ह्यांच्या इतर गरजाही फारच वाढलेल्या आहेत. ज्या गोष्टी आपल्याला चैनीच्या वाटतात, त्या इकडे अगदी आवश्यक वाटतात.

## जीवनकलहाची तीव्रता

आळशी माणसाची येथें धडगत नाहीं. मुलें व मुली मोठ्या झाल्या

व त्यांचें सक्तीचें शिक्षण संपलें कीं त्यांपैकीं पुष्कळांना लागलीच पोटाच्या मार्गास लागावें लागतें. आईबाप मग पोसायचे नाहींत. सकाळपासून संध्याकाळपर्यंत थंडीत, बर्फांत, पावसांत काम करताना ह्यांना पाहिलें म्हणजे इकडे जीवनकलह सोपा नाही, ह्याची खात्री पटते. प्रत्येक जण स्वावलंबी व आपले काम लक्षपूर्वक करतो. पाठीवर सारखी देखरेख करण्यास कोणी लागत नाही. काम संपल्यावर प्रत्येकास काही करमणूक ही हवीच. म्हणून नाटकें, सिनेमा, खेळ, नाच, बागेत सहली वगैरेसाठीं बहुतेक सर्व जण काम संपल्यावर जातातच व कामाने आलेला शीण घालवितात. यामुळें दुसऱ्या दिवशीच्या कामास तरतरी येते. रात्रीं सगळ्यांना झोंप पुरी व्हावी म्हणून ११॥–१२ वाजता सर्व करमणुकीचे प्रकार बंद होतात. प्रत्येकास घरांतील नोकराचाकरांपासून तों थेट वरपर्यंत आठवड्यांतून एक दिवस पूर्ण सुटी मिळालीच पाहिजे. त्या दिवशी विशेषतः उन्हाळ्यांत पुष्कळसे लोक शहर सोडून समुद्रकाठीं, बागेत वगैरे जाऊन मजेनें दिवस घालवितात.

## मजेची सफर

काम संपवून घरी आल्यावर कामाबद्दल ते विचार करीत नाहींत. वर्षांतून प्रत्येकास ऑगस्ट महिन्यामध्यें १५ दिवस सुटी मिळालीच पाहिजे. गरीब-श्रीमंतास हा नियम सारखाच लागू. ह्या सुट्टीत प्रत्येकजण होतां होईल तों घर सोडून दूर जातो व हे १५ दिवस मजेंत घालवितो. गरीब लोक पाठीवर बोचकी बांधून चालतात तर पुष्कळ जण सायकलवरून एकामागें एक बसून जातात. कारखानदार दर आठवड्यास वेतनांतून कांहीं रक्कम कापून ती ह्या सुटीतील खर्चाकरितां बाजूस ठेवून देतो. व अशा प्रकारें मजुरांस सुद्धां बायकामुलें घेऊन बाहेर हिंडून समुद्रकांठीं राहून आपला वर्षाचा शीण घालवितां येतो. आपल्याकडे किती तरी लोक असे आहेत कीं, ते वर्षांनुवर्षे आपलें घर, आपलें गांव सोडून बाहेर गेलेले नाहींत. अकाली वार्धक्याची छटा किंवा तरुणपणीं म्हाताऱ्यास शोभणारे विचार ह्यास पुष्कळ अंशीं आपली ही कूपमंडूक वृत्तीच कारणीभूत आहे.

## स्वच्छता

इकडील स्वच्छता दिखाऊ, कपडे स्वच्छ तर अंग घाण, बाहेर चकचकाट तर स्वयंपाकघर घाण वगैरे कल्पना आपल्यामध्यें रूढ आहेत. हें जरी खरें असले तरी एकदरीत सार्वजनिक स्वच्छतेचें प्रमाण पुष्कळच पुढें गेलेलें आहे. हॉटेलें, उपाहारगृहें, मोऱ्या, बागा, रस्ते, दुधाच्या डेअऱ्या ह्या पुष्कळच स्वच्छ असतात. ह्याचें प्रत्यंतर म्हणजे इकडे देवी, कॉलरा, प्लेग वगैरे घाणीने उद्भवणाऱ्या रोगाचें जवळजवळ उच्चाटन झालेलें आहे. सहसा लहान मूल सुद्धां कागदाचें चिठोरें रस्त्यात फेंकीत नाही, तें त्याकरितां ( Litter ) म्हणून ठेवलेल्या डब्यांत टाकतात. रोगराई कमी होण्याचें दुसरें कारण म्हणजे इकडील लोकांना रोगाचा प्रतिबंध कसा करावा याबद्दल व्याख्याने, सिनेमा, वर्तमानपत्रें वगैरे प्रकारांनी माहिती दिली जाते. रोग झाल्यावर औषध घेण्यापेक्षां रोग होऊं न देण्याचीच खटपट करणें जास्त चांगलें हें तत्त्व इकडे जारीनें अमलांत आणिलें जात आहे.

## सहकारी तत्त्वाचें वळण

दुधाची महति नाना प्रकारें जनतेच्या मनावर बिंबवण्याची, व प्रत्येकानें जास्त दूध प्यावें याची Milk Marketing Board जारीनें खटपट करीत आहे. तसेच भाज्या, फळें ह्यांची महति लोकांस पटवून देण्यांत येत आहे. दूध, फळें वगैरे रोगप्रतिबंधक अन्नें (Preventive foods) जनतेस, गरीबांस सुद्धां, मिळावीत म्हणून निरनिराळ्या संस्थांचा प्रयत्न चालू आहे. लहानमोठे धंदे संघ करून (Small Limited Company) चालविण्याची प्रथा इकडे फार आहे. लहान लहान उपाहारगृहें, सिनेमा थिएटरें, भाजीपाल्याचीं दुकानें, बसेस, कापडाची दुकानें, शिप्याचीं दुकानें वगैरे सर्वच अशा प्रकारची जास्त. यामुळें तोट्यापेक्षां फायदा जास्त आहे असें मला वाटतें. आपल्याकडील अशा प्रकारचे धंदे पाहिल्यास ते फार दिवस चांगले चालत नाहींत, असें दृष्टोत्पत्तीस येतें. एकादें दुकान, एकादी खाणावळ, एकादी डेअरी चांगल्या रीतीनें चालली असल्यास त्यांचें श्रेय फक्त एकदोन माणसांसच असतें. तीं माणसें गेलीं कीं पुनः सर्व अंधःकार.

Limited Concerns केल्यामुळे सचोटीचें प्रमाण जास्त राहूं शकते. कारण वाईट माल, शिळा माल किवा नासलेलें दूध विकण्याची प्रवृत्ति साहजिकच कमी होते. संघशक्तीमुळे अशा संस्थांस नेटाने कार्य करण्यास जोर येतो, व त्यामुळें आपल्यास लागणाऱ्या सोयी वगैरे सरकार, म्युनिसिपालिटया यांचेकडून लवकरच करून घेतां येतात.

London Transport ही संस्था लंडनमधील बसेस टयूबस् (Under ground Railway) व ट्रॅम्स चालवीत आहे; व हा प्रचंड खटाटोप अगदी सुरळीत चालला आहे. ह्याचप्रमाणे गावोगावी जाण्याच्या बस सर्व्हिसेस संघशक्तीच्या जोरावर फारच उत्तम चालल्या आहेत. ह्याच आपल्याकडील Bus Services घ्या. एकही ऊर्जितावस्थेत फार दिवस राहात नाहीं. एकानें एक धंदा सुरू केला की दुसरा आलाच त्याच्यामागून, मग दर कमी करण्याची चढाओढ व शेवटीं दोघांचेंही दिवाळे. हल्ली दुधाचा धंदाही अशाच प्रकारचा झाला आहे.

इकडील माणसांत 'नादा व नांदू द्या' ही प्रवृत्ति जास्त दिसते. अनुकरण हें मनुष्यस्वभावास स्वाभाविकच आहे. परंतु एकाद्यानें एकादा धंदा सुरू केला व त्यास त्यापासूनच मिळकत होऊं लागली असें दिसताच एका मागून एक दुसरेही तोच धंदा सुरू करीत नाहीत. शक्य तितकी प्रत्येक जण नवीन क्लृप्ति काढतो व एकमेकांच्या पोटावर पाय देत नाही.

## उच्च राहणी

मनुष्यप्राण्यास जगण्यास हवा, पाणी, अन्न व थंडी निवारण्याकरितां कपडे एवढें असलें म्हणजे झालें. बाकीच्या सर्व वस्तू चैनीखातर म्हणून म्हणतां येईल. ह्या वस्तू आज इतक्या असंख्य झाल्या आहेत, व ह्या तयार करण्यास हजारों माणसें खपत आहेत. मनुष्यानें आपल्या गरजा एकदम कमी केल्यास हीं माणसें काम नसल्यामुळें उपाशी मरतील. आज जगांत कोटयवधि माणसांचें पोट अशा गोष्टी केल्यामुळें भरत आहे. आज अमेरिकेंत १०।१०-१५।१५ वर्षांच्या उधारीनें अशा वस्तू मिळत आहेत. प्रत्येक महिन्यास हप्ते भरले म्हणजे झालें. ह्याचा परिणाम अशा वस्तूंचा

खप एकदम वाढण्याकडे झाला व जास्त लोकांस कामें मिळू लागलीं. आज ही उधारीची पद्धत बद केल्यास लाखो लोक बेकार होतील.

युरोपियन राष्ट्रात Standard of living मोठें आहे. (राहण्याचा दर्जा उच्च आहे.) ह्यामुळे कारखाने जास्त व त्यामुळे साहजिकच जास्त माणसांस काम मिळतें. एकदा उच्च राहणीची संवय झाली म्हणजे मनुष्याचे त्यावाचून अडते व ह्याचा परिणाम त्या वस्तू मिळविण्याकरितां मनुष्य जास्त धडपड करतो. आपल्या देशात ह्याच्या उलट प्रवृत्ति आहे. म्हणजे होता होईतो, शक्य तितक्या गरजा कमी करावयाच्या व हें आयुष्य क्षणभंगुर आहे, जग ही माया आहे, अशा तऱ्हेनें देवानें ह्या जगांतील दिलेले आयुष्य हरि हरि म्हणण्यांत घालवावयाचें. ही मनःस्थिति आपल्या हल्लीच्या परिस्थितीस पुष्कळच कारण आहे. आपणांस जगाच्या मागे राहावयाचे नसल्यास, आपणांसही आपली राहणी वाढविली पाहिजे व निदान तरुण वयात तरी निवृत्तिपर विचारास जागा देता उपयोगी नाही.

## स्वदेशप्रेम

यूरोपमधील कोणत्याही राष्ट्रांत जा, तेथे प्रत्येकास आपल्या देशाबद्दल व आपल्या लोकांबद्दल अतिशय प्रेम दिसून येतें. हॉटेलमधील वाढपी लोकांपासून तो मोठ्यांपर्यंत बोलतांना त्याजमधील स्वदेशप्रेम दृष्टीस पडतें. प्रत्येकास आपल्या राष्ट्राबद्दल अभिमान वाटतो, व आपलें राष्ट्र जगांतील सर्व राष्ट्रांपुढें राहावे म्हणून त्याची त्याकरितां वाटेल तें करण्याची तयारी असते. हें प्रेम पुरुष-बायकांना सारखेंच वाटतें व ह्याचा परिणाम म्हणजे प्रत्येक घर हें ह्या शिक्षणाचें माहेरघरच बनतें. ही स्वदेशभक्ति, राष्ट्रप्रेम अगदी लहानपणापासून मुलांच्या मनांत भिनवितात. Ours is a wonderful Nation. This tiny little Island of ours. We like it best. वगैरे उद्‌गार नेहमी ऐकूं येतात. वर्तमानपत्रांतील जाहिरातीत सुद्धां अमक्या कपनीच्या वस्तू विकत घ्या असें लिहिलेलें असतेंच. परंतु त्याच्याखाली असेंही लिहिलेलें असतें की, आमची वस्तू विकत न घेतल्यास निदान आपल्या देशांत तरी तयार केलेली वस्तु घ्या.

वरील वाक्य पैसे देऊन वर्तमानपत्रांत छापण्यांत स्वदेशाभिमान किती दिसतो तें सांगणें नकोच.

पुष्कळ दुकानांतून परदेशी तयार वस्तू विकावयास ठेवलेल्या असतात. पण त्याचेखाली 'परदेशी (Foreign)' म्हणून चिठी ठेवलेली असते. व्यक्तीपासून तों थेट मोठमोठ्या संस्था, म्युनिसिपालिटचा, सरकार वगैरे सर्वांचेंच ह्या गोष्टीकडे अतोनात लक्ष असतें.

## वक्तशीरपणा

वक्तशीरपणाचें शिक्षण लहानपणापासून घरीं सुरू होतें. शिस्त व वक्तशीरपणा चुकल्यास मुलाचे लाड होत नाहीत. प्रकृति दणकट होण्याबद्दल अगदीं तान्ह्या मुलापासून, इतकेच काय पण मुले आईच्या पोटात असल्यापासून काळजी घेण्यांत येते. आई गरीब असल्यास कारखान्यातून, हॉस्पिटलमधून वगैरे तिला पोषक अन्न मिळण्याची सोय होते. त्याचप्रमाणें गरीब मुलांस अगदी थोडचा खर्चानें किंवा फुकट सुद्धां नियमाने शाळेंतून दूध मिळतें. त्यांची शरीरप्रकृति वरचेवर तपासली जाते. कांही विकृति असल्यास त्यावर एकदम उपाय केला जातो. त्यात श्रीमंत गरीब असा फरक नाही; परंतु राष्ट्रांतील लोकात परावलंबीपणा उत्पन्न होऊं नये म्हणून ज्यानें त्यानें आपल्या ऐपतीप्रमाणें औषधोपचारास पैसे खर्च केले पाहिजेत, असा नियम आहे. उदाहरणार्थ, शाळेंत मुलाचा दांत उपटून काढावयाचा असल्यास आईला प्रथम सांगतात कीं, ह्या गोष्टीस इतका खर्च येईल. त्यापैकीं तुम्हांला इतकी रक्कम द्यावी लागेल. एकदम ही रक्कम देणें शक्य नसल्यास ती हप्तेबंदीनें देण्याची सवड देतात. परंतु हे हप्ते थकले तर मात्र सूट मिळत नाही. पण ही रक्कम त्या आईकडून वसूल करण्याकरितां County Councils त्याच्या किती तरी पट जास्त खर्च करितात. हें कशाकरितां तर आपल्या लोकांना शिस्त व वक्तशीरपणा यावा म्हणून.

## मुलांच्या शिक्षणाची सोय

प्रत्येकास पोहावयास शिकविनात. इतर मर्दानी खेळ खेळावेच लागतात. ह्यांत शिक्षक व शिक्षकिणी मोठ्या आनंदानें भाग घेतात. शाळेत जाण्यांत मुला-मुलींना हौस वाटते व शाळाच अशा तऱ्हेच्या असतात व तेथील सर्व वातावरणच असे असते की ही हौस मुलांमध्यें साहजिकच उत्पन्न होते. London County Council च्या शिक्षणखात्यांत १३ वर्षे काम करीत असलेल्या, London University चा ग्रॅज्युएट असलेल्या, अशा एका ब्रिटिश शिक्षकाशी त्या बाबतीत आम्ही पुष्कळ बोललों. आज १३ वर्षांच्या माझ्या कारकीर्दीत शाळेंत एकही मुलगा एकदांही उशिरानें आला नाही, असे त्यांनी मोठ्या अभिमानानें आम्हांस सांगितलें. असें होण्यास शिक्षकांस सुद्धां अत्युत्तम व आदरणीय वर्तन ठेवावें लागतें. मुलापेक्षाही शंभरपट जास्त वक्तशीरपणा, सहनशीलता, सचोटी, न्याय वगैरे गुण शिक्षकांत असावे लागतात, व अशीच माणसें ह्या धंद्यांत शिर-तात. वर लिहिलेले गृहस्थ बऱ्याचशा मोठ्या हुद्द्यावर आहेत; परंतु त्या मानानें त्याचें वेतन कमीच म्हणजे महिना जवळजवळ ३०० रुपये. पण इकडे डॉक्टरास व शिक्षकास समाजात फार मान देतात. मास्तर म्हणून त्याची कुचेष्टा किंवा त्याकडे दुर्लक्ष करीत नाहीत. पुढील पिढी चांगली निपजण्याची किती तरी जबाबदारी ह्या मास्तरावर अवलंबून असते. यूरोपमध्यें हल्लीच्या नवमतामुळें वैवाहिक जीवनांत फरक पडला आहे व गृहसंस्था मोडत आहेत. अशा स्थितीत मुलाच्या शिक्षणाची जबाबदारी लहानपणापासून शाळांवर जास्त जास्त पडत आहे. शाळेंतील शिक्षण अशा प्रकारचें असतें की, प्रत्येकास आपली उपजीविका सहज करतां यावी. संसारांत लागणाऱ्या वस्तू किंवा करावी लागणारी कामे कशी करावींत ह्याबद्दल शाळेंत शिक्षण मिळतें. सुतारकाम, लोहारकाम, भिंतीस कागद चिकटविणें, रंग लावणे, फर्निचर करणे, पॉलिश करणें, कपडे शिवणें, टाइपरायटिंग, शॉर्टहॅण्ड वगैरे शाळांतून शिकविले जातें. अर्थात् बायकांच्या उपयोगी कामें बायका शिकतात.

वर लिहिलेल्या शिक्षकांचें स्वतःचें घर आहे. कपडे धुणें, इस्त्री करणें, स्वयंपाक करणें, भांडीं घासणें, बाजारांतून सामान आणणें, घरांतील सर्व कामें बायको करते. घरांतील सर्व उत्तम फर्निचर त्यांनीं स्वतः केलें आहे.

पलंग, कपाटें, ड्रेसिग टेबलें वगैरे. आणि ते खरेंच अतिशय उत्तम आहे. घरामागील परसांत भाज्या, फुले त्या दोघानी लाविली आहेत. घराच्या भिंतीस कागद चिकटविणें, रंग देणें वगैरे गोष्टी स्वतःच करितात. अशा तऱ्हेची कामें आम्ही हातानें न केल्यास आमचे चालणारच नाही असें ते म्हणतात.

अशा तऱ्हेच्या शिक्षणामुळे प्रत्येक जण कसा स्वावलंबी बनतो व त्यामुळे प्रत्येक जण ह्या संसारातील लागणाऱ्या अवश्य वस्तू कशा स्वतः करूं शकतो हें दिसेल.

## शिक्षणदानाचे प्रकार

१४ वर्षापर्यंत सक्तीचे शिक्षण देऊन कार्य भागत नाही. तर हें शिक्षण पुढें जागृत ठेवण्याकरितां निरनिराळे प्रयत्न करावे लागतात. ह्याकरिता इकडील कौन्टी कौन्सिले म्हणजे आपल्याकडील म्युनिसिपालिटया, प्रौढांच्या शिक्षणाची सोय नाना प्रकारांनी करतात, व तें जवळ जवळ फुकट मिळू शकतें. प्रत्येकाच्या आवडीप्रमाणे, गरजांप्रमाणे, निरनिराळया विषयांवर अशा तऱ्हेचें शिक्षण सायंकाळी कामावरून परत आल्यावर मिळतें. त्याचप्रमाणे वाचनाचा नाद लागल्यास, किवा मिळालेलें शिक्षण जागृत ठेवण्यास लायब्रऱ्या, वर्तमानपत्रें ही साधने फारच थोडक्यांत किंवा फुकट देखील आहेत. पैसे अनामत न ठेवता पुष्कळशा Circulating Libraries मधून दोन दोन पुस्तके घरी नेण्यास मिळू शकतात.

अशा प्रकारचें शिक्षण म्यझिअम्सच्या द्वारें मिळतें. प्रत्येक मोठया शहरी अशी म्यूझिअम्स आहेत व तेथें आठवडयांतून कांही दिवस निरनिराळया विषयांवर फुकट व्याख्यानें मोठमोठया विद्वान् माणसांकडून दिलीं जातात.

जन्मास आलेल्या प्रत्येक मुलास शरीरास पोषक अन्न व त्यास स्वावलंबी होण्याकरितां लागणारे शिक्षण मिळण्याचा जन्मसिद्ध हक्कच आहे असें इकडे प्रत्येकास वाटतें व तसें होण्याकरितां लोकांची सारखी चळवळ चालू आहे. शाळेंतून फुकट दूध देणें हा या चळवळीचाच परिणाम आहे.

श्रीमंतावर कर जास्त जास्त वाढत आहेत व त्या करांतून गरीब लोकांना जास्त जास्त मदत होत आहे. पूर्वी मजुरास जास्त तास काम करावें लागे तर मध्यम वर्गांतील लोकांस त्या मानानें कमी तास काम करावें लागे. हल्ली मजुरांचे तास कमी होत असून, मध्यम व वरील वर्गांतील लोकांच्या कामाचे तास वाढत आहेत. ह्याचा परिणाम आगगाडींतून होणाऱ्या रहदारीवर झाला आहे. काही वर्षापूर्वी सकाळीं दोन वेळां रहदारीत गर्दी होत असे. एक अगदी पहाटे मजुरांची कामावर जातांना, व नंतर २–३ तासांनी मध्यम वर्गाची कामावर जातांना. वर लिहिलेल्या परिस्थितीमुळे मजूर लोक उशीरा कामावर जाऊं लागले तर मध्यम वर्गांतील लोकास हल्ली कामावर लवकर जावें लागते. त्यामुळे सकाळी एकाच वेळीं रहदारीची जास्त गर्दी अलीकडे होऊं लागली आहे.

आमची उन्नति, सुधारणा, सचोटी वगैरे सर्व सार्वत्रिक सक्तीच्या शिक्षणानें झाली म्हणून मोठमोठे अधिकारी लोक मोठ्या अभिमानानें सांगतात. १०० वर्षापूर्वी वरीलपैकीं पुष्कळसे गुण आमच्यांत नव्हते असें ते म्हणतात. हिंदुस्थानी मनुष्य व्यक्तिशः जगातील कोणत्याही राष्ट्रांतील हुषार माणसाची बरोबरी करूं शकतो; त्याच्या पुढेही जातो हें आज जगप्रसिद्ध आहे. लंडनमध्यें Piccadilly Circus म्हणून जी अगदीं गर्दीची पेठ आहे तेथें एका ठिकाणीं जगांतील आजपर्यंत Noble Prize मिळविलेल्या गृहस्थांचे फोटो लावले आहेत. त्यांत कविवर्य टागोर, व शास्त्रज्ञ सी. व्ही. रामन यांचे फोटो पाहून कोणाही हिंदुस्थानी माणसास मोठा अभिमान वाटतो, व अशा प्रकारचीं व्यक्तिशः मोठीं माणसें आपल्या देशांत असून आपण असे कां, असा प्रश्न मनांत येतो. त्यास बहुत अंशीं कारण म्हणजे आपल्यांत सामुदायिक गुणाची उणीव हेंच होय.

## समाजसेवेचीं अंगें

हल्लींच्या परिस्थितीस दोष न देतां किंवा आमच्या हातांत हें नाहीं तें नाहीं, असें म्हणत न बसतां आपण जें आपल्या हातांत आहे तें तरी एकदम केलें पाहिजे. प्रत्येकानें मनावर घेतल्यास शिस्त, सचोटी, आदबी वगैरे

गुण राष्ट्रांत झपाट्यानें वाढतील. शिक्षण मिळालेल्या प्रत्येक इसमानें निदान आपल्या घरच्या सर्वांस—आया, बहिणी, नोकर वगैरे सर्वांस—स्वतः शिक्षण द्यावें. त्यांस शिस्तीची, सचोटीची, आदबीची संवय स्वतःच्या वर्तनानें लावावी. आपल्या बायकांना प्रथम बळकट व सुशिक्षित करा म्हणजे पुढील पिढी जास्त जोमदार निपजेल.

ज्यास ईश्वरानें चांगली स्थिति दिली असेल त्यानें स्वतःच्या खर्चानें मास्तर ठेवून किंवा गरीब मुलांस शाळेत पाठवून त्यास शिक्षणाची गोडी लावावी. आपण वर्तमानपत्रे घेऊन ती गरिबांस वाचावयास द्यावींत. व्यायाम व मोकळ्या हवेत फिरण्याचें महत्त्व प्रत्येकास पटवून द्यावें. डॉक्टरांनीं शाळेंतील मुलांची तपासणी फुकट किंवा फारच थोडी फी घेऊन करावी. रोग न होऊं देण्याबद्दल काय काळजी घ्यावी, ह्याबद्दल जागजागी व्याख्यानें, सिनेमा, वर्तमानपत्रें, ह्यांच्या द्वारां लोकास माहिती द्यावी. गरिबांच्या मुलांस शाळेतून फुकट दूध मिळण्याकरितां प्रत्येक शहराच्या पुढारी माणसांनीं झटावें. म्युनिसिपालिटीकडून फारशी मदत होणें शक्य नसल्यास गांवच्या श्रीमंत लोकांकडून वर्गणी करून त्यांतून हा खर्च भागवावा. निदान पुढची पिढी तरी निरोगी, सशक्त, सुशिक्षित, कार्यक्षम होण्याबद्दल आपण प्रत्येकानें झटावें.

आपण आपला परावलंबीपणा प्रथम घालविला पाहिजे. आमच्याच बोटीवर किती तरी इंग्लिश, अमेरिकन, मिशनरी व इतर मंडळी आहेत. Mrs. How Martin ह्या संततिनियमनाचा प्रसार करण्याकरितां, तर एक स्विस् गृहस्थ बिहार धरणी कंपांतील लोकांना घरेंदारें, जमीन ह्या बाबतीत मदत करण्यास, तर दुसरे एक मध्यप्रांतांतील गोंड लोकांची भीषण परिस्थिति सुधारण्यास जात आहेत. ह्यांपैकी कांहीं लोक आपल्या देशांतील खर्चानें जात आहेत. त्यांच्या उद्योगप्रियतेचें कौतुक वाटतें. पण आपण असे कां ? आमची कळकळ करण्यास बाहेरचे लोक कां यावेत ? आपण हीं कामें कधीं करणार ? ह्याबद्दल आपण इतके उदासीन कां ? वगैरे प्रश्न पुढें येऊन मन खिन्न होतें.

---

Kaiser-i-Hind
29-5-1936.

*My Dear* × × × ×

The last parting was sad indeed. From our boat I was watching you for a few hours, and the others though out of sight were before my mind. Everyday we are going 360 miles away from you.

Upto Aden we were all sea-sick. The boat was rolling too much. The weather was stuffy and the cabin a black hole. To go to the bathroom was a great punishment. There was no desire for food. We all were in deck chairs all the time.

We left Aden on Wednesday night and now we are passing through the Red Sea, which is quite calm. The steamer is steady and there is some life now.

There are more than 75 Indians travelling with us about 50 being students. The food arrangements are good.

The life on the steamer is enjoyable, varied and full of mirth for those with a jolly temparament. We have made a few acquaintances. There is a definite and studied aloofness between the whites and the blacks though the treatment is all that one would wish for.

More in my next, with best wishes,

Yours sincerely,
*Sarojini.*

   

C/o Thomas Cook and Sons,
Berkley Street, Piccadilly
London W. I.
2nd July 1936

साष्टांग नमस्कार वि. वि.

आम्ही हाईड पार्कजवळ एका हॉटेलमध्ये राहतो. एका वेळेस आपलें जेवण कसले तरी मिळतें. येथे बहुतेक लोक आपलेच राहतात. त्यामुळें आपलेपणा वाटतो. दुपारचे जेवण व चहा सोडून तिघाना आठवड्याचे ८ पौंड पडतात. येथे सर्व महाग. बहुतेक लोक Lunch बाहेर हॉटेल-मध्येच घेतात. घरामध्ये Maid शिवाय फारसे कोणी दिवसभर नसते. स्वयंपाक, आंघोळ, वगैरेची घाई सकाळी दिसत नाही. जमिनी पुसणे, झाडणे, अशी सफाईची कामे मात्र पाहून घ्यावीत. रस्त्याने झुडीच्या झुडी दिवसरात्र दिसतात. त्यामुळे सर्व साधारण लोक लहानसा घराचा भाग घेतात. घरामध्ये दुपारचा चहा, स्वयंपाक करण्याचा त्रास नाही. केलाच तरी फार थोडा. चटकन् होण्यासारखा. त्या करण्यास सोयी फार. प्रत्येक जण स्वतंत्र. गृहिणीस कोणाकरिता ताटकळत बसणे नको. स्वच्छता दिखाऊ. हात तोंडांत घालून चोळून टाकला की पाण्याची जरुरी नाही. तेव्हां Maid ने दिलेले असे खावे लागते. बाकी वरून दिसायला घरे अति स्वच्छ. रस्ते, बागा फारच सुंदर. रस्ते खूप रुंद, घरे एकजात काळसर रंगाचीं, मोठी चकचकीत. कोठेंही गोंगाट कलकल नाही. रस्त्याने एवढी माणसे, मोटारी पण जसे कांही शांत अगदी. म्हणूनच येथले लोक सशक्त; अर्थात् चांगलें अन्न व हवा कारण आहेच त्याला. तरी पण आपल्या मुंबई कलकत्त्यांत चाळीत फ्लॅटमध्यें राहणारा मनुष्य कलकल, गडबडीला, विक्रेत्यांच्या विक्रीला, येणाऱ्या जाणारांच्या घंटा वाजविणें, दार ठोठावणे, मोटारीचे भोंगे, ट्रॅमचा खणखणाट ह्याला बेजार होऊन जातो. शांतपणा व शांतता, लहान मुलापासून थोरापर्यंत प्रकृतीस अत्यंत आवश्यक आहे. चांगलें अन्न व हवा न मिळाल्यामुळें मुंबईचीं माणसें कशी फिकी, अशक्त दिसतात.

बाकी मजकूर पुढील पत्री.

आपली
सौ. सरोजिनी

Main Street, Poona No. 1
24th July 1936.

सौ. सरोजिनीबाई देशपांडे यास सा. न. वि. वि.

आपले तारीख ८ जुलैचे पत्र तारीख २४ जुलै रोजी म्हणजे आजच सकाळी मिळाले. आपल्याकडून उत्तर आल्याचे पाहून फार समाधान वाटले. असो.

तारीख ३ जुलैच्या सुमारास माझे उत्तर हिंदुस्थानातील एक स्नेही माझ्या घरी आले होते. विचारविनिमय चालू असता, मी त्यांना आपल्याविषयी विचारिले. तेव्हा त्यांनी मला रा. देशपांडे हे महाराष्ट्रीय सद्गृहस्थ जमालपूरला ईस्ट इंडियन् रेलवेवर मोठ्या हुद्यावर असल्याचे सांगितले. आपणास पत्र लिहिण्याची स्फूर्ति झाली ती आपला 'केसरीतील एक अगत्याची सूचना' हा लेख वाचून झाली. त्यानंतर आजच्या पत्रातील आपला मजकूर वाचून विशेषच आपले कौतुक करावेसे वाटते. कारण आपण नाशकास मुलांच्या हायस्कूलमध्ये शिक्षण घेतलेले असूनही समाजकार्याविषयी आपली कळकळ आणि प्रगल्भ विचार पाहून, पुरुषी वळणाचे शिक्षण मिळालेले असतांना सुद्धा आपले थोर विचार आहेत, हे पाहून मला आपल्याविषयी आदर आणि अभिमान वाटत आहे. त्यानंतर आपला बोटीवरील अनुभव हा लेख सुद्धा उत्तम आणि चिकित्सक दृष्टीने आपण लिहिला आहे. आजपर्यंत मी विलायतच्या प्रवासाचे अनेक लेख अनेक वर्तमानपत्रांतून, आणि मासिकांतून वाचले आहेत. पण ते बव्हशी ठरीव ठशाचेच (Stereotyped) वाटतात. कांहीं तरी नावीन्य वाचावयास हवे असते त्याप्रमाणे आपले लेख आहेत; ते वाचनीय तर आहेतच पण उद्बोधकही आहेत.

आपण सप्टेंबर अखेरपर्यंत लंडन येथेच राहाल. त्यानंतर विलायतेंत आपला मुक्काम किती आहे ते कृपा करून कळवाल काय? आपल्याला यूरोपातील काही प्रेक्षणीय स्थळे पाहावयाची आहेत काय? तसा आपला मानस असल्यास तिकडे आपण जरूर हिंडून यावे, आणि तिकडील ज्ञान मिळवावें. आणि परत आल्यानंतर, आपले यूरोपखंडांतील अनुभव लेखरूपानें जरूर प्रसिद्ध करावेत. ते निःसंशय वाचनीय आणि माहितीने भरलेले असे होतील. कोणत्या मासिकांत प्रसिद्ध कराल ते मला कृपा करून कळवून ठेवावें, म्हणजे आपले अनुभव मला वाचावयास मिळतील.

विलायतेंतून हिदुस्थानांत आल्यावर पुण्यास आल्यास कृपा करून मला भेटण्यासाठी बोलवा. तुमच्या भेटीने मला फार आनद होईल.

पत्राचे उत्तर सवडीने पाठविणे. कळावे लोभ असावा हे विनंति.

(टीप.—केसरीच्या एका वाचकाकडून)

आपला नम्र,

× × ×

  

लंडन

२५–७–१९३६.

ती. वहिनीस शि. सा. नमस्कार.

तुझे पत्र मिळाले. घरचें आणि त्यांतल्या त्यांत आईचें तें पत्र; किती वेळां वाचलें तरी समाधान होत नाही. वरचेवर पाठीव ह. नाहीं तर म्हणशील एकादे वेळेस कीं आज राहिले झाल.

काल आम्ही पार्लमेट हाऊस पाहण्यास गेलों. स्वतंत्र देशांतील गोष्टी पाहिल्या म्हणजे काय करूं न् काय नाही असे होतें. पुष्कळ वेळेला चेव येतो, कधी हुषारी वाटते हुषारात राहून; कधी स्वतःच्या दुर्दशेचें दु:ख वाटून कांहींच सुचेनासें होतें. पार्लमेट पाहायला जरा वेळ होता म्हणून एका जागी सर्व पाहाणारास बसवून ठेविलें होतें. येथील सर्व भिंतीवर इंग्लंडच्या इतिहासांतील उत्तम उत्तम चित्रें आहेत. किती बोधप्रद आहेत ती ! मी बसलें होतें तेथे पाठीमागें पाहिलें तर भिंतीवर एक खूप मोठे चित्र होतें. हिंदुस्थानच्या एका मोठ्या प्रांताचें दान आमचे राजे परकीयाना करून तो खलिता देत आहेत! अगदीं चर्र झालें माझ्या पोटांत आणि चक्कर आल्यासारखें वाटलें.

किती किती गोष्टी तुला लिहूं असें वाटतें. आमच्या हॉटेलमध्येंच जेवणाच्या खोलींत एका टेबलावर एकटीच एक वृद्ध कुमारी चहाला, जेवायला बसते. अगदीं एकटी उदास अशी ती असते. यंत्रासारखी तिची वागणूक, कधीं बोललेली मला दिसत नाहीं. जेवण झालें कीं वरच्या दिवाणखान्यांत हातांत विणकाम घेऊन चूप बसते. तिच्याशीं मायेनें बोलणारें कोण

आहे? म्हातारपणी आपल्याला मुलें विचारतील अशी विवाहितांना देखील खात्री नाही. मग ही तर वृद्ध कुमारिका! बाकी पाश्चात्य ससर्गानें आमच्यांतही तीच वेळ येणार. येत चालली आहेच म्हणा. पण असल्या एकलकोंड्या जीवनाची मला दया येते तिची आणि वाटते अगदीच कां ही माणसें आमच्या संसारांत खुपतील? मुलाबाळांना याच्या छत्राचा फायदा होऊन ती परस्परांना सुखदायक नाही का व्हायची? उतारवयात आपल्याच माणसाना अशी तरुण पिढी कां सोडते! वाटतो तितका हा प्रश्न सोपा नाही. तरी पण त्या बाईची मला मात्र कीव येते खरी.

आणखी एक गोष्ट येथें दृष्टोत्पत्तीस येते. नोकराना येथे किती सुखसोयी, सवलती, कायद्यानें केलेल्या आहेत. आठवड्यातून सुट्टी, ठराविक कामाचे तास, चागलें वेतन, अन्न, हेल्थ इशुरन्स वगैरे वगैरे. नोकरांना रागें भरणे, दटावणें वगैरे कांही नाही.

पूर्वीं आपणही नोकरांना नोकर म्हणत नसू; घरच्याच सारखे समजत असू. स्वयंपाकाच्या आजीबाई, काकूबाई अगदी घरगुती असत. म्हणूनच जन्मच्या जन्म त्या एका जागी काढीत. नोकरांना ते मनुष्यच आहेत असें मानल्यास किती तरी काम सुलभ होण्यासारखे आहे. आपल्याला नोकर हवा, अखुर्डशिगी बहुदुधी ह्या म्हणीसारखा! त्याना सुट्टी, त्याना शिक्षण, औषधपाणी, वार्षिक पगारी रजा, करमणुकीची साधनें वगैरे सवलती आपण कां देऊं नयेत! त्याच्या बेकारीचा फायदा घेऊन आम्ही सधन सुशिक्षित समजले जाणारे लोक चार रुपये पांच रुपये असे त्यांच्याशी हुजत घालीत बसतों. चांगलें का हें! ज्यांना ऐपत नाही त्यांचें एक सोडून द्या. नोकरांच्यासुद्धां कामाचे तास नकोत का ठरवायला? एखाद्या वेळेस रात्रीं जेवायला दहा दहा देखील वाजतात. ह्यापुढे काम उरकन ते स्वतंत्र कधीं होणार? इकडे सात वाजतां रात्रीची जेवणे होतात. नऊ साडेनऊपर्यंत काम संपवून मग छानसे कपडे घालून प्रत्येक जण मजा करतो. रात्री अकरा वाजतां झोपायला सर्व येतात! अशामुळें दुसऱ्या दिवशी कामास मनुष्य ताजातवाना होतो. असो. पुनः जास्त माहिती दुसऱ्या पत्रांत.

तुझी

(सौ. सरोजिनी) सौ. आक्का.

**Birth Control International Information Centre,**
Parliament Mansions, London S. W. 1
17 th August 1936.

Mrs. Deshpande,
51 Lancaster Gate. W. 2.

***Dear Mrs Deshpande,***

Mrs. Guy was very interested to hear that you had visited this centre, and would be very glad to meet you before you leave this country for India.

Could you come and have lunch with her one Wednesday ? She would be very pleased to see you on Wednesday, 19 th August or 26 th August, but if neither of these two dates are convenient for you, perhaps you will let us know, when you return from the continent, so that we can fix up a date later on.

If you will come to this centre at 12–45 P. M. Mrs. Guy will meet you here.

Yours sincerely,
*Elenor Hawarden*
Organising Secretary.

  

Zurich (Switzerland.)
15–9–1936.

श्री. सेक्रेटरी भगिनी समाज, लखनौ, यांस सप्रेम नमस्कार वि. वि.

आजच्या मेलनें इंग्लंडमधील कौंटी कौन्सिलच्या काहीं कामाची माहिती तुम्हांस पाठवीत आहे. ती सर्व सभासदांस वाचून दाखवावी. सर्वांना नमस्कार.

## इंग्लंडमधील कौंटी कौन्सिलचीं कामें

कौंटी कौन्सिल म्हणजे आमच्याकडील म्युनिसिपालिटीप्रमाणें आहे. कौंटी कौन्सिल 'मुलाचा पालक त्राता' असे समजले जाते. मल जन्माला येण्यापूर्वींपासूनच, गरोदर, गरीब आयांची तें काळजी घेतें. अशा आयांची वैद्यकीय तपासणी, त्यांना पैसे नसल्यास अन्न, दूध प्रसूतिपूर्वीं व नंतर मिळण्याची व्यवस्था, प्रसूति फुकट. शिवाय मूल जन्मल्यानंतर त्याला दूध पुरविणें, त्यांची घरे अंधेरी, कमी हवा असलेली असल्यास त्यांना Dry Milk वाटतात. कारण ताज्या दुधास अशी घरे घातक असतात. मुलामुलींना शिक्षण सक्तीचें आहे. गरीबांना फुकट.

लहान मुले कामावर जाणारी त्याच्या प्रकृतीची काळजी घेणें; काम केल्यानें त्यांची प्रकृति खराब होत असेल तर त्यांना कामाची बंदी करण. अशा मुलांचे कामाचे तास पण ठराविक व बेताचे असतात.

## शाळेंतील प्राथमिक शिक्षण

हें ५ ते १४ वर्षापर्यंत सक्तीचें आहे. आंधळ्या-मुक्या-बहिऱ्यांच्या शिक्षणाची पण व्यवस्था कौन्सिल करतें. मूल शिकल्यानंतर स्वावलंबी व स्वतःचा चरितार्थ चालविण्यास समर्थ होईल असेंच जरुरीचें योग्य शिक्षण सर्वांना मिळतें. (आमच्याकडील शिक्षणासारखे कारकून बनविण्याचेंच शिक्षण खात्रीनें नाही.)

लहानपणापासूनच मूल स्वावलंबी बनावें, म्हणून आईबाप, सरकार, सामाजिक कार्यकर्ते, जिवापाड मेहनत करतात. जन्मलेली मुले ही ज्याचीं त्याचीं तर आहेतच, पण तीं राष्ट्राचीं समजली जातात आणि ह्याच भावनेनें

त्यांचें संगोपन होतें. प्राथमिक व दुय्यम शिक्षण घेणाऱ्या मुलांची वैद्यकीय तपासणी करणे ही मुलांविषयीची कामे झाली.

## खाद्यपेयांच्या सामानाची तपासणी

चरबी, तेल, लोणी, मांस वगैरे सर्व पदार्थ नीट तपासले जातात. मांसाचीं जनावरें तपासून मगच मारली जातात. कसाईखाना तपासला जातो. मांस वाईट दिसल्यास तें फेकले जातें.

चहाची, जेवण्याची Lyons सारखी दुकाने वरचेवर तपासतात. स्वयंपाकघरे पाहिली जातात आणि म्हणूनच हॉटेलमध्ये उत्तम ताजें स्वच्छ आणि घरच्याप्रमाणे अन्न मिळते. ह्याचे कारण सर्वांना शिक्षण. स्वयंपाक्यांना, वाढणाऱ्यांना भाज्या धुऊन घेणे, पदार्थ झांकून ठेवणे, वाढणे वगैरे सर्व गोष्टी अगदीं नीट शिकविल्या जातात. अशा शिक्षणाच्या शाळाच असतात मुळी. शिक्षणाने सर्व काम बिनबोभाट, व्यवस्थित व यंत्राप्रमाणे होतें.

## नॅशनल हेल्थ इन्शुरन्स

ह्यामध्ये प्रत्येक मिळविणाऱ्या माणसास विम्याकरितां पैसे भरावे लागतात. कारण येथे विभक्त कुटुंबपद्धति असल्यामुळे म्हातारपणी पैसाच काय तो कामास येईल.

## नॅशनल बर्थ-कंट्रोल असोसिएशन

ह्या संस्थेंत ज्या आईस वैद्यकीय तपासणीनंतर मूल होणे प्रकृतीस घातक आहे अशांनाच संततिनियमनाचें ज्ञान देण्यांत येतें, व त्याबद्दल सरकारी परवानगी आहे.

अशा तऱ्हेची Clinics पुष्कळशीं आहेत. तेथें डॉक्टरणी, नर्सेस व श्रीमंताच्या बायका समाजकार्य करण्याच्या कळकळीनें व हौशीनें तासचे तास कामें करतात. आपणही त्यांचा कित्ता गिरवावयास नको कां ?

तुमची

सौ. सरोजिनी देशपांडे

  

## Manchester Guardian मधील दुधासंबंधींचा एक लेख

### Your Milk a Public Service

Production and distribution of milk for human consumption should be virtually recognised as a National Public Service. Mr. Walter Elliot, the Minister of Agriculture said :—

"A sufficiency of milk it is proposed should be ensured to every child and adult as a right and necessity. The prevailing high price of milk is blamed as a main deterrent to its use in artisan and middle class homes.

"There should be no such thing as surplus milk under the present circumstances.

"Therefore, drastic reorganisation of the distributing trade is essential so that retail prices may be substantially reduced.

"The full scheme would be operated either through an expansion of the milk marketing board, or by the formation of public utility companies first of all in London on the lines of the Mertopolitan Works Board."

[ दूध हें राष्ट्राचें अन्न म्हणून कोण त्याची व्यवस्था व काळजी; आणि आमच्याकडे ? कोण लक्ष घालतो अशा बाबतींत. ]

  

Aram
Dongri, Bombay
1-10-1936.

*My Dear Mr. Deshpande,*

I cannot sufficiently thank you for your kind letter of the 22nd giving us details about the operation undergone by Mr. Tawde. Mrs. Tawde, and all the members of my family are really indebted to you and to Mrs. Deshpande for all you have been doing for Mr. Tawde in a foreign country thousands of miles away from his nearest and dearest. When I picture to myself the situation, when Mr. Tawde, was operated upon and when I picture the anxious faces of you both, I feel that had I been there I could not have done more. In a foreign country he was amongst his people, who played their part manfully, and supplied with their anxious care, the want he must have felt for the presence of his dearest and nearest.

The Marathi letter by Mrs. Sarojini Deshpande to Mrs. Tawde was a great comfort to her.

Although I do not remember to have met Mrs. Deshpande, my interest in her is certainly as great as that in my own daughters. She is a daughter of Ganeshpant Hardikar, who was my College chum in the Elphinstone College in 1892 in the B. A. class and our voluntary subject was Mathematics. Both were inmates of the residency and constantly together. In after life we often met. Her mother is a daughter of

Mr. Pendharkar, who was my colleague, being in the state service.

We are all looking to the day, when we will all have the opportunity of meeting you both, and show our gratitude.

Yours sincerely,
*B. V. Jadhav.*

  

केसरी ऑफिस,
२–१०–१९३६.

साष्टांग नमस्कार वि. वि.

माझें या पूर्वीचें सविस्तर पत्र पोहोंचलेच असेल. आतां बहुतेक आपला प्रवास आटोपला असेल व आपण परत यावयास निघाला असाल! तेव्हां ह्यानंतर आपणाकडून लेख येईलसें वाटत नाही. आलाच तर प्रसिद्ध करूं. पण आतां तेथून काही लेख पाठविले नाहीत तरी येथे आल्यावर एकदर युरोपियन समाजाची स्थिति, त्यात राष्ट्राराष्ट्राची तुलना, आणि त्यांची हिंदुस्थानशी तुलना, आणि हिंदुस्थानाने कोणत्या राष्ट्रापासून काय शिकावें, आणि कोणत्या राष्ट्रातले कोणते दुर्गुण टाळावेत ह्यासबंधीचा एक सकलित लेख लिहून द्याल अशी आशा आहे. यासंबंधाने आपण इकडे येऊन पोहोंचल्यावर खुलासेवार लिहालच. क. लो. अ. हे विनति.

आपला,
ज. स. करंदीकर

  

Vice Chancellor's Lodge. Lucknow,
12-10-1936.

सौ. सरोजिनीबाईस सप्रेम अनेक आशीर्वाद.

तुमचें सविस्तर हकीकतीचे मोठे वर्णनपर पत्र वाचून आनंद झाला. असेच वरचेवर तेथील सृष्टिसौंदर्याची, लोकांच्या चालीरीतीची, मार्मिकपणानें पाहाणी करून एकादी पुस्तकरूपाने सर्वानाच उपयोगी पडेल अशी माहिती लिहा. कारण तुम्ही त्यातल्या दर्दी, हौशी आहात; शिवाय तुमची लेखनशैली मोठी मजेदार आहे.

मी समाजांत जात नाही तुम्ही पण गेलांत. येथे असतां तर समाज पहिल्यासारखाच चागला चालता. तुमची उणीव फार भासते.

तुम्ही केसरीमध्ये फार चागली पत्रे लिहिलीत असे सौ. सानें मला म्हणाल्या. आता ती पत्रे मी वाचणार आहे. सर्वांना आशीर्वाद.

तुमची
आई.

(टीप.—हे पत्र रँगलर पराजप्याच्या सासूबाईनी मला लिहिलें. त्या मला आपली मुलगी समजतात.)

  

Gunfleet,
Frinton-on-Sea, Essex,
28, Oct. 1936.

*Dear Madam,*

I have been told by Miss Zimmern of the International Council of Women, that you might be willing to address a small ladies meeting here on November 16th at 3 P. M. We form a small study circle meeting at each others houses. We number 26

and we have speakers and lecturers, on all subjects of international interest.

We should be most interested to hear you speak, would your subject be 'The Position of Women in India'? We pay expenses or a small fee if desired. It is usual for the speaker to come by the 10–26 train, lunch here and return by the 5–47. train

I should be glad to hear from you as soon as possible.

Yours sincerely,

*M. Orr.*

  

श्री नाशिक

५–११–१९३६.

श्री. नानासाहेब यांना,

सप्रेम नमस्कार वि. वि. आपले पत्र मिळालें; वाचून फार आनंद झाला. आपल्यापेक्षा मी. सौ. सोनूताईची माहिती विशेष मिळवीत होतों. ती माहिती रा. प्रधान यांजकडून मिळत असे. त्याचप्रमाणें टाईम्स व केसरी-मधून मिळत असे. ही सर्व माहिती वाचून व ऐकून फार समाधान वाटले. खरोखर विलायतेतील व यूरोपमधील प्रवासाने त्यांच्या ज्ञानांत विलक्षण भर पडलेली आहे. एकंदरीत आर्य स्त्रीला उचित असा हिंदी स्त्रीचा दर्जा वाढवून त्यांनी परिषदेची कामगिरी केलेली आहे. त्यांचें कार्यक्षेत्र ह्याप्रमाणें विस्तृत होऊन उत्तरोत्तर त्यांचेकडून विशेष कामगिरी व्हावी अशी इच्छा करणे अगदी स्वाभाविक आहे.

आपण स्वतःसुद्धां तिळमात्र वेळ न दवडतां स्वतःच्या ज्ञानामध्यें भर घालणेची खटपट करीत आहां व केल्याशिवाय राहाणार नाही याची आम्हांला खात्री आहे.

आपला,

× × × ×

The Kesari and The Maratha Office,
568 Narayan Peth, Poona City.
श्रीसमर्थ ६-११-१९३६.

साष्टाग नमस्कार वि. वि.

आपले पत्र पोहोचले. मजकूर समजला त्या पत्राबरोबरच आपला लेखही येईल असे वाटले होते. पण त्या पत्रानतर दोन आठवडे झाले तरी अद्यापि लेख पोहोचला नाही. मग का गहाळ झाला की काय समजत नाही.

आपण जे जे लेख लिहिण्याचे योजिले आहे, ते सर्व लेख लिहून पाठवावेत. ते केसरीत अवश्य प्रसिद्ध होतील. केसरीपत्राला न शोभण्या-सारखे ते लेख असतील अशी शका घेण्याचे मुळीच कारण नाही. खऱ्या कळकळीने व माहितीने लिहिलेले असेच लेख पाहिजेत. उगीच भाषेचे अवडंबर माजवून लेखात सार मात्र काहीच नाही असले निरर्थक लेख काय कामाचे !

तुम्ही विलायतेत गेलेले हिदी विद्यार्थी काय करतात याचे चित्र रेखाटले. तसेंच विलायतच्या विद्यार्थ्यांच्या आजच्या पिढीत कोणते गुण–दोष आहेत, ते नवमतवादात कितपत वाहावत चालले आहेत; एकंदर युरोपिअन् समा-जाची बुद्धिमत्ता व नीतिमत्ता भरतीकडेच आहे का ओहोटीकडे लागली आहे ह्यासंबधाने जर काही आपल्या नजरेस आले असेल तर ते लिहावे

असो. आपल्या यूगोस्लाव्हियाच्या सभेच्या हकीकतीचा लेख व इतर प्रवासवर्णनाचे लेख यथाक्रम येतील तसे प्रसिद्ध करण्यात येतील. आपण आपल्या प्रवासाच्या दगदगीत, लेख लिहिण्याची तसदी घेता, ह्याबद्दल केसरीचा संपादकवर्ग व वाचकवर्ग आपला अत्यत आभारी आहे.

कळावें लोभ असावा हे विनति.

आपला
ज. स. करंदीकर

  

श्री नाशिक,
६–११–१९३६.

सौ. सोनूताई यांना,

नमस्कार वि. वि. आपलें पत्र मिळालें. वाचून किती तरी आनंद वाटला. पुन: पुन: २–३ वेळ वाचले. आत्मश्लाघेचा दोष पदरी येईल म्हणून आपल्याला भीति वाटली. परंतु तसे वाटण्याचे कारण नाही. आपल्या हातून फारच मोठी कामगिरी झाली आहे. एकादी चागली गोष्ट आपल्या हातून झाली म्हणजे एक प्रकारचे समाधान वाटते. त्याचप्रमाणे आपल्या हातून घडले आहे व त्याजबद्दल माहिती देताना स्वतःची स्तुति करणे कमी-जास्त प्रमाणात भाग पडते त्याला हरकत नाही.

आपण विलायतेला जाण्यापूर्वी आपल्या व्याख्यानावर मी थोडीशी टीका केली म्हणून आपल्याला वाईट वाटले. परंतु त्याचा हेतु आपल्या ध्यानी आता आला असेल. आपल्या जीवाला ती गोष्ट लागून राहिली, आपण अत्यंत परिश्रम केले व शेवट फारच गोड झाला.

आपले लेख मी केसरीतून वाचले आहेत. फारच चांगले आहेत. मराठी भाषाही फार गोड आहे. तें वाचल्याबरोबरच माझ्या टीकेचा आपल्यावर योग्य परिणाम झाला हे मला कळले. रा. प्रधानकाका, यांचें व माझे ह्या बाबतीत बरेचदां बोलणे झाले आहे. लेख वाचून झाल्यावर आम्ही दोघांनी आपली बरीच वेळां स्तुति केली आहे व कौतुकही वाटलें. श्री. ××× व सौ. × × साहेब, यानीही आपली बरेच वेळां स्तुति करून कौतुक केले आहे. याशिवाय इतर लोकानीही माझेजवळ तारीफ केली आहे. सौ. × × साहेब यांनी आपली त्यांना आलेली पत्रे मला दाखविली आहेत. ती पत्रे सुद्धां फारच छान व मजेदार आहेत.

मी आपल्याविषयी माहिती काढीत होतों. ती माहिती ऐकून व वाचून मनाला फारच आनंद वाटला. आपल्या काय काय हालचाली आहेत इकडे माझें लक्ष होते. व माझ्या कल्पनेबाहेर आपण यश संपादन केलें आहे. यांतच आपण काय तें समजून घ्यावें. ह्यापेक्षां जास्त लिहिणे नको. एवढ्या लिहिण्यानें हरभऱ्याच्या झाडावर तर चढणार नाही ना? आणि

चढलांत तरी हरकत नाही. कारण आपल्या वजनानें झाडच मोडून जाईल ! मग आपोआपच खाली याल !

'हिदुस्थानातील बायकांचे, धर्माचे, व पुरुषाचे पण मी सुदर वर्णन, सभांतून वर्तमानपत्रकारांच्या मुलाखतीतून दिले' असे आपण पत्रांतून लिहितां. आपण बायकाच्या प्रतिनिधि म्हणून गेला होता, असे असूनही पुरुषांची तरफदारी केली; ह्याबद्दल आपले आम्ही आभारी आहोत. परंतु ही फुकटची वकिली आहे. ह्याबद्दल मोबदला काही मिळणार नाही, व मोबदला हवाच असला तर करूं एकाद्या वेळी खरमरीत टीका. परंतु टीका करताना-सुद्धा आता आम्हाला विचारच करावा लागेल. त्या काही पूर्वीच्या सरोजिनी-बाई राहिलेल्या नाहीत, जरा बेतानेच वागले पाहिजे. परंतु सरोजिनीबाई जरी असल्या तरी सोनूताई म्हणून टीका करायला काय हरकत आहे ; प्रसंग आला तर करूंच टीका. ज्ञानानें जरी नाही तरी वडीलपणाच्या नात्यानें आमचा हक्क अबाधित राहीलच. असो. आपण हिदुस्थानच्या प्रतिनिधि ह्या नात्याने व वैय्यक्तिक नात्यानें फारच चांगली कामगिरी केली, सुयश संपादन केले, व स्वतःच्या ज्ञानांत फारच भर घालून आर्य स्त्रीचा दर्जा अधिक उज्वल केलात याबद्दल आपलें अभिनंदन करून उत्तरोत्तर आपल्या हातून अशीच कामगिरी होत जावी असे इच्छितो व आपणां दोघांचें अभीष्ट चिंतून हे पत्र पुरें करतों.

आपला,

(माझे एक शिक्षक)

× × ×

टीप :—(माझें माहेरचें नांव 'सोनू' आहे.)

  

Flat No. I, 95, Marylebone High Street,
London W. I.
12 November, 1936.

*Dear Mrs. Deshpande,*

I had the pleasure of hearing you speak to the committee of the Associated Country Women of the World, on Thursday last. I feel very strongly, that a great many of our overseas members would be interested in what you said.

I would have liked to have asked you many more questions at the time, but it was not possible. I am wondering if you could spare me an hour some time on Tuesday next? Could you perhaps let me know at 26, Eccleston Street (where I am working on the Country Women Magazine)? If you can do this and if so where can I see you and at what time?

I should be very grateful if you could.

Yours sincerely,
*B. Hearnden.*

  

*

## FRINTON FELLOWSHIP OF THOUGHT

The Progress of India's Women

16 Nov. 1936.

The members of Frinton Fellowship of Thought met at "Bratton" Second avenue on Monday, by kind invitation of Mrs. Jamieson.

Mrs. Sarojini Deshpande, one of India's pioneer women, gave an interesting talk on the women's movement in her country. A striking figure in a scarlet sari, she described the restrictions by which women had hitherto been bound, and the wonderful vista before them of advancement to the status and responsibilities of their sisters in the West.

She described the innate selfless devotion of Indian women to their husbands. She felt that this, an ineradicable feature, would preserve the sanctity of home life and be a great force in the future as in the past.

Mrs. Deshpande described child welfare work, clinics, new conditions of marriage laws, education among the better class women, and professional and civil attainments in amelioration of village life.

The fact of a large majority of illiterates was recognised and was being remedied by educated Indian women, thus breaking down a caste barrier that had long been felt unworthy. In this latter advance they had been greatly helped by the example of Mahatma Gandhi, of whom she gave an interesting account and described the veneration in which he is held in her country—not as a dictator but as a priest of peace.

Mrs. Deshpande has recently returned from the Women's International Conference at Dubrov'nik (Jugo-Slavia) to which she was sent as an Indian delegate.

  

Gunfleet, Frinton-on-sea,
Essex,
21–11–1936.

*Dear Mrs. Deshpande,*

I thank you so much for your very nice letter. I am so glad, you enjoyed our little gathering. Our members have had much to talk about, on your description of India's women and they all say how much they enjoyed it.

If you have time, I should like to hear from you especially when you have had a big meeting, and I will write in return. Our next fellowship meeting, is on "Our two selves, real and unreal," and your Hindu thought is very clear on this. I should always like to know of translations of Modern Indian Books, those really worth reading. I hope to visit India one day, and shall let you know in good time. With kindest thoughts and thanks.

Sincerely yours,
*M. Orr.*

  

बर्लिन (जर्मनी)
२१-११-१९३६.

सौ. सरोजिनीबाई देशपाडे यास सा. न. वि. वि.

आपला परिचय पत्रद्वारे झालाच आहे परतु मी श्री. देशपांडे ह्याना सुचविले होतें की हिदुस्थानला जाताना जर्मनीवरून जा म्हणजे आपणांस बर्लिन पुनः पाहावयास मिळाले असते. व मलाही अनायासे आपल्या प्रत्यक्ष परिचयाचा लाभ झाला असता. असो. आलेली सधि अशा रीतीने वाया गेली. आपण आलात तेव्हा मी येथे नव्हतो. हिदुस्थानात मात्र आपली गांठ खात्रीने पडेल.

आपला केसरीतील विचारपरिप्लुत लेख वाचला व तो जरी आपण परत करावयास सांगितला आहांत; तरी मी तो मजजवळ ठेविला आहे. कारण आपण आतां लवकरच परत जाणार आहां व तिकडे गेल्यावर आपणास तो अक पुनः सहज मिळू शकेल. लेख उत्कृष्ट लिहिला गेला आहे व परिस्थितीस तंतोतत पटणारा आहे. विशेषत शेवटचे भागात विलायतेतील विद्यार्थिनीची मन.स्थिति व विचारसरणी याचे रेखाटन अतिशय मार्मिक व मुद्देसूद रीतीने रेखाटले आहे ह्याबद्दल शकाच नाही व त्यावरून इंग्लंडवासिनी हिंदी विद्यार्थी—विद्यार्थिनीच्या अपूर्व व सारासार विचाररहित विचारसरणीची पूर्ण कल्पना येऊन त्याच्या पालकाचे डोळे उघडल्याशिवाय राहणार नाहींत. परतु त्याबरोबरच खुद्द दोन्ही विद्यार्थी वर्गाचे डोळे जरासे जरी उघडले तरी लाखाचे होईल.

वरीलप्रमाणे आपले लेखाबद्दल माझे मत झालें आहे; परंतु त्याबरोबरच मला असे सुचवावेंसें वाटते की लेखाचा मथळा जरासा व्यापक असून लेखान्तर्गत मजकूर जरा मर्यादित स्वरूपाचा आहे.

मथळ्यातील परदेशाऐवजी इग्लड असे शब्द असते व हिंदी विद्यार्थी-ऐवजी आय. सी. एस. चे विद्यार्थी असे शब्द असते तर माझे मतें लेखातील विधानें पूर्णांशानें लागू करतां आली असती.

दुसरें म्हणजे सुरुवातीस आपण विलायतेस जाऊन आलेल्यांची दुर्दशा पाहून कोणाचेही अत.करण कळवळल्याशिवाय राहाणार नाही असे उद्गार आहेत. परतु माझे मतें हा दोष विद्यार्थीवर्गाकडे नसून हा तेथील पद्धतीचा

दोष आहे. तसे पाहिले तर व केवळ तात्त्विक दृष्टचा विचार केला तर, मी असें विचारतों की, हिंदुस्थानातच शिकलेल्या बी. ए. व एम्. ए. ची काय बरें किंमत आज उरली आहे ? शेकडा ८० पदवीधर १५।२० रुपयांना लाचार झाले आहेत; हा दोष कोणाचा ? तुमच्या दृष्टिकोनाने ह्या गोष्टीकडे बघितले तर तिकडील विद्यार्थीवर्ग खुद्द लहान प्रमाणावर बिघडलेला व चमत्कारिक मनोवृत्तीचा व बेजबाबदार वर्तन असणाऱ्याचा आढळून येतो. व थोडेसे पुढे जाऊन आपल्या विचारसरणीस अनुसरून आपल्याकडील सर्व कॉलेजे बंद केली पाहिजेत. कारण सुशिक्षिताची बेकारी लक्षात घेतली तर सर्व शिक्षण कुचकामाचे ठरून, पैशाचा मात्र व्यर्थ व्यय होत आहे, असेच म्हणावे लागेल. असो. तरी माझ्या मते सर्व दोष खालावलेल्या परिस्थितीचा व आर्थिक विपत्तीचा असून विद्यार्थीवर्गावर उगाच रोष करण्यांत अर्थ नाही. दोष राज्यपद्धतीचाच आहे. व जोंपर्यंत स्वराज्य नाही तोपर्यंत तरुणाची अशीच दिशाभूल केली जाईल; व दिवसेदिवस सर्व तत्र जास्तच खालावत जाईल. कांही अशी आपल्या सध्याच्या बिघडलेल्या व विस्कटलेल्या व्यवस्थेचा हा परिणाम आहे.

याशिवाय इंग्लड खेरीजकरून इतर परदेशात जे हिंदी विद्यार्थी येतात ते प्रथमत: बहुधा धदेशिक्षणासाठी येतात व त्यांना हिंदुस्थानातील आर्थिक परिस्थितीची पूर्ण कल्पना असते व शिवाय परत गेल्यावर केवळ मायबाप सरकारची नोकरी करावयाची हेच ध्येय त्याचेपुढे नसतें. अशा विद्यार्थीवर्गाचे बाबतीत आपणास निराळा अनुभव येईल व मी तरी त्यांना आय. सी. एस. विद्यार्थ्यांच्या मालिकेत बसवावयास तयार नाही.

आपण आपले पत्रात माझें स्पष्ट मत कळवावयास सागितलें म्हणूनच वरील अपक्व विचार दिले आहेत. कदाचित् पुढे मागे जास्त अनुभवाती यापेक्षां खात्रीपूर्वक असे लिहिता येईल.

यापुढेही आपले लेख पाठवून दिल्यास मी आपला आभारी होईन.

आपला,

×××

  

लंडन,
ता. २४-११-१९३६.

साष्टाग नमस्कार वि. वि.

आपलें तारीख २१ चे पत्र पावले. आजच रा. ज. स. करंदीकर याजकडून पत्र आले त्यावरून लंडनमधील एका महाराष्ट्रीय विद्यार्थ्यानें माझ्या लेखास प्रत्युत्तर लिहिल्याचें समजले व हें उत्तर १३-११-१९३६ च्या केसरीच्या अंकांत प्रसिद्ध होणार होतें. त्यांची टीका काहीही असो. माझ्या लेखांत लिहिलेली परिस्थिति आम्हीं व आमच्यासारख्याच इतरांनी प्रत्यक्ष डोळयांनी पाहिलेली आहे व त्यामुळे अतिशय वाईट वाटून निदान मुलांच्या पालकांस येथील परिस्थिति काय आहे हे समजावे म्हणून ह्या विषयावर मीं लेख लिहिला. अर्थात् कांही चांगलेही विद्यार्थी आहेत. व ह्यासबंधी मी आपलेबद्दल जर्मनीसंबंधी लेखांत उल्लेख केला आहे. पण अशाची संख्या फारच थोडी आहे.

खरोखरच आपले विद्यार्थी चांगले व्हावेत म्हणून माझी प्रबळ इच्छा आहे व तसे ते आहेत अशी माझी खात्री होईल तेव्हां मला फारच आनद होईल. सध्यां तरी वस्तुस्थिति उत्तेजक नाही, व नवीन नवीन येणाऱ्या विद्यार्थ्यांच्या वर्तणुकीकडे पाहिले, म्हणजे तोच अनुभव येतो व मन उद्विग्न होतें.

शिक्षण नको असें मी कधीही म्हणणार नाही. चांगलें शिक्षण मिळत नसल्यास, जे मिळेल तें घ्यावे ह्याच मताची मी आहें. परंतु परदेशांत धदे-कामाशिवाय इतर शिक्षणाकरितां, विद्यार्थ्यांनी जाण्याच्या विरुद्ध मी आहे. आज खुद्द इंग्लंडमध्ये २।३ हजार विद्यार्थी आहेत. व ते जवळजवळ आठवड्यास फी, राहाणे, खाणे वगैरेकरितां ४।८ पौड खर्च करीत आहेत. ह्यापैकी खरोखरीच धदेशिक्षणास आलेल्या विद्यार्थ्यांची सख्या फार थोडी—बोटावर मोजण्याइतकीच. इलेक्ट्रिकल, मेकॅनिकल किंवा सिव्हिल इंजिनिअरिंगकरितां आलेल्या विद्यार्थ्यांस धंदेशिक्षणाकरितां आले म्हणून मी म्हणत नाहीं. तसेंच निव्वळ कांहीं तरी इंग्रजी डिग्री असावी म्हणून येणाऱ्या डॉक्टरांची गणना मी त्यांतच करिते. शिक्षणाविरुद्ध मी बिलकूल नाहीं, हें मी पुनः जोरानें सांगतें. ह्या शिक्षणानेंच युरोपिअन राष्ट्रांनीं आपली

उन्नति करून घेतली आहे, व त्याचा अनुभव जागोजागी येतो. आपल्यांत सचोटी, उद्योगप्रियता, चपळता, Courtesy, Organising Power नाही, हें आपणांस कबूल करणे भाग आहे. ह्या गोष्टी शिक्षणानेंच येणार व आज शिक्षण सक्तीचें करणे आपल्या हातांत नाही ही पण गोष्ट खरी. पण ज्या गोष्टी आज शक्य नाहीत, त्याला फक्त दोष देत बसून आपण कांहींच करावयाचे नाही ह्याच्या मी विरुद्ध आहे. आज Home Education च्या द्वारें आपणास आपल्या लोकांत हळुहळू वरील गुण आणतां येतील. माझ्या लेखांस कितीही प्रत्युत्तरें आली तरी त्यास उलट जबाब मी देऊं इच्छित नाही. व इकडे येऊन जर मी काही शिकलें असेन, तर उगाच निरर्थक वाद करून दुही माजविणें व वेळ घालविणे हें मी वाईट समजतें.

आपली,
सौ. सरोजिनी देशपांडे

टीप :—(बर्लिनच्या एका मित्राचे पत्र आले त्यास उत्तर.)

  

51 Lancaster Gate, London,
26–11–1936.

चि. सौ. विमलेस अनेक आशीर्वाद.

आज येथील, माझें तुला शेवटचेंच पत्र आहे. कारण उद्यां आम्ही ह्या स्वतंत्र देश सोडणार. कसें सुचत नाही आज. माणसांचें काय तीन धोंडे मांडले कीं तेथें प्रेम लागतें.

येथें येण्यापूर्वींचे व नंतरचे आमचे विचार ह्यांत जमीनअस्मानाचाच फरक पडला. आतां आम्ही अगदीं पक्कीं देशी माणसें होऊन येणार. तूं म्हणशील वा रे 'इंग्लंड रिटर्नड्' निदान दहादां तर पावडरीचे फवारे व लिपस्टिकचे थर देणारी तर व्हावयाला हवी होतीस.

ह्यापुढें मी शक्य तों देशी वापरीन, भाषा लिहिणें ती मराठी किंवा हिंदी व जरूरच असेल तर इंग्रजी. आमची भेसळ भाषा पाहून आतां लाज

वाटूं लागली. दोन शब्द आपले आणि चार इंग्रजी असे कां? आप-ल्याची आपल्याला महति, गोडी नाहीं का?

मी पुष्कळ 'इंग्लंड रिटर्नड्' पाहिले, साधा भात खायला त्यांना कांटा चमचा लागतो, त्याशिवाय नडतें. आपल्यालाही तेंच वळण लागेल की काय असें वाटत होतें. पण छे! आमच्या त्या साध्या भाताला इंग्रजी पेहराव मी कधी देणार नाही. तसें केल्यास ते लांछनच आहे अशी माझी पक्की समजूत झाली. असली ही अंधानुकरणे करण्यापेक्षां इतर किती तरी चांगल्या व जरुरीच्या गोष्टी आपल्यास करावयाच्या आहेत व त्या-बद्दलच्या विचारांनी माझ्या डोक्यांत काहूर उडविले आहे

आज आपले लाखो लोक अन्नाशिवाय मरत असतांना आम्ही एकाद-दुसरे भाग्याचे लोक हजारोवारी लठ्ठ पगार खाऊन, आठ आठ महिने थंड हवेंत मजा करण्यास येत आहोत. ह्याबद्दल किती तळमळ होते म्हणून सांगू? आर्थिक विषमतेचा व परराज्याचा हा परिणाम, असेंच नव्हे का? असा हा विचार पदोपदी मनाला खिन्न करतो.

आम्ही असेच अज्ञानांत राहणार का? आमच्या गुलामगिरीचें कारण तेंच नाही का? 'इंग्लंड रिटर्नड्' म्हणून मी माझ्याच स्वज-नांचा विटाळ मानू का? तुझ्या माझ्या सारख्यांचें कर्तव्य स्वजनांतील अज्ञान घालविण्याचे नाही का? आपण देवाच्या दयेनें उत्तम परिस्थितीत आहोत, निदान फुरसतीचा वेळ देशसेवेंत प्रत्येकानें घालवायला नको का? स्वतंत्र देशांतील माहिती व आपली होत असलेली पिळवणूक बहुजनसमाजास समजावून सांगणे किती आवश्यक आहे? माणसानें खाली पाहात गेले की सुधारणा होणे कठिण. किड्याला देखील घाणीमध्यें कांहीं दुःख होत नसेल. पण जर कां त्याला स्वच्छतेचे धडे मिळाले, लोकांचें चांगले पाहिलें, तर खात्रीनें तो वळवळेल.

हवा, अन्न, घर, आणि वस्त्र ह्या जरुरीच्या गोष्टी माणसाला हव्याच हव्या. त्यानंतर शिक्षण. ह्यापैकी आमच्या बहुजनसमाजास काय मिळतें? इकडील लोकांचे ते दुधाचे ग्लास आणि ते लोण्याचे गोळे पाहिले म्हणजे आमच्याकडील भुकेनें तळमळणारी प्रजा डोळ्यासमोर उभी राहून वाईट वाटतें त्यांचें. धनधान्यांनीं समृद्ध असलेला देश स्वतःच्याच मुलाबाळांना

उपाशी पाहतों तर. असो तू आणि मी व आपल्या सारख्या इतरांनी कळ-कळीनें काम करून ह्यां गोष्टीकडे पाहिले तर सोन्याचा दिवस लवकरच दिसेल.

आणखी किती किती गोष्टी सागायच्या आहेत. मी मनानें घेतलेल्या गोष्टी करण्याची ताकद व चिकाटी ईश्वर देवो, एवढीच प्रार्थना करून पत्र संपविते.

तुझीच
सौ. आक्का.

## WOMAN LEADER RETURNS
### International Conference

Times of India, 18-12-36.

The P. & O. steamer, KAISAR-I-HIND, with mails from London of December 3, arrived in Bombay on Friday morning. Among the passengers who disembarked were: Major General Sir Charles Macwatt; Lady Stokes; Major G. E. Portal, Commandant, H. E. the Governor's Bodyguard, Bombay; Mr. Verrier Elwin; Mrs. How-Martyn, the birth control expert; Dr. Pierre Ceresole, of the International Volunteer Service for Peace; and Mr. N. M. Joshi, M. L. A.

Mrs. Sarojini Deshpande, who attended the International Council of Women's Conference held in October last at Dubrovnik, Yugoslavia, returned to India by the mail steamer. She toured Europe visiting France, Italy and Switzerland and delivered lectures in London and Paris dealing with the progress of Indian women in the social and political spheres. She said, she was greatly impressed with the progress of women in European countries. She intends to devote herself to the cause of women in India. She is keenly interested in the problem of pure milk supply which is so essential for the well-being of children.

  

Servants of India Society,
Bombay 4,
25-12-1936.

*Dear Mrs. Deshpande,*

Many thanks for your letter of the 19th. I am sorry I did not write to you earlier.

I was very much interested to learn about your work and I hope you will continue it wherever Mr. Deshpande's duty may take you. I shall be delighted to hear from you sometimes about what you are doing.

It was a great pleasure to me that I had the opportunity of meeting you and Mr. Deshpande on the steamer.

Please remember me to Mr. and Miss Deshpande.

With kind regards,

Yours sincerely,
*N. M. Joshi.*

  

36, Vivian Avenue,
Wembley Hill,
Middlesex,
12th Jan. 1937.

*Dear Mr. and Mrs. Deshpande,*

By now no doubt you are back home again and getting down to your usual routine.

We thought that a brief note might help to recall some of the more pleasant parts of your recent visit.

As usual there is nothing to report from this front. we are just going on at the usual pace, and with the ordinary ups and downs, that make up our lives.

Ahead of us, there is the coronation; as individuals we are not yet perturbed and are not yet framing particular plans for the event. Of course, work has started on the public high ways; but the normal routine still goes on, the pace does not slacken, but rather tends to be more lively in anticipation.

Mr. Tawde returned home last week. His was to be a round-about-way home and so far has been full of pleasant experiences. He writes us from each new country he reaches. Had you walked down Park Lane today, you would have been staggered. In the last couple of days, the grass has been covered with tubular scaffolding which will form the skeleton of the stands for coronation seats. What a language ours is ! ! ! The stands are seats just as the sussex downs are ups and the halfway house often becomes the journeys end.

Naturally that reminds me of your daughter. I hope that she is still able to learn English in spite of her stay here. Our school children would be quite hurt if you told them that they must learn English—although most speak two languages. Kings English and colloquial—a phrase which covers a multitude of dialects and many variations. On reading this note, I feel, I have done well to write or scribble so much without having any real news to tell. ( Please do excuse the Scribble.)

Mrs. Druary joins me in this wish, of course sends an extra wish to extend the days to years.

Yours sincerely,

*Gladys & Leonard H. Druary.*

श्री नाशिक,
१–२–१९३७.

प्रिय सौ. सरोजिनीबाई यांस, सप्रेम नमस्कार, वि. वि.

तुमचें ता. २५–१–३७ चे पत्र पावले. फार आनंद झाला. तुमची भेट झाली नाही म्हणून फारच वाईट वाटलें. मला वाटत होते की तुम्हीं नाशिकास लवकर याल, पण तसा योग जुळून आला नाही. तुमचे स्वागत करावें वगैरे विचार मनातच राहिले व नुसती भेटदेखील झाली नाही. येथील स्त्रीमंडळाच्या कार्यकारी मंडळाला आपले भाषण करण्याबद्दल सांगितले होतें. असो.

तुमचे सर्व लेख मी अगदी अगत्याने वाचले व मला ते फार आवडले. तुम्ही खरेंच फार छान लिहिता. यूरोपची एकदर माहिती तुमच्या लेखावरून आली, पण प्रत्यक्ष किती तरी शंका कुशंका विचाराव्याशा वाटत होत्या. यूरोपच्या सफरीचा परिणाम फारच हितकर झाला, हे पाहून मला संतोष वाटत आहे. एकतर महाराष्ट्रीय भगिनी व त्या पण लाडक्या भाऊजींच्या लाडक्या वहिनी. तेव्हां तुमचे हाती घेतलेलें काम व ते करण्याचा अपूर्व उत्साह व चिकाटी हें पाहून आनंद व अभिमान वाटत आहे तो लिहिणें शक्य नाही. भाऊजींना तर वहिनी एक कर्तृत्ववान् विदुषी आहेत अशी खात्री झाली आहे व आधीच असलेल्या कौतुकांत व अभिमानात भर पडली आहे. मला तर खात्रीनें वाटतें कीं मोठ्या ऑफिसराची बायको आपल्या नवऱ्याच्या अधिकारांत जितकें सामाजिक काम करूं शकते तितकें इतर स्त्री करूं शकणार नाही. किंवा तिला अति परिश्रम करावे लागतील. दर वर्षी कितीतरी ऑफिसर्सच्या (देशी) बायका यूरोपला जाऊन येतात, पण त्यांच्यांत कांही समाजाला उपयोग होईल, असा बदल होतो का? किंवा त्यांना कांही सामाजिक काम करण्याची तळमळ लागते का? तुमचें उदाहरण त्यांना अगदी आदर्श होईल.

ह्या कार्यांत तुम्हाला यश येवो, व तुमची भरभराट व कीर्ति होवो अशी मी परमेश्वराजवळ प्रार्थना करते.

सर्वांनाच तुमचे लेख आवडले. आतां मुलीला तुम्ही कसें शिक्षण देणार ते बघूं?

तुमची,
एक भगिनी.

Sonathi Relief Camp (Bihar),
Muzffarpur,
22-2-1937.

*Dear Mr. Deshpande,*

When we met on the Steamer KAISAR-I-HIND, Mrs. Deshpande offered seriously and very kindly to come for a certain time and help us on our work in the villages of Muzffarpur District. I feel and so do my colleague Phanindra Mohan Dutta and his wife, that the presence of Mrs. Deshpande for any time she would feel worth while to spend with us, after getting in touch with the conditions here and making her first experiences would be extremely valuable and helpful.

Please tell Mrs. Deshpande that she will be welcome here at any time. The conditions here are very primitive but, Mrs. Mohan Dutta will do her best to receive her, and make her as comfortable as possible. If she finds it too rough for her, she will be perfectly free to leave again whenever she likes ; we shall be very glad to have her also for a short visit, and even such a visit might allow her to make valuable suggestions for our work. (Amongst the middle class miserable women.).

Please tell Mrs. Deshpande to send me a telegram as soon as possible, telling the exact day and time of her arrival. We shall be at the station to meet her.

Very much looking forward to receive the telegram of Mrs. Deshpande.

I am writing this to your office address as I do not know Mrs. Deshpande's address.

Yours sincerely,
*Pierre Ceresol.*

8, Savoy Place, South Port,
18–9–1941

चि. बाळासाहेब यांस अनेक आशीर्वाद

तुम्हांला पत्र लिहीनसें कधीपासून म्हणते पण गडबडीत लिहायाला झालेंच नाहीं. हल्लीं आम्ही आमच्या नव्या मोटारमधून इंग्लंड स्कॉटलंडचा प्रवास करीत आहोंत. इकडील रस्त्यावरून मोटार चालविण्याची किती मजा वाटते. चालवितांना कोणी वाटेत अडवें येईल असा धोका मुळीच नाही. बाकी आमच्या हिंदुस्थानांत मोटार चालविली म्हणजे हुषारीचें प्रशंसापत्रक मिळायला कांहीच हरकत नाही. आमच्या रस्त्यांवरील गडबड गोंधळाचें वर्णन कांहीं औरच आहे. यान्त्रिक युगांत इतकीं वर्षे राहूनही आम्हांला वाटतें कीं आम्ही अजून बैलगाड्यांच्याच युगांत आहोत. रहदारी सुधारण्यास देखील जनतेनें शिक्षणच घ्यायला हवें. शिक्षण आणि तें जर कां योग्य व उपयोगी मिळालें तर राष्ट्रें कशीं हुषार होतात, हें यूरोपवरून कळतें. तुम्ही येथें पांचसहा वर्षे होतांच तेव्हां सर्व माहीत आहेच.

येथें आल्यावर तुमच्या त्या कॉलेजमधील मैत्रिणीची Doreen ची भेट घेतली. तुम्हाला तिची Air Mail आली नाहीं की सुचत नसे अगदीं. अल्बममधील तिचे ते सतरा फोटो आणि आठवणी काढून तुम्ही अगदीं हुरळून जात असां. म्हटले पहावी तरी तिला एकदां.

तुमची Doreen आम्हांला फार आवडली. तिच्या वागण्या बोलण्या-वरून ती चांगल्या घराण्यांतली व शिकलेली आहे हे तेव्हांच कळतें. मैत्री करण्यांत तुम्ही एकंदरींत दूरदर्शीपणा दाखविलांत, त्याबद्दल तुम्हांला थोडें तरी भलें म्हणतां येईल. निदान एकाद्या Maid पेक्षां ही तरी बरी. दगडा-पेक्षां वीट मऊ एवढेंच.

' बाळचीं ' कोणी जरी माणसें भेटलीं तरी मला आनंदच होतो असें आम्हाला ती अगदीं मनापासून म्हणाली. माझा हात धरून दयार्द्र व सद्-गदित अंतःकरणानें म्हणाली की सांगाल न त्याला परत गेल्यावर कीं मी तुम्हांला भेटलें आणि सुखरूप आहे म्हणून ?

आणि बाळासाहेब खरंच सांगू का ! तिला पाहून मला एक गाणें आठवलें. तुम्हाला तें माहीत असेलच कदाचित्.

'किती गोड गोड वदला, हृदयी गुलाब फुलला,
स्मृतिचा सुवास येई जिव हा उडोनि जाई.
काटा हळूच हाले कळ येई जीव विव्हळे,'
अशी बिचारीची स्थिति झाली आहे.

मनांत म्हटले हाय वेडे पोरी! भ्रमराला ह्या फुलावरून त्या फुलावर बसून मनमुराद मधाचा आस्वाद घेण्याची खोडच असते. मग एकाद्या भोळ्या भाबड्या निष्पाप सुमनाने, भ्रमर आपल्यावरच रत व्हावा अशी मनीषा धरली तर त्याला जग खुळे नाही कां म्हणणार? बिचारीला काय कल्पना की एकदां हें हातचें सावज सुटून सातासमुद्रापलीकडे गेलें की त्या क्षणिक नकली प्रेमाचे धागे असे शिथिल होत असतात म्हणून? तिच्या देशामध्ये तिला पति मिळणे कठिण म्हणून ती ह्या थाटामाटांत राहणाऱ्या नबाबाला भुलली. पण तिला कोठे माहीत आहे, की, असल्या ह्या मुलामागें हिंदुस्थानांतील उपवर मुलींचे आईबाप अगदी हात धुऊन मागे लागलेले असतात म्हणून! बाकी तुम्ही मुले अशी इकडे प्रेमांत पडलेली तुमचाही जीव कसा अर्धवट ह्या गौर कन्यांवर गुरफटलेला. तुमची स्थिति बहकल्यासारखीच होते. नोकरी लागल्याशिवाय लग्न करायचें नाही अशा तुम्ही भुलथापा देत असतां. नोकरीला १००।२०० अर्ज पाठविले. उत्तरें येईनात. आणि मिळाली नोकरी तरी, मोठ्या हुद्देदाराचें एक सोडून द्या, पण तुमच्यासारख्यांना त्या तुटपुंज्या पगारांत त्या परदेशीय मुलीबरोबर सुखानें राहतां यावयाचें नाहीं. नात्यागोत्यांतून तुम्ही तोडले जाल हें भय आणि म्हणून तुम्हांला वाटूं लागतें कीं करावी झालं इथलीच आपली एकादी.

रागावू नका हं, पण देवाच्या घरी देखील न्यायच असतो. त्या भोळ्या मुलीच्या शरीराची अशी विटंबना केलीत आणि म्हणूनच त्याचें प्रायश्चित्त असें हें बेकारीच्या रूपांत देवानें तुम्हाला दिलें. कल्पना करा कीं तुमच्या बहिणींची स्थिति, अशा कोणी नराधमानें केली तर तुम्ही त्याला शिव्याशाप देणार नाहीं का? एका अर्थी तुम्ही त्या अनिष्ट विवाहाच्या सापळ्यांतून शिरसलामत सुटलांत म्हणून तुमचें अभिनंदन करूं, कां त्या बिचाऱ्या गरीब गायीला मधाचें बोट लावून असें फसवलेंत म्हणून तुमचा धिक्कार करूं!

पाश्चात्य मुलींच्या फाजील स्वातंत्र्याचे हे दुष्परिणाम आहेत. बाकी तुम्ही म्हणता "वा! नुसता हात धरला, नाच केला म्हणजे त्यांत अनीतिकारक असें काय आहे? त्यांत वाईट विचार येतील असेच कशावरून!" मी म्हणते मग तुम्ही आपलाच किंवा आपल्या पुरुष मित्राचा हात का नाही धरीत? तशा त्या हात धरण्यानें काही वाटतेच ना तुम्हाला!!! असे बोलन स्वतःची व दुसऱ्याची तुम्ही शुद्ध फसवणूक करता आहात झाल.

असे निंद्य प्रकार आमच्यात होऊ नयेत म्हणूनच आमच्या मुलींना बहिणींना असले फाजील स्वातंत्र्य नव्हते. त्याला तुम्ही स्त्रियाची गुलामगिरी म्हणतां.

समजा आमच्या मुली तुमच्यासारखेच असे ढंग करूं लागल्या तर देशाचें भवितव्य काय? गृहसस्था अबाधित राहील का?

चार चार वर्षे पति दूर गेले तरी जिने कधी वाकडा डोळा करून दुसऱ्याकडे पाहिले नाही अशा शुद्ध पवित्र स्त्रीला तिचा पति परत तितकाच शुद्ध मिळतो का?

होय, विसरलेंच होते, आजच्याच मेलने तुमच्या लग्नाची आमंत्रणपत्रिका पोहोंचली. वाचून किती जिवाची तळमळ झाली माझ्या. बिचाऱ्या शिकलेल्या हिंदुस्थानी मुलीची मला कीव आली अगदी. आपल्या भावी पतीनें यूरोपात गुण उधळलेले तिला माहीत आहेत का?

तुम्ही मात्र तिच्या कुल-शीलाची तावून सुलाखून तपासणी केली असेल नाहो! ती करण्यास तुम्हाला काय अधिकार! तुमचे ते उधळलेले गुण त्या नववधूला दैववशात् कळले तर त्या कोमल जिवाला किती यातना होतील? तुमच्या प्रेमाची घडी बसण्यापूर्वीच उसकटून त्याच्या चिंधड्या नाहीं कां उडायच्या! दोघांच्याही विशुद्ध प्रेमाची जरुरी विवाहसौख्यास किती जरूर असते त्याची तुम्हाला अंधुक तरी कल्पना आहे का?

तुमच्या भरंवशावर बसलेली Doreen जेव्हां तुमची लग्नपत्रिका वाचील तेव्हां विजेचा धक्का बसल्यासारखेच वाटेल बिचारीला.

असो. विलायतेंतलें तें कुलंगडें बरोबर आणन तुम्ही आपले स्वतःचे व आपल्या वृद्ध आईबापांचे हाल केले नाहीत हें त्यांतल्या त्यांत बरेंच झालें. नाहीं तर सबंध जन्मभर वाळीत टाकल्यासारखे राहिले असतां तुम्ही. माहीत

आहे ना त्या बॅरिस्टर जयंतांनी तिकडून एक आणल्यावर त्यांची आई धाय खाऊन ज्या आजारी पडल्या त्या कधी उठल्या म्हणून नाहीच! त्यांतच त्या हळहळत गेल्या. बॅरिस्टर तरी सुखी झाले का? नाहीच. रोजच्या शिव्या आणि लाथा मात्र खात आहेत !

असो. मी फारच स्पष्ट लिहिते, पण काय करूं तसें लिहिल्याशिवाय राहवतच नाही मला. पत्रांतील माझे खरें खरें हृद्गत ओळखून माझ्यावर तुम्ही रागावणार नाही अशी मी आशा करतें.

हो आता ह्या नवीन पुष्पावर तरी शाश्वत प्रेमाची वृष्टि करा.

तुमची
सौ. आक्का.

(टीप :—सत्यसृष्टीतील एक चित्र.)